प्लॅटफॉर्म अशी कल्पना कोणीतरी काढली. त्यामुळे त्या पुतळ्याची कायमची विद्रूप अवस्था करून टाकली. काही ठिकाणी 'पोर्टेबल क्रेन केबिन' आणून त्या यांत्रिक खोक्यात उभं राहून मंत्र्यांनी पुतळ्याला हार घातला.

इतके वेडेपणे केल्यावर विवेकवादी माणसाचा साधा प्रश्न आहे की, एवढ्या उंचावर असलेल्या जागेवर हार घालताच कशाला? आदर वाटत असला तर खाली उभं राहून नुसता नमस्कार करा की! हार रद्दच करा ना!

क्रिकेटच्या मैदानावरचा सगळ्यांच्या ओळखीचा प्रसंग उदाहरण म्हणून घेतो. दिवसभर मैदानावर क्षेत्ररक्षण, गोलंदाजी करणारे खेळाडू खूप दमतात, त्यांच्या नाकातोंडात दिवसभर खूप धूळ जाते हे तर अगदी समजण्याजोगं आहे. टी.व्ही.वर सामना बघताना अनेक खेळाडू मैदानावर थुंकताना आपल्याला दिसतात. निव्वळ विचाराच्या मार्गानी या गोष्टीकडे बघितलं तर एवढ्या प्रचंड मैदानाला यामुळे काहीच फरक पडत नाही. केवळ भावनेच्या मार्गानी बघितलं तर तो मैदानाचा, खेळाचा अपमान वाटतो. यातलं योग्य-अयोग्य ठरवणं खरोखर अशक्य असल्यामुळे तो निर्णय त्या व्यक्तीवर सोडण्याखेरीज आपण काहीच करू शकत नाही.

सध्याच्या सरासरी समाजाची परिस्थिती अशी आहे की माणसाला दारुची सवय सोडण्यासाठी गळ्यात माळ लागते. चांगलं वागण्यासाठी ईश्वर, धर्म यांच्या कुबड्या लागतात. विवेकवादी माणसांचा सगळ्या आस्तिकांना, धर्म मानणाऱ्यांना, जात मानणाऱ्यांना, पुनर्जन्म मानणाऱ्यांना, कर्मकांडं करणाऱ्यांना एकच प्रश्न आहे–

'आम्ही या यादीतली कुठचीही गोष्ट करत नाही, पण 365 दिवस 24 तास सगळ्यांशी सज्जनपणी, सरळपणी वागतो. आम्ही पाप-पुण्य मानत नाही, स्वर्ग-नरक मानत नाही, पण सगळी कामं पृथ्वीवर आणि याच आयुष्यात चांगलीच करतो.'

'तुम्ही?'



# 3) तत्त्वज्ञानाचा इतिहास

इंग्लिशमधल्या ‘फिलॉसॉफी’ या शब्दाचा अर्थ ज्ञानाची आवड असा आहे. ज्ञान म्हटल्यासरशी त्याला काही मर्यादाच नाही हेही लक्षात येतं. म्हणून तर तत्त्वज्ञान या विषयात खरोखर काहीही येऊ शकतं. तत्त्वज्ञान या विषयाची सुरुवात 2500 वर्षांपूर्वी ग्रीसमधे झाली असं पाश्चात्त्य तत्त्वज्ञानी समजतात. सॉक्रेटिस, प्लेटो, ॲरिस्टॉटल, हिप्पॉक्रेटस यांनी काही पिढ्यांच्यात मिळून तत्त्वज्ञानाला साचा आणि नाव दिलं. हिप्पॉक्रेटसनी प्रथम हे मांडलं की मानसिक आजाराचा आणि देव किंवा सैतान यांचा काही संबंध नाही. काय उपाय करायचे ते मानवानीच मानवावर करायचे आहेत.

प्रत्यक्षात भारतातला पुराणकाळ हा त्याच्यापूर्वीचा होता, पण तो इतिहासाच्या व्याख्येत पाश्चात्त्यांच्या मानण्याप्रमाणे बसत नाही. त्या काळातला भारतातला सर्वांत मोठा तत्त्वज्ञानी श्रीकृष्ण होता. ग्रीक तत्त्वज्ञानात ‘एथिक्स’ नावानी केलेल्या बऱ्याच चर्चा योग्य-अयोग्य, न्याय्य-अन्याय्य यासंबंधीच होत्या आणि श्रीकृष्णानी महाभारतात सांगितलेली गीता त्याविषयीच आहे. त्या अर्थानी श्रीकृष्ण आणि व्यासमुनी हे पहिले तत्त्वज्ञानी म्हणता येतील. रामायणाची कथा तर त्याच्याही पूर्वीची आहे आणि ती जगण्याच्या तत्त्वाविषयीच आहे. रामायणालादेखील इतिहास न मानल्यामुळे रामाची आणि वाल्मिकींची गणना तत्त्वज्ञानींच्यात होत नाही.

चिनी ताओ तत्त्वज्ञानानी याबद्दल महत्त्वाचे विचार मांडले. पुरुषगुणांना ‘यँग’ असा शब्द आहे आणि स्त्रीगुणांना ‘यिन’ असा शब्द आहे. पुढे त्यात असं सांगतात की, निसर्गानीच याचं संतुलन साधलेलं आहे. निसर्गतःच स्त्री आणि पुरुष एकमेकांना पूरक आहेत. पुरुषाच्या लिंगाचा आकार आणि स्त्रीच्या योनीचा आकार यातच सगळा परस्परपूरकतेचा सारांश सामावलेला आहे आणि त्याचा आदर सतत बाळगायला हवा.

भारतीय असलेला इतिहासाच्या व्याख्येत बसणारा पहिला तत्त्वज्ञानी म्हणजे चार्वाक. ईश्वरवाद-निरीश्वरवाद, स्त्री-पुरुष संबंध याविषयी चार्वाकाचं तत्त्वचिंतन खूप प्रसिद्ध आणि महत्त्वाचं आहे.

त्यानंतरच्या महत्त्वाच्या भारतीय तत्त्ववेत्त्यांपैकी ज्ञानेश्वर, रामदास यांनी खूप उपयोगी, अर्थपूर्ण काम केलं, पण त्याला ईश्वरभक्तीचा रंग दिला. इतर संतांनी देखील तेच केलं. तुकाराम, चोखामेळा, उत्तर भारतातला कबीर हे सगळे खरे तत्त्वज्ञानीच पण भक्तीमार्गानी जाणारे.

काही प्रमाणात ज्ञानमार्गानी गेल्यामुळे समजायला जरा सोपं असं काम योगी अरविंद, विवेकानंद, कृष्णमूर्ती, विमला ठकार, महात्मा गांधी, विनोबाजी भावे यांनीही केलं आणि तरी एवढ्या सगळ्या लोकांच्या सतत सांगत राहण्याचा फायदा सर्वसामान्य माणसाला तेवढा झाला नाही असं माझं मत बनलेलं आहे.

योगी अरविंद यांनी पूर्णयोगाची कल्पना मांडली. ज्ञानयोग, भक्तीयोग, राजयोग, कर्मयोग या सगळ्यावर आधारलेला पण निराळा पूर्णयोग लोकप्रिय झाला. पाँडिचेरीजवळ अरविंदाश्रम हा प्रचंड मोठ्या जागेवर उभारलेला आहे. तिथे 400 इमारती आहेत. शेकडो लोकं राहतात नि शेकडो येऊन-जाऊन असतात. तिथे व्यक्तीची खाजगी मालमत्ता नसते, तर आश्रमाची मालकी असते. तिथे पूजाअर्चा, आरत्या, प्रसाद असं काही नसतं. त्या गावाचं नाव आहे अरोव्हिल. योगी अरविंद यांनी स्वतःला योगी मानलं. कधीही तत्त्वज्ञ मानलं नाही.

कृष्णमूर्तींच्या तालमीत तयार झालेल्या विमला ठकार यांनी कायम ध्यान, चिंतन यावर भर दिला. उगीच फार वाचन करू नका, त्याऐवजी स्वतःच्या मनात डोकावून बघण्यावर भर द्या, असं शिकवलं. अनेक निरनिराळ्या तत्त्वज्ञांच्यात त्या त्यातल्या त्यात सोपं, कमी गूढ लिहायच्या आणि बोलायच्या. त्या शुभ-अशुभ मानायच्या नाहीत.

आचार्य विनोबा भावे यांना लोकांनी 'समन्वयाचार्य' अशी उपाधी दिली होती. भारतीय संस्कृतीबरोबरच जगातल्या अनेक धर्मांचा, संस्कृतींचा, भाषांचा त्यांचा अभ्यास होता. त्यांचा मृत्यूनंतरच्या हिंदू धर्मसंस्कारांवर विश्वास नव्हता. त्यांना सक्रीय राजकारणात कधीच रस नव्हता. राज्यकर्ते मात्र त्यांच्याकडे मार्गदर्शनासाठी, सल्ल्यासाठी जायचे. विनोबांनी स्वतःहून ठरवून प्रायोपवेशनाचा म्हणजे इच्छामरणाचा मार्ग स्वीकारला.

तत्त्वज्ञानाचा सध्याच्या आधुनिक आयुष्यात उपयोग करण्याचा प्रयत्न आचार्य रजनीश ऊर्फ ओशो यांनीही केला. त्यांचा शिष्यगण जगभर पसरला, पण खरा बदल घडवण्यात रजनीश अयशस्वी झाले.

प्रत्येक सजीव प्राण्यामधे काही नैसर्गिक उपजत बुद्धिमत्ता असते. त्यालाच

काही लोक आतला आवाज असंही म्हणतात. उदाहरणार्थ, मानवाच्या तान्ह्या बाळाला जन्मल्याजन्मल्या स्तनपान करावं हे कळतं. एवढी गोष्ट इतर प्राण्यांनाही कळते. पण खाणं, झोपणं आणि मैथुन यापलीकडे मानवाखेरीज इतर प्राणी जात नाहीत.

इतर प्राण्यांपेक्षा जास्त बुद्धिमत्ता असल्यामुळे मानव कायम एका गोष्टीच्या शोधाच्या मागे लागला. शरीराला ज्ञानेंद्रियं आहेत, पण त्यांच्यात चैतन्य कुठून येतं? जीव कुठून येतो? या शोधासाठीच विचारवंतांनी अनेक मार्ग शोधले. भक्ती-मार्ग, ज्ञान-मार्ग, स्वचिंतन किंवा ध्यान हे त्यासाठीचे मार्ग आहेत.

'ध्यान' शब्दाचे अनेक अर्थ आहेत. त्यातला 'लक्ष असणं, लक्ष देणं, लक्ष केंद्रित करणं' हा अध्यात्मामधे लागू होणारा अर्थ आहे. जन्मल्यापासून मरेपर्यंत आपण एकटे असतो हे प्रत्येकाला नीट कळणं, काय करायचंय् ते स्वतः करायचं आहे आणि आत्ता करायचंय् हे समजणं असा त्याचा अर्थ आहे.

ज्ञानमार्गावर चालत असलेल्या शास्त्रज्ञांपैकी डार्विनचा उत्क्रांतिवाद हा मला स्वतःला सर्वात पटतो. मी 72 वर्षांचा आहे. एवढ्या वर्षांत माझ्या डोळ्यासमोर मानवी शरीरात जर जाणवण्याजोगे बदल होऊ शकतात तर गेल्या हजारो-लाखो वर्षांत सूक्ष्म जीवापासून मानवापर्यंत उत्क्रांती होत गेली हे तर्कबुद्धीला पटण्याजोगं आहे.

भारतीय संतांनी भक्तीच्या अंगानी खूप चांगल्या पद्धतीनी महत्त्वाच्या गोष्टी सांगितल्या आहेत. माणसाच्या रोजच्या संसारातल्या वागणुकीला त्या सगळ्या लागू पडतात. उदाहरणार्थ, 'बोले तैसा चाले त्याची वंदावी पाउले'. बोलणारा आणि तसंच वागणारा माणूस क्वचित सापडतो ही अडचण आहे.

संतांनी असंही म्हणून ठेवलंय्, 'निंदकाचे घर असावे शेजारी'. याचाच अर्थ विरोधी विचारांचं कायम स्वागत करावं. त्यामुळे चर्चा होते. विचारांना स्पष्टता आणि धार प्राप्त होते. आपली भूमिका समोरच्याच्या विरोधी असली तरी चालेल, पण भूमिका स्पष्ट मांडण्याजोगी आणि पक्की असावी असं ते म्हणतात.

अजून एक महत्त्वाचा विचार संतांनी सांगितलेला आहे– 'ऐकावे जनाचे करावे मनाचे' तत्त्वज्ञानातला हा खूप महत्त्वाचा विचार मानसशास्त्रानीदेखील असाच मान्य केला आहे. शब्द मात्र निराळे आहेत. मानसशास्त्र म्हणतं, 'माणूस जे जे करतो ते सगळं स्वतःच्या समाधानासाठी करतो. दुसऱ्याचं ऐकून घ्यावं, विचार करावा, पण तिथे थांबावं.'

तत्त्वज्ञानातला अगदी पहिला विषय म्हणजे योग्य आणि अयोग्य यांतला फरक. काही लोकांनी ह्याचं साधं वर्णन चांगलं आणि वाईट असं पण केलं होतं. हे सगळं जे मी सांगतो आहे त्याचे संदर्भ अडीच हजार वर्षांपूर्वीचे असल्यामुळे सगळे संदर्भ निराळे होते. एकेका विषयाचा वादविवादानी निकाल लागायला काही महिन्यांपासून काही वर्षंसुद्धा लागायची. ज्या काळातलं हे सगळं वर्णन आहे ते म्हणजे त्या वेळेच्या ग्रीसमधे सध्याच्या अॅथेन्सच्या आसपासचं छोटं राज्य. लोकसंख्या कमी. चरितार्थाचा झगडा वरच्या वर्गातल्या लोकांसाठी जवळ जवळ नाहीच. त्यांना राजाश्रय असायचा. त्यांना चरितार्थासाठी दिवसभर काहीही करावं लागायचं नाही.

सगळ्यांना माहिती असलेले पहिले काही तत्त्वचिंतक म्हणजे हिपॉक्रेटिस, सॉक्रेटिस आणि प्लेटो हिपॉक्रेटिसनी प्रथम ह्याला तत्त्वज्ञान असं नाव दिलं. त्या काळामधे चांगलं किंवा वाईट ह्याचा सोप्या शब्दातला अर्थ अनेक महिन्यांनंतर काही विद्वानांनी पक्का केला तो असा– जे सगळ्यांच्या तोट्याचं आहे ते म्हणजे अयोग्य किंवा वाईट. हे सगळं आत्ता सांगायला आपल्याला इतिहासाचे अनेक संदर्भ माहिती असल्यामुळे फक्त अर्धं मिनिट लागलं, पण त्या काळात अनेक लोकांनी वारंवार वादविवाद करून हा अर्थ पक्का केला होता.

मानवाचे विचार आणि भावना, हालचाली नियंत्रित करणारा अवयव म्हणजे मेंदू आहे हे सुचायला आणि काही प्रयोग करून निष्कर्ष काढायला अनेक वर्षं लागली. लढाईत जखमी झाल्यामुळे योगायोगानी माणसाचा उघडा मेंदू दिसला. तसे अनेक जखमी योद्धे म्हणजे अनेक मेंदू निरीक्षणासाठी मिळाले. मेंदूतल्या निरनिराळ्या भागांना टोचलं की शरीराचे निराळे भाग हलतात किंवा उत्तेजित होतात हे लक्षात आल्यावर पाय-पोट-हात यांची नियंत्रण रचना कळली. हे होता होता मानवाच्या काही पिढ्या गेल्या. त्यानंतर पुढे माकडांवर प्रयोग केले. जेव्हा संधी मिळेल तेव्हा माणसांवर प्रयोग चालूच होते. मानवी शरीरशास्त्राच्या ज्ञानात हळूहळू प्रगती होत गेली.

दुसऱ्या कोणावरही अन्याय होणार नाही अशी योग्य वागणूक म्हणजे नीती हा अर्थ पक्का झाला. तरीही अनेक लोक दुसऱ्याला त्रास होईल असं वागत राहिले, म्हणजेच अनीतीनी वागत राहिले. असं अनैतिक वागणारा अपवादात्मक एखाद्-दुसरा असला तर लोक सोडून देतात, समजावून सांगतात किंवा त्याला स्वतःच शासन करतात, काहीतरी करतात.

जेव्हा समाजातले जवळजवळ सगळे लोक विशिष्ट पद्धतीनी वागतात किंवा विशिष्ट गोष्ट टाळतात तेव्हा तो वागणुकीचा संकेत बनतो. असा संकेत अनेक वर्षं टिकला आणि तो संकेत मोडणाऱ्यांची संख्या फार झाली की काहीतरी करावं लागतं कारण सबंध समाजाचंच रोजचं आयुष्य बिघडायला लागतं. ज्या समाजात ज्या प्रकारचं सरकार असेल त्या सरकारला समाजाची नीतिमत्ता ढासळल्यामुळे सगळ्यांना लागू असा कायदा करावा लागतो.

कायदा अस्तित्वात आला की तो मोडण्याची पद्धत शोधण्याची काही लोकांची धडपड सुरू होतेच लगेच. कायदा मोडणारा माणूस खरंच बोलेल, खरंच वागेल असं खात्रीनी कधीच सांगता येत नाही. अशा वेळेसाठी कायद्याला मदत करण्यासाठी काही शोध लागतात.

एक शोध म्हणजे माणसाचं हस्ताक्षर, त्याची सही, त्याचा स्वतंत्र अभ्यास. सध्याच्या काळात बँकेसारख्या ठिकाणी, जिथे पैशाचे व्यवहार, देणं, घेणं हाच रोजचा उद्योग असतो तिथे व्यक्तीच्या सहीवर सगळ्या गोष्टी चालतात. पण प्रत्येकाची सही निराळी असते आणि तशी सही दुसरी कोणी करू शकत नाही हे सुचायला, कळायला, ठरायला अनेक वर्षं लागली. व्यक्ती हजर नाही, पण व्यक्तीची सही म्हणजे त्याच्या अस्तित्वाची प्रतिनिधी ही त्या काळी क्रांतीच होती.

अशा शोधांपैकी बोटांचे ठसे हा शोध खूप महत्त्वाचा टप्पा ठरला. कितीही लोकसंख्या असो, प्रत्येकाच्या बोटाचे ठसे निराळे असतात ही कल्पना सुचणं, हजारो, लाखो लोकांचे ठसे घेऊन ही कल्पना खरी असल्याचं सिद्ध करणं, शेवटी ती कल्पना कायद्यानी मान्य करणं हे फार क्रांतिकारक आहे.

त्यापुढची क्रांतिकारक शोधाची पायरी म्हणजे डी.एन.ए. कुठच्या व्यक्तीचं अपत्य कोण हे सिद्ध करणारा हा शोध त्यामानानी नवीन आहे. संपूर्ण माणसाचा पूर्ण शरीराचा फोटो आणि त्यावरून माणसाची ओळख यावर काम चालू आहे. दोन संपूर्ण सारखी माणसं असूच शकत नाहीत, हे तत्त्व म्हणून आपण समजू शकतो. त्याचे अचंबित करणारे उपयोग लौकरच दृष्टीला पडतील.

ग्रीक तत्त्ववेत्ता प्लेटो यानी निरनिराळ्या चर्चांच्यात एक मुद्दा असा मांडला होता की, त्यामुळे सगळेच स्तिमित झाले. सामाजिक हिताचा विचार करून प्लेटोनी असं म्हटलं की, फक्त सक्षम, सुदृढ आणि सुंदर, बुद्धिमान लोकांनाच मूल जन्माला घालण्याचे अधिकार द्यावेत. काहींनी त्यावर असंही म्हटलं की, अपात्र लोकांना लग्नाचे अधिकारच नाकारावेत. यातली कुठचीच गोष्ट कधी मान्य

झाली नाही कारण सुदृढ, सुंदर या व्याख्यांपासून सगळ्या अडचणी निर्माण व्हायला लागल्या. पण ज्ञान मिळवण्यासाठी किती निरनिराळ्या दिशांनी तेव्हा विचार, चर्चा चालायच्या ते यावरून कळतं.

मी कोण, कशासाठी जन्मलो अशासारख्या प्रश्नांवर काही लोकांनी लक्ष केंद्रित केलं. तरी देखील सामान्य माणसाच्या रोजच्या आयुष्याला अशा गोष्टींचा काहीच उपयोग होऊ शकला नाही.

मी कशासाठी जगायचं, आयुष्यभर काय करायचं आणि काय करायचं नाही याची प्रत्येकाची यादी मनात अस्पष्ट का होईना तयार असायला हवी. पण अशा थोर लोकांची तत्त्वं समाजाला या महत्त्वाच्या ज्ञानापर्यंत पोचवू शकली नाहीत. या पुस्तकसंचात संस्कार म्हणजे काय याविषयी सविस्तर लेख आहे. पालकांनी लहान मुलांवर केलेले संस्कार, शाळेमुळे, कॉलेजमुळे होणारे संस्कार, मित्र- मैत्रिणी आणि समाज यांच्यामुळे होणाऱ्या संस्कारातून आपण काय करायचं, त्याची कारणं, काय करायचं नाही आणि त्याची कारणं ठरवण्याइतपत क्षमता सगळ्या नॉर्मल माणसांमधे असते. पण समाज अशा बधीर अवस्थेत पोचला आहे की असा विचार तो करूच शकत नाही.

स्वतःविषयी, स्वतःच्या चुका, सुधारणा यांकडे लक्ष देता यावं, म्हणजेच ध्यान करता यावं यासाठी रामनाथ गोएंका यांनी विपश्यना ही पद्धत विकसित केली. त्याचा काही लोकांना थोडासा उपयोग व्हायला लागला.

असं काही लोक ठामपणे मानतात की, प्रत्येकाला कोणीतरी गुरू असावाच लागतो. मला व्यक्तिशः हे पटत नाही. स्वतः चिंतन करून मार्ग काढण्याची क्षमता असलेल्या माणसाला गुरू लागत नाही असं मला वाटतं. आसपासची जनता ही आपली गुरुच असते.

सगळीकडे दिसणारे अध्यात्मिक गुरु इतरांपेक्षा निराळा पोषाख, पेहेराव करतात हे मला अजिबात योग्य वाटत नाही. भगवं वस्त्र तर गुरुंच्यात फार लोकप्रिय आहे. लांब केस, लांब दाढीसुद्धा तेवढीच लोकप्रिय आहे. स्वतःकडे लक्ष वेधण्यासाठी खास निराळा पोषाख यापेक्षा खास निराळे प्रगल्भ विचार हे मला जास्त योग्य आणि श्रेष्ठ वाटतात.

विचार, चिंतन, आचाराबद्दलचे निग्रह याबाबतीत महात्मा गांधी अनेक भगवी वस्त्रं धारण करणाऱ्यांच्याहून थोर होते, पण त्यांनी स्वतःला कधीच तत्त्वज्ञानी मानलं नाही. विनोबा भावेंचंही तसंच. गांधीजीदेखील साधेपणाचं आणि

नम्रपणाचं टोक होते. अशा मोठ्या लोकांनी त्यांचं तत्त्वज्ञान सोप्या भाषेत सोप्या पद्धतीनी मांडलं होतं, पण त्यांच्या नावानी रस्ते, स्मारकं, पुतळे अशाखेरीज पुढे काहीच समाजजीवनापर्यंत पोचलं नाही. गांधीनींचं वाक्य ''माझं जीवन हाच माझा संदेश आहे'' हे सर्वात मोठं तत्त्वज्ञान आहे.

तत्त्वज्ञान, मानसशास्त्र हे विषय म्हणजे ज्ञानाचं भांडार आहे. माझा अभ्यास त्या मानानी फारच थोडा आहे. पण जे ज्ञान आहे ते पुस्तकांसाठी आणि कपाटांसाठी नाही. ते थेट आपल्यासाठी आहे. त्यासाठी तर ते सोपं आणि खुलं करण्याचा हा प्रयत्न केला आहे. तत्त्वज्ञान हा विषय घेऊन भरपूर अधिकृत शिक्षण घेतलेल्या लोकांना तत्त्वज्ञानाच्या इतिहासाबद्दल माझ्या तुलनेत 100 पटींनी जास्त माहिती असणार याची मला कल्पना आहे. पण मी निराळ्याच दृष्टिकोनातून या विषयाकडे बघितल्यामुळे मी अभ्यास मंडळात उपयोगी पडणाऱ्या गोष्टीच त्यातून वेचून मांडल्या आहेत.



*संतांनी असंही म्हणून ठेवलंय्, 'निंदकाचे घर असावे शेजारी'. याचाच अर्थ विरोधी विचारांचं कायम स्वागत करावं. त्यामुळे चर्चा होते. विचारांना स्पष्टता आणि धार प्राप्त होते. आपली भूमिका समोरच्याच्या विरोधी असली तरी चालेल, पण भूमिका स्पष्ट मांडण्याजोगी आणि पक्की असावी असं ते म्हणतात.*

## 4) ज्ञान देण्याचा आणि घेण्याचा आनंद

मगाशी म्हटल्याप्रमाणे मुळात 'तत्त्वज्ञान' या शब्दाचा अर्थ ज्ञानाची भूक, ज्ञानाची आवड असा आहे. त्यामधे ज्ञान घेण्याचा आनंद याचा खूप विचार केलेला आहे. लहान मुलाला ज्याप्रमाणे नवीन गोष्ट कळल्यावर त्याचे डोळे चमकतात तसाच आपल्यालाही एखाद्या गोष्टीच्या साक्षात्काराचा खूप आनंद होतो. इतके दिवस नुसते शब्द होते, पण आज ते समजले, डोक्यात प्रकाश पडला याचं खूप समाधान असतं. हे समाधान किंवा आनंद दुसऱ्याला देण्याचाही आनंद खूप मोठा असतो.

कदाचित माहीत नसेल म्हणून हा गमतीचा शब्द इथे सांगतो. इंग्लिश भाषेत चक्क 'ब्राह्मिन' हा शब्द आहे आणि त्याचा अर्थ ज्ञान घेण्याची आणि देण्याची आवड असलेली व्यक्ती असा आहे.

ज्ञानापासून मिळणारा आनंद हा विषय समजावण्यासाठी मानसशास्त्रातल्या एका महत्त्वाच्या गोष्टीनी सुरुवात करूया. शरीराच्या तीन गरजा ह्या सर्व प्राणिमात्रांसाठी निसर्गानीच ठरवल्या आहेत. खाणं-पिणं, त्याचं पचन करणं आणि उत्सर्जन करणं. ह्या अशाच तीन गरजा प्रत्येकाच्या मनाच्याही असतात. दुसऱ्याकडून ज्ञान मिळवणं म्हणजेच दुसऱ्यांचे विचार ऐकणं, त्याच्यावर स्वतः चिंतन करणं म्हणजे ते पचवणं आणि उत्सर्जन म्हणजे जे आपल्याला कळलं ते दुसऱ्याबरोबर बोलणं. शरीराची जशी तीनपैकी एक कुठचीही क्रिया बंद पडली की पंचाईत होते तशीच मनाचीही होते. पंचाईत म्हणजे जसा शरीराचा आजार तसंच मनालाही आजारपण येतं. शिक्षांच्या प्रकारांपैकी तुरुंगातली सर्वात वाईट शिक्षा अंधार कोठडीतला एकांतवास ही समजतात, हे तुम्हाला माहिती असेलच. एकांतवासात तीनही मानसिक क्रिया बंद केल्यामुळे माणसाला वेड लागतं.

माणसाला अनेक वर्षांपूर्वी पडलेल्या एका निराळ्याच कोड्याचं उदाहरण घेऊ. पाणी निळं का दिसतं? एरवी तर पाण्याला काही रंग नाही असं वाटतं. त्याचं उत्तर असं सापडलं की, पाण्यात निळ्या आकाशाचं प्रतिबिंब पडतं म्हणून पाणी निळं असतं. एक प्रश्न सुटला पण पुढचा चालू झाला. आकाश निळं का

असतं? हे उत्तर शोधण्यासाठी विज्ञानाची मदत झाली. धुळीचे कण, वायूंचं मिश्रण आणि सूर्यप्रकाश यांच्या मिश्रणाप्रमाणे आकाशाचा रंग बदलतो. निळं, जांभळं, नारिंगी, लाल असे आकाशाचे रंग त्यामुळे दिसतात. ही गोष्ट सांगायला आत्ता आपल्याला 2 मिनिटं पुरली, पण ही गोष्ट स्पष्ट कळायला मानवाला 2000 वर्षं लागली.

एक निराळी पण संबंधित गोष्ट माहिती म्हणून सांगतो, मानवाच्या बुद्धिमत्तेचा पूर्ण विकास 16 वर्षापर्यंत होतो. त्याचमुळे वाहन चालवण्याचा परवाना 16 वर्षं पूर्ण झाली की मिळतो. सध्याच्या परिस्थितीत बहुतेक वेळा सोळाव्या वर्षापर्यंत अनेकांना ज्ञानाची गोडी लागलेलीच नसते. त्यानंतर त्यांना गोडी लागली तरी खरा ज्ञान मिळवण्याचा जास्तीतजास्त क्षमतेचा काळ ओसरलेला असतो.

ही एक कल्पना माहिती आणि ज्ञान याच्याबद्दल आहे, ती तत्त्वज्ञान, मानसशास्त्र, व्यवस्थापनशास्त्र या तीनही ठिकाणी सापडते. आपल्याला सर्व बाजूंनी भरमसाठ माहिती सारखी मिळत असते, म्हणजे नजरेला आणि कानावर पडत असते. त्यापैकी अगदी थोड्या निवडक भागावर आपला मेंदू काम करतो. बाकीचं सोडून देतो. निवडक माहितीपैकी खास गोष्टी निवडून त्यावर आपण चिंतन करून आपलं स्वतःचं त्याबद्दलचं मत ठरवतो. मग ते काही निवडक लोकांशी बोलून, ताडून बघून त्यात आवश्यक त्या दुरुस्त्या करतो. असं दुरुस्त केलेलं ते ज्ञान. थोडक्यात आधी मिळालेल्या माहितीवर एवढी प्रक्रिया झाली की त्याला ज्ञान म्हणायचं. या प्रक्रियेला बरीच वर्षं लागतात. 5 ते 10 वर्षं अगदी आरामात लागतात.

आणखी एक गोष्ट अशी की कुठचीही गोष्ट शिकताना आनंद वाटायलाच हवा. नाहीतर ती चुकीची पद्धत आहे. सध्याच्या एकूण शिक्षणपद्धतीतली ती एक मोठी उणीव आहे. ज्ञान देण्याचा आनंद माझ्या मते हजारो वर्षांपूर्वीही मिळत होता आणि अजूनही मिळतो. पण पूर्वी ज्ञान लपवून ठेवण्याची पद्धत नव्हती, ती आता रूढ झालीय्. ज्ञान चोरण्याचीही पद्धत पूर्वी नव्हती, ती आता रूढ झालीय्. आता एका लेखकानी लिहिलेला मजकूर तसाच्या तसा चोरून निर्लज्जपणी वापरलेला दुसरीकडे दिसू शकतो. असंही दिसतं की अनेक लोक आपला व्यवसाय वाढवण्यासाठी ज्ञान लपवण्याचा उद्योग करतात. अर्धवट मुद्दा मांडतात आणि उरलेल्या माहितीसाठी अपॉइंटमेंट घेऊन खाजगीत भेटायला बोलावतात.

सामान्यांना समजेल असं लिखाण मला पटतं. विद्वानांनी जड शब्दात फक्त विद्वानांनाच समजेल असं केलेलं लिखाण मला पटत नाही. 'ॲकॅडमिशियन्स'ना फक्त 'थिअरी', 'स्टॅटिस्टिकल ॲनॅलिसिस' आवडतं. ते स्वतः सोपं बोलू शकत नाहीत. दुसऱ्यानी सोपं करून सांगितलेलं त्यांना आवडत नाही. यापूर्वी मी तीन पुस्तकं लिहिली. 'घर पहावं बांधून', 'लग्न पहावं करून' आणि 'व्यवस्थापनशास्त्र तुमच्यासाठी.' या तीनही पुस्तकांमधे माझा प्रयत्न हाच आहे. पुस्तक लिहायचं ते 'कॉमन मॅन'साठी. ही पुस्तकं बरीच खपली त्याअर्थी माझा हा विचार बरोबर असावा. या माझ्या विधानांमुळे विद्वान 'ॲकॅडमिशियन्स' रागावतील. त्यांची सपशेल माफी मागण्याखेरीज आत्ता इलाज नाही.

तत्त्वज्ञानानी ज्ञानाची व्याख्या सोपी केलेली आहे. तासभर आपण एखाद्या विषयावर बोललो, पण त्यातला दोन मिनिटांचा ऐवज दुसऱ्याच्या डोक्यात शिरला, तर ती दोन मिनिटंच खरं ज्ञान मानायचं. बाकीची नुसती त्यासाठी केलेली धडपड समजायची.

दुसरं एक सध्याचं उदाहरण घेऊ.जीवनसाथ अभ्यास मंडळात लोक का येत नाहीत याची कारणं मी शोधून काढली आहेत. त्याबद्दल एक स्वतंत्र लेखही या पुस्तकसंचात आहे. अनेक कारणांपैकी एक मोठं कारण म्हणजे 'जगायचं कसं हे आम्हाला कोणी शिकवण्याची गरज नाही, आम्हाला ते कळलंय्'. एखाद्याला ते कळलंय् याची आपली खात्री कशी पटणार? त्याची खरी परीक्षा एकच. ते दुसऱ्याला समजावून सांगता येणं. 'मला कळलंय् पण ते दुसऱ्याला समजावून सांगता येत नाही', या वाक्याला काही अर्थ नाही. ज्याअर्थी हे लोक त्यांचं कारण दुसऱ्याला समजावून सांगू शकत नाहीत त्याअर्थी त्यांना ते कळलेलं नाही.

मगाशी आपण म्हणालो तसं कुठच्याही विषयाचं संपूर्ण ज्ञान कोणालाच असू शकत नाही. त्याचबरोबर पूर्णपणी स्वतंत्र, नवीन कल्पना असूच शकत नाही. ज्ञान हे संपूर्णपणी स्वतःचं असं क्वचितच असतं. इतरांचं ऐकून आपण बरेचदा बोलत असतो. वाचून, ऐकून, बघून, जुन्या वाङ्मयातून ज्ञान मिळालेलं असतं. त्यामुळे म्हणतात की, ज्ञान संपूर्ण नवीन आणि स्वतंत्र असू शकत नाही. त्यामुळे एक विचार असा आहे की, ज्ञान दुसऱ्याला देण्याचे पैसे घेणं योग्य नाही. चरितार्थासाठी शारीरिक कष्ट केले पाहिजेत. या विचारात नक्की तथ्य आहे. ज्ञानदान हे सर्वांत मौल्यवान दान असतं. बाकी सगळं त्याहून कमी महत्त्वाचं असतं. त्याचं एक सोपं उदाहरण म्हणजे प्रत्यक्ष पैसे दान देण्यापेक्षा पैसे कसे

मिळवायचे याचं दान देणं हे जास्त श्रेष्ठ मानतात.

स्पष्ट विचार केला तर हेही लक्षात येतं की, ज्ञानाच्या बाबतीत 'कॉपी राइट', 'पेटंट' या गोष्टी अस्तित्वात असल्या तरी त्यात काही तथ्य नाही. जरा शब्द बदलले, क्रम, मथळा बदलला की वाङ्मयचौर्य अगदी सोपं आहे. मला आणि शोभाला आमच्या कल्पना, लिखाण इतरांनी चोरल्याची अनेक उदाहरणं माहिती आहेत पण आमचा त्याबद्दलचा दृष्टिकोन असा आहे की, ह्या गोष्टीला आपण अडवू शकत नाही हे जर नक्की माहिती आहे तर कशाला त्रास करून घ्यायचा?

ज्ञानाची नशा असते. ज्ञान मिळवण्याच्या मागे माणूस झपाटल्यासारखा जाऊ शकतो. त्यातूनच जिद्द निर्माण होते.

शोभानी आणि मी ज्या काळात लग्न करायचं ठरवलं तेव्हा माझ्याकडे पैसे बेताचेच होते. मुळात माझी कौटुंबिक पार्श्वभूमी मध्यमवर्गीय होती. त्या काळात निर्णय घेताना शोभाचे वडील शोभाला म्हणाले, 'तुझ्या शिक्षणाचं या घरात चीज होईल.' त्यांना त्या काळात खरी महत्त्वाची गोष्ट कळली होती. आमच्या कुटुंबात खरोखरच ज्ञान घेणं आणि ज्ञान देणं याची आवड आहे.

शोभाचे वडील स्वतः फार शिकलेले नव्हते. पण त्यांना 'ज्ञान देण्याचा आणि घेण्याचा आनंद' हा विषय कळलेला होता हे नक्की.



*कुठचीही गोष्ट शिकताना आनंद वाटायलाच हवा. नाहीतर ती चुकीची पद्धत आहे. सध्याच्या एकूण शिक्षणपद्धतीतली ती एक मोठी उणीव आहे.*

## 5) डॉ. ह. ना. फडणीस यांच्याबरोबरचा अभ्यास

मगाशी सांगितल्याप्रमाणे तत्त्वज्ञान आणि विवाह याच्या अभ्यासासाठी मी आणि शोभा डॉ. ह. ना फडणीसांकडे जायचो. खूप उपयोगी प्रश्नोत्तरं आणि सहचर्चा व्हायच्या. त्यातल्या एका भागाविषयी जरा सविस्तर सांगतो. योग्य आणि अयोग्य हे ठरवणं खूप गुंतागुंतीचं असतं हे सांगण्याचा माझा उद्देश आहे. तत्त्व क्र. 1, क्र. 2, क्र. 3 अशी तीनही तत्त्वं आपल्याला पटलेली असतात, पण त्यांच्यामधून निर्णयाची वाट शोधायची असते, आणि निर्णयासाठी फार वेळही नसतो. त्यामुळे रोजच्या आयुष्यातल्या तत्त्वज्ञानाची तयारी प्रसंग घडण्याच्या आधीच करावी लागते.

मी आणि शोभा डॉ. फडणीसांपर्यंत पोचलो याचं सगळं श्रेय सध्याचे प्रसिद्ध 'सायकायाट्रिस्ट' आणि प्राजित गटाचे प्रमुख डॉ. उल्हास लुकतुके यांना जातं. जीवनसाथच्याही वाटचालीचं आणि योग्य मार्गावरच्या प्रवासाचंही बरंचसं कारण डॉ. उल्हास लुकतुकेच आहेत.

रोजच्या जीवनात उपयोगी पडणारं तत्त्वज्ञान हाच अभ्यासाचा खरा विषय असल्यामुळे रोजच्या जीवनातलीच उदाहरणं आपल्यासाठी आहेत, असा डॉ. फडणीस आणि आम्ही, दोघांचाही दृष्टिकोन होता. डॉ. फडणीसांच्या व्यवसायातलं एक उदाहरण ते सांगत होते. हॉस्पिटलमधे 2 जुळी मुलं जन्मली. त्यातलं एक लगेचच गेलं. दुसरं मूल फार अशक्त आणि कमी वजनाचं होतं. सगळ्यांचं म्हणणं होतं की, या मुलावर उपचार करू नयेत. ते तीन दिवसापेक्षा जास्त जगणार नाही. डॉ. फडणीसांना हे कळत होतं की, उपचार करूनही ते मूल गेलं तर औषधं, पैसे, वेळ सगळ्याचा अपव्यय होईल. दुसऱ्या तत्त्वाप्रमाणे प्रत्येक डॉक्टरनी घेतलेली रोग्याला जगवण्याची शपथही होती, सगळ्यांच्या बहुमताला मान देण्याचंही तत्त्व होतंच. शेवटी त्यांनी मुलावर उपचार करण्याचा निर्णय घेतला. त्या निर्णयाचं समर्थन ते समजावून सांगत होते. 'हे मूल कदाचित फक्त तीन दिवस जगेल हे मान्य आहे. पण त्या मुलाला उपचार मिळण्याचा पूर्ण नैतिक अधिकार आहे. आपण स्वतः तीन दिवसांपेक्षा जास्त जगू अशी तुम्हाला-मला तरी खात्री आहे का?'

त्यांच्याकडच्या चर्चांच्यात ध्यानधारणेचा नेमका अर्थ याविषयी माझे बरेच प्रश्न असायचे. मी निरीश्वरवादी असल्यामुळे माझ्या शंका जरा निराळ्या होत्या. डॉ. फडणीस सांगायचे की, पूर्वी काय घडलं यात माणूस रमतो. पुढे भविष्यात काय घडेल या विचारातही तो रमतो. पण सध्याच्या काळाविषयी, आत्ताविषयी तो पुरेसा विचार करत नाही. त्यामुळे ‘आत्ताच्या क्षणाकडे लक्ष देणं’ या विषयावर डॉ. फडणीसांच्या भाषणांमधे भर असायचा. ते दिलेलं लक्ष म्हणजेच ध्यान. डॉ. ह. ना. फडणीसांनी ध्यान याचा साधा अर्थ लक्ष असा सांगितला. खरोखर सध्याच्या क्षणाकडे एकाग्रतेनी लक्ष देणं अजिबात सोपं नसतं. याचाच दुसऱ्या शब्दात अर्थ ‘स्वतःबद्दल स्वतःला ज्ञान होणं’ म्हणजेच चिंतन. ईश्वराच्या अस्तित्वाबद्दलच्या वाद-प्रतिवादाचा आणि ध्यानाचा काही संबंध नाही.

भूतकाळ, भविष्यकाळ विसरून आत्ताकडे लक्ष द्यावंच लागतं अशा गोष्टी वाढवण्याचा प्रयत्न करायला हवा. एरवी आपल्या लक्षात येत नाही, पण सगळ्या कला, संगीत, नृत्य, नाट्य, चित्र, शिल्प यांमधे ही जादू असते. कुठचाही खेळ खेळताना असंच होतं. चालताना इतर विचार डोक्यात येतात पण धावताना येत नाहीत. व्यायामानीही तेच होतं.शारीरिक लैंगिक संभोगातही माणसाचं ध्यान लागतं. या सगळ्या कृतींना याच कारणासाठी साधना म्हणतात. प्रत्यक्ष मांडी घालून ध्यानाला म्हणून बसणं हा ध्यानाचा केवळ एक प्रकार आहे, पण तो एकमेव प्रकार नाही.

ज्या ज्या गोष्टींनी माणसाला विवंचनांपासून मुक्ती मिळेल ती कुठचीही गोष्ट मनःस्वास्थ्यासाठी उपयोगी पडू शकते.

ध्यानाचा आणि ईश्वरभक्तीचा काही संबंध नाही हे आमचं स्पष्ट बोलणं झाल्यामुळे माझं समाधान झालं. अनेक लोक तसा संबंध जोडतात ती गोष्ट चुकीचीच आहे.



## 6) ए. नागराज यांची मध्यस्थ दर्शनाची कल्पना

या तत्त्वचिंतकाबद्दल आणि तत्त्वज्ञानाबद्दल मी ऐकलं होतं, उत्सुकता होती, पण माहिती बेताचीच होती. या लेखात त्रोटक स्वरूपात मी जे हे लिखाण करतो आहे ते माझ्या मैत्रीतल्या तीन व्यक्तींमुळेच शक्य झालं. त्या तिघी म्हणजे आदिती संचेती, अपूर्वा संचेती आणि त्या दोघी बहिणींची आई कल्पना संचेती.

निरनिराळ्या लोकांनी कशा प्रकारे तत्त्वचिंतन केलेलं आहे, याबद्दलच्या माझ्या अभ्यासात मला एक गोष्ट सारखी दिसायला लागली. जवळजवळ सगळ्यांचा ओढा ईश्वरापर्यंत पोचण्याकडे होता. ईश्वराच्या निरनिराळ्या कल्पना करण्याचा लोकांनी प्रयत्न केला होता, पण त्यांची मूळ भूमिका ईश्वर नावाची काहीतरी अदृश्य शक्ती आहे असं मानण्याची होती.

ज्या थोड्या तत्त्वचिंतकांनी हे मान्य केलं की, ईश्वर नसण्याची शक्यता जास्त आहे त्यामुळे आपण स्वतः मानव म्हणून कसं वागायचं याच्याकडे लक्ष देऊया, त्यांपैकी नागराजजी आहेत.

बहुतेक लोकांची ईश्वर आहे का नाही हे ठरवण्याइतक्या अभ्यासाची तयारी नसते, काहींची क्षमता नसते. त्यांना स्वतः मानव असण्याच्या जबाबदाऱ्या समजून घेण्यातही रस नसतो. त्यामुळे सबंध जगात थोडेसे अपवाद सोडले तर बाकीचे लोक वस्तू, सुविधा यांच्याच मागे लागलेले दिसतात.

काहींना या वर्णनापेक्षा जास्त खोलात शिरण्याची इच्छा होती, त्यामुळे त्यांनी सबंध विश्व, अवकाश, सगळे ग्रह, तारे, निसर्ग यांना ईश्वर असं नाव दिलं, पण आपलं त्यावर काही नियंत्रण नाही हे मान्य केलं. वस्तूंना सीमा आहेत, पण अवकाशाला सीमा नाही.

याबद्दलचा सगळा अभ्यास साध्या रोजच्या शब्दात सांगण्याचं काम ए. नागराज यांनी केलंय् असं मला वाटतं. ईश्वराबद्दल बोलायला सुरुवात केली की ते सगळं गूढविद्येकडे झुकायला लागतं अशी अडचण असते. पूर्वी या अशाच कारणासाठी मी डॉ. ह.ना. फडणीस यांच्याकडे अध्यात्माचा अर्थ समजून घेण्यासाठी गेलो होतो.

मध्यस्थ दर्शनात अनेक वर्षांनी मला पटणारं काहीतरी सापडल्यासारखं

वाटलं. गेल्या अनेक वर्षांत काही गोष्टींविषयी माझा दृष्टिकोन पक्का होत गेला होता. मध्यस्थ दर्शनात ईश्वर म्हणजे आपण स्वतः अशी भूमिका प्रत्येकानी स्वीकारायला हवी असं म्हटलं आहे. निसर्गाच्या योजना समजून घेणं हाच धर्म मानल्यामुळे त्या धर्माला, हिंदू, ख्रिश्चन, मुस्लिम असं कसलंच नाव नाही. जात आणि कर्मकांडं त्यात अजिबात नाहीत, हे मला योग्य वाटलं. त्याचबरोबर खास भगवा पोषाख, माळा या गोष्टींना पूर्ण फाटा दिलेलाही मला रुचला.

हे सगळं लोकांना समजावून सांगण्यासाठी म्हणजे ज्ञान देण्यासाठी धंदेवाईक व्यापारी दृष्टिकोन नाही हेही मला चांगलं वाटलं. कारण ज्ञान संपूर्ण स्वतःचं असूच शकत नाही. एकूणच जीवनसाथचं काम आणि मध्यस्थ दर्शनाचं काम यात मला खूप साम्य दिसलं. सध्याच्या प्रश्नांवर उपाय शोधण्याची काही लोकं उपयुक्त कामं करत आहेत त्यांपैकी ए. नागराज यांचं मध्यस्थ दर्शन हे महत्त्वाचं काम मानायला हरकत नाही. आपल्या समाजाला एखादी नवीन चांगली गोष्ट पटवणं सोपं नाही हे आपल्याला माहितीच आहे. नागराज यांनी ही कल्पना चाळीस वर्षापूर्वी प्रथम मांडली. आत्ता कुठे जरा काही मोजक्या लोकांपर्यंत हे विचार पोचले आहेत.

पृथ्वीवरच्या सर्व घटकांच्या चार मुख्य अवस्था त्यांनी मांडल्या. वस्तू अवस्था-म्हणजे स्वतःचा जीव नसलेला घटक - उदा. दगड-माती, पाणी, हवा वगैरे. ही वस्तू किंवा पदार्थ अवस्था कायम टिकते, टिकेल.

वनस्पती अवस्था, म्हणजे स्वतःचा जीव असलेला पण स्वतःच्या प्रेरणेनी जागेवरून हलू न शकणारा घटक. वनस्पतीचं आयुष्य मर्यादित असतं. जातीप्रमाणे कमी-जास्त असलं तरी त्याला मर्यादा असतेच. त्याचा जीव गेला की त्याची माती होते म्हणजे त्याला पदार्थ अवस्था प्राप्त होते.

प्राणी अवस्था म्हणजे जनावरं, मासे, कीटक वगैरे. हे स्वतःहून स्वतच्या जीवाच्या आधारानी हलू शकतात. प्राणी अवस्थेलाही जातीप्रमाणे कमी-जास्त आयुष्य असलं तरी तेवढं आयुष्य संपलं की त्यालादेखील माती म्हणजे पदार्थ अवस्था प्राप्त होते. प्राणी आणि मानव यांना स्वतःचा जीव असतो. त्या ऊर्जेवर ते स्वतःहून हलू शकतात म्हणजेच त्याला चैतन्य अवस्था म्हणायचं.

आणि चैतन्य अवस्थेतली पुढची म्हणजे मनुष्य अवस्था. चैतन्य अवस्थेतल्या मानवाला इतर प्राण्यांपेक्षा खूप जास्त क्षमता असतात. निरनिराळ्या गोष्टी स्वतः समजणं आणि समजावून देणं हाच मानवाचा मुख्य गुणधर्म आहे. त्याचबरोबर

मानवाचे काही दुर्गुण आहेत. मानवाला कशामधेही तृप्ती नाही. त्याच्या अतृप्ततेमुळे, हावरटपणामुळे चुकीची समाज-व्यवस्था तयार झाली.

मानवाला काही काही गोष्टी मधून मधून लागतात तर काही सतत लागतात. जेवण चांगलं चविष्ट वाटलं तरी अखंड जेवण करता येत नाही. श्वास मात्र अखंड, निरंतर चालू असावा लागतो. तशीच मनःशांती ही सतत जरूर असलेली गोष्टी आहे, पण स्पष्ट विचारांच्या अभावामुळे मनःशांती मिळत नाही.

मानव हा चारांपैकी सर्वात बुद्धिमान, महत्त्वाकांक्षी, स्वतःचं सुख मिळवण्यासाठी इतर तीनही घटकांचं शोषण करणारा आहे. प्रत्यक्षात चारही घटक किंवा अवस्था एकमेकांवर अवलंबून आहेत. मनुष्याला बुद्धी असते त्यामुळे त्यानी पुढाकार घेऊन आग्रहानी इतर तीन घटकांचा अभ्यास आणि आदर केला पाहिजे आणि पर्यावरणाचा सर्वांगीण अभ्यास करून सगळयांचं सहअस्तित्व हे मुख्य तत्त्व मानलं पाहिजे. या सगळ्या तत्त्वाचा अभ्यास, आचरण आणि लोकशिक्षण याला त्यांनी जीवनविद्या असं नाव दिलं आहे. या मार्गानी जगणाऱ्यांचा एक गट स्थापन करून छत्तीसगडमधे ते एकत्र समूहानी राहतात. गेल्या काही वर्षांत इतरही काही ठिकाणी असे गट राहायला लागले आहेत.

सहअस्तित्वाच्या तत्त्वात आणखीन एक गोष्ट स्पष्टपणे मांडलीय् की, समाजाला तीन मानव वर्गांची जरूर आहे, त्यांनी एकमेकांच्या सहाय्यानी समाधानानी जगायचंय्. ते तीन वर्ग म्हणजे– बुद्धिमान, मध्यमबुद्धी आणि अंगमेहनत करणारे. दुसऱ्या वर्णनाप्रमाणे ते तीन वर्ग म्हणजे पैसे कमावण्याचे कसब असल्यामुळे श्रीमंत, आर्थिक मध्यमवर्गीय आणि गरीब. सगळे शिकवणारे असले तर शिकणार कोण? सगळे बुद्धी वापरण्यात फक्त तरबेज असले तर अंगमेहनत करेल कोण? अगदी शहरातल्या श्रीमंत वस्त्यांच्या आसपास त्यांच्याकडे काम करणाऱ्यांची घरं हवीतच. अंतिम अर्थ सगळ्याचा एकच निघतो. सहअस्तित्ववाद.

पृथ्वीवरच्या इतक्या प्रकारच्या प्राण्यांच्या एकूण जीवसृष्टीबद्दल असलेल्या कुतुहलामुळे आत्तापर्यंत जे विचार मांडले गेले त्यांपैकी उत्क्रांतीवाद हा एकच विचार पटण्याजोगा आहे. त्याच तर्काप्रमाणे मानव ही त्या उत्क्रांतीसाखळीपैकी शेवटची कडी आहे असं धरून चालता येईल का नाही, अशी शंका अनेकांनी काढली आहे.

मध्यस्थ दर्शनात असं गृहीत धरलं आहे की, मानवाहून प्रगत अवस्थेतला प्राणी पृथ्वीवर यापुढे कधीही असणार नाही. याचाच अर्थ पृथ्वीला विनाशापासून

वाचवण्याची जबाबदारीदेखील मानवाचीच आहे. मानवावरच्या जबाबदारीबद्दल काहीच शंका नाही. पण मानवापेक्षा प्रगत जीव निर्माण होईल का नाही हे मात्र निश्चित सांगणं कठीण आहे, असं मला स्वतःला वाटतं. इतक्या अथांग पसरलेल्या अवकाशामधे पृथ्वीसारखा जीवसृष्टी असलेला दुसरा ग्रह असणं शक्य आहे. तिथे निर्माण झालेल्या जीवांपैकी एखादा जीव मानवापेक्षा प्रगत अवस्थेत असणं अशक्य नाही. खुद्द पृथ्वीवर मात्र सध्याचा मानव इतका जागरूक आहे की, आपल्यापेक्षा वरचढ प्रजातीला तो मान्य करणार नाही. त्यामुळे पृथ्वीपुरतं बोलायचं तर, मानव हे उत्क्रांतीसाखळीमधलं टोक आहे हा विचार पटतो. त्यामुळे मानवावर जबाबदारीनी वागण्याची भिस्त आहे.

अशा प्रकारच्या निरनिराळ्या विषयांवरच्या चर्चांचं मुख्य मर्म असं आहे की, मानवाच्या सततच्या कुतुहलामुळे प्रत्येक गोष्टीचं कारण कळलं तरच मानवाला समाधान मिळेल हे आपल्याला माहिती आहे. सतत नवीन प्रश्न निर्माण होतील आणि त्या प्रश्नांची उत्तरं शोधण्याची खटपटही सतत चालू राहील. ही अनेक अर्थांनी चांगली गोष्ट आहे.

हजारो वर्षांपूर्वी जेव्हा वैद्यकशास्त्राचा तत्त्वज्ञानातून जन्म झाला तेव्हा प्रथम माणसाच्या शरीराचा आणि निसर्गचक्राचा अभ्यास करावा लागला. नागराज यांच्या सहअस्तित्ववादाचं म्हणणं तसंच आहे. विश्वाचा एक भाग सूर्यमाला, त्यातला एक ग्रह पृथ्वी. पृथ्वीवरची आपण मानलेली पंचमहाभूतं, पृथ्वी (म्हणजे भूगर्भ), आप (समुद्र), तेज (सूर्यप्रकाश), वायू (हवा, त्यातला प्राणवायू आणि इतर वायू), आकाश (ढग, पाऊस) यांच्या अभ्यासाशिवाय तर आपलं अस्तित्वच राहणार नाही. शिवाय वनस्पती, प्राणी, जलचर, पक्षी, कीटक आणि त्यांच्यातलाच एक मानव. यामधल्या मानवानी स्वतःला सर्वशक्तिमान समजल्यामुळे खूप घोटाळे करून ठेवलेले आहेत.

समाधान मिळवण्याच्या या वाटचालीत बहुतेक लोकांच्या डोक्यातली एक गैरसमजूत काढण्याची जरूर आहे. मध्यस्थ दर्शनात हिंदी भाषेत त्याचं थोडक्यात वर्णन असं केलेलं आहे– 'सामानसे सम्मान नही, और सुविधासे समाधान नही.' खरोखरच मालमत्ता, पैसे, वस्तू, उपकरणं यांच्या मागे हावरटपणानी लागलेली अनेक माणसं आपण बघतो तेव्हा हे विशेष जाणवतं.

अशा अनेक कारणांमुळे एक सत्य समोर येतं की, इतर कुठच्याही प्राण्यावर विश्वास ठेवायला हरकत नाही, कारण तो ठराविक प्रकारानीच वागतो.

मात्र मानवावर विश्वास ठेवता येत नाही. प्रत्यक्षात माणसाची मूळ प्रवृत्ती शोधली तर ती खरं बोलण्याची, खरं वागण्याची आणि पारदर्शी आहे, पण त्याच्यापासून माणूस दूर चालला आहे. सगळी माणसं हे सगळं समजून घेऊन बदलली आणि समजूतदारपणी जबाबदारीनी वागायला लागली तर इतक्या बिघडलेल्या अवस्थेलाही सुधारता येईल.

नागराजांच्या सहअस्तित्ववादाचा दावा आहे की, अजूनही आपण हे घोळ निस्तरू शकू. मानवी शरीर आणि निसर्गचक्राच्या अभ्यासात झोप, शारीरिक कष्ट, किती मेहनत, किती विश्रांती याची प्रमाणंही ठरवली होती. हजारो वर्षांत त्या मूळ प्रमाणात काही फरक नाही आणि भविष्यातही होणार नाही. विश्रांती कमी झाली तरी त्रास होतो, जास्त झाली तरी त्रास होतो. याचा सुवर्णमध्य काय हे शास्त्राला माहीत आहे, पण मानव त्याबाबतीतही जास्त शहाणपणा करून स्वतःची पंचाईत करून घेतो.

क्रिकेट भारतातला सर्वांत लोकप्रिय आणि चर्चेतला खेळ म्हणून त्याचं उदाहरण घेऊ. लागोपाठ फार क्रिकेट खेळल्यामुळे वाईट परिणाम झाला हे आपण ऐकतो-वाचतो, त्याचबरोबर क्रिकेटच्या दोन डावांच्यात, दोन सामन्यांच्यात फार खंड पडल्यामुळे खेळ खराब झाला असंही ऐकतो. सगळे खेळ, सगळे कार्यक्रम निसर्गचक्राविरुद्धच चालू असतात.

मध्यस्थ दर्शनात स्पष्ट विचारांच्या सहाय्यानी अभ्यास याच जीवनसाथसारख्या मार्गानी चालतो. नात्यांचे निरनिराळे प्रकार समजून घेऊन त्यातली योग्य वागणूक कशी असावी याविषयी वाचन, चर्चा चालतात. नात्यांचे मुख्य प्रकार असे– नवरा-बायको, पालक-मुलं, भावंडं, मित्रमैत्रिणी, गुरु-शिष्य, मालक-नोकर, अनोळखी जनता आणि अर्थात यापलीकडच्या संपूर्ण विश्वाशी आपलं असलेलं नातं याचा अभ्यास. जीवनसाथमधे चालणाऱ्या अभ्यास मंडळाची विचाराची पद्धत अशीच असल्यामुळे मला मध्यस्थ दर्शनाचे सगळे प्रयत्न म्हणजे समानधर्मीयांची धडपडच वाटते.

जीवनविद्यामधला एक विचार मला पटलेला आहेच आणि तो खूप महत्त्वाचा आहे. सामान्य माणूस म्हणून जगण्यात सर्वांत समाधान, सुख आणि स्वस्थता आहे. प्रसिद्धीच्या, पैशाच्या मागे लागलं की घोटाळ्यांना सुरुवात होते. व्यवस्थित लग्न करून, बायको-मुलांबरोबर संसार करावा. एकांतात, जंगलात, पर्वतावर जाऊन तपस्या करण्यापेक्षा ते जास्त समाधान देणारं आणि अर्थपूर्ण आहे.

सध्याच्या भारतातल्या, जगातल्या कायद्याबद्दल मध्यस्थ-दर्शनामधे टीका केलेली आहे. समाजाच्या प्रथेविरुद्ध, कायद्याविरुद्ध वागून कोणी हिंसा केली तर सध्याचा कायदा त्या व्यक्तीला शिक्षा करण्याच्या हेतूनी अधिक हिंसा करतो. हिंसेला जास्त हिंसेनी सुधारण्याची ही कल्पना त्यांना चुकीची वाटते. 'सुधार-गृह', स्पष्ट विचार, थोडक्यात ज्ञानमार्गानीच सुधारणा शक्य आहे असं मध्यस्थ दर्शनात सांगितलं आहे.

मला स्वतःला मात्र असं वाटतं की भक्ति-मार्ग, ज्ञान-मार्ग, हिंसा-मार्ग यांपैकी कुठच्याही प्रकारानी सुधारण्याच्या पलीकडच्या खूप बिघडलेल्या टप्प्यावर मानवजात, सबंध जग, भारत पोचलेला आहे. मी माझी याबद्दलची निराशा व्यक्त करतोय्, त्याचबरोबर अखेरपर्यंत सुधारणेचा योग्य मार्ग शोधण्याची माझी आशावादी धडपडही चालू ठेवणार आहे.



# 2

# पर्यावरण - साधी राहणी आणि आरोग्य वगैरे

## 1) पर्यावरणाशी निगडित तत्त्वचिंतन

आपण पूर्वी बोललो आहोत की तत्त्वज्ञानापासूनच इतर सगळे विषय विकसित झाले. त्यामुळे त्या सगळ्या विषयांचा एकमेकांशी संबंध आहे. तसेच आपल्या शरीराचे सगळे अवयव स्वतंत्र दिसले तरी एकमेकांवर अवलंबून असतात. सगळे अवयव आतून जोडलेले असतात. रक्तवाहिन्यांनी, मज्जारज्जूंनी, स्नायूंनी इतकी जोडाजोड असते की अनेक वर्षांच्या अभ्यासानंतर 'ॲक्युप्रेशर, ॲक्युपंक्चर' ह्या पद्धती उपचार म्हणून विकसित झाल्या. अशाच तऱ्हेनी मानसिक स्वास्थ्य आणि शारीरिक स्वास्थ्य एकमेकांवर इतकं अवलंबून आहे की, अनेक शारीरिक विकारांना 'सायकोसोमॅटिक' गटात टाकलेलं आहे. आजच्या विषयाचंही तसंच आहे, पर्यावरण, साधी राहणी आणि आरोग्य हे विषय पूर्णपणे एकमेकांत गुंतलेले आहेत.

या पुस्तकसंचामधे 'ई.क्यू' या विषयावर स्वतंत्र लेख आहे, पण त्यातला हा मुद्दा 'विवाह, रोजचं आयुष्य आणि तत्त्वज्ञाना'मधे मुद्दामून घेतलेला आहे. एकेका माणसाची किती व्यापक विचार करता येतो याची क्षमता आणि वृत्तीही असते. समानता हे मूल्य अनेकांना कळतं, पण ते किती व्याप्तीपर्यंत अमलात आणायचं याबद्दल फरक आढळतो. जेवढी कुटुंबाची मिळकत असेल त्यामधे जेवढ्या सुविधा परवडतील त्यांची सबंध कुटुंबात समानतेनी वाटणी करू, कुटुंबात पाच माणसं असतील आणि पाच भाकऱ्या असतील तर त्यांची समान वाटणी करून खाऊ, इथपर्यंत अनेकांची समज पोहोचलेली असते. त्यापलीकडचा

विचार सरकारनी करावा असं गृहीत असतं आणि करआकारणीद्वारे सरकार तसे प्रयत्नही करतं.

पण सबंध शहरात पाणीटंचाई आहे तर आपण पाणी समानतेनी वाटून घेऊ हे लोकांना जमत नाही. सहलीला गेलेला एक छोटा गट हे करू शकतो. एकाच बाटलीत अनेक जण घोटघोट पाणी पिऊन तहान भागवतील. पण हे फक्त परिचितांसाठी. संपूर्ण गावाचा विचार आणि प्रत्येक सुविधेची न्यायपूर्ण वाटणी हे तत्त्व फार कमी लोक अमलात आणू शकतात. असाच विचार आणखी मोठ्या विभागासाठी केला तर राज्य, देश, खंड, पृथ्वी हे त्याचे टप्पे होतात. महात्मा गांधींएवढ्या मोठ्या माणसानी असं म्हटल्याचं मला माहिती आहे, 'भारतातल्या गरीब माणसाला जेवढं वस्त्र परवडतं तेवढंच मी वापरीन.' असं म्हणून त्यांनी धोतर हे एकवस्त्रव्रत स्वीकारलं.

या साधेपणाचं मूलतत्त्व आणि पर्यावरणाचा म्हणजे सबंध पृथ्वीचा अभ्यास या एकच गोष्टी आहेत. मी आणि शोभा यांची राहणी अगदी साधी असते आणि त्याचा आम्हाला अभिमान वाटतो. आमच्या ओळखीत काही लोक आहेत की, जे पर्यावरणतत्त्वांचं बऱ्याच प्रमाणात पालन करतात. या लोकांनी खाजगी वाहनं, विशेषतः पेट्रोल पिणारी वाहनं यांचा वापर सोडून दिला. ते राज्यपरिवहन मंडळाच्या लाल गाडीनीच प्रवास करतात. जवळच्या अंतरांना सायकल वापरतात. फक्त सुती आणि मोजकेच कपडे वापरतात. मी आणि शोभा इच्छा असूनही हे अमलात आणू शकत नाही. आमची दोघांची वयं आणि तब्येती लक्षात घेतल्या तर आम्हाला पेट्रोलवर चालणारी चारचाकी गाडी, ड्रायव्हर किंवा ऑटोरिक्षा अटळ दिसतात.

ज्या कारणांमुळे पर्यावरण हा विषय महत्त्वाचा आहे ही गोष्ट सर्वसामान्य माणसाच्या कानावर पडायला लागली ती कारणं म्हणजे शुद्ध हवा, पाणी, अन्न अशा अत्यावश्यक गोष्टी मिळेनाशा झाल्या. जगभर अनेक लोक खडबडून जागे झाले आणि यासंबंधित प्रश्नांचा अभ्यास करायला लागले. अजूनही कित्येकांना पर्यावरण म्हटल्यावर झाडं लावणं आणि जिकडे तिकडे हिरवा रंग वापरणं एवढंच कळतं.

काही वर्षांपूर्वी डॉ. वसंत गोवारीकरांनी एक लेख लिहिला होता, त्यामधे पर्यावरण ही गोष्ट सबंध अवकाशातल्या हालचालींवर कशी अवलंबून असते हे व्यवस्थित समजावून सांगितलं होतं. विशिष्ट दिवशी काही लोकांनी एकत्र जमून,

काही झाडं लावली तर ते चांगलंच आहे. पण आपण पर्यावरणासाठी खूप काहीतरी केलं आहे अशी समजूत करून घेऊ नये. कारण अवकाशातल्या घडामोडी ज्या प्रमाणात ज्या आकाराच्या घडत असतात त्या तुलनेत आपली एक टेकडी आणि तिच्यावरची झाडं म्हणजे एका कणाएवढी आहेत. खरोखर काही बदल घडायला हवा असेल तर त्यासाठी पृथ्वीवरच्या सगळ्यांनी जीवनशैलीत बदल घडवायला हवा आणि तशी काहीशे वर्षं जायला हवीत. त्यामुळे ज्यांना पर्यावरण सुधारणेची योग्य दिशा कळली आहे त्यांनी यापुढचं आयुष्य, त्यासंबंधीचा अभ्यास, आचरण आणि प्रसार यात घालवायला पाहिजे.

मानवानी करून ठेवलेले पर्यावरणीय घोटाळे एवढे आहेत की, सगळ्यांनी मिळून या खोट्या प्रगतीच्या गाडीचा 'रिव्हर्स गिअर' टाकणं फार कठीण आहे. जगातल्या इतर अनेक देशांतलं हवामान, सुपीक जमीन, शुद्ध पाण्याची उपलब्धता, पाऊस, सूर्यप्रकाश यांची परिस्थिती आणि भारताला लाभलेली निसर्गाची याबाबतीतली देणगी ह्यांची तुलना केली की जगातले इतर लोक भारताबद्दल म्हणतात, 'भारत हा एक श्रीमंत देश आहे आणि त्यात गरीब लोक राहतात.'

मानवाव्यतिरिक्त इतर प्राण्यांना जेवढा निसर्ग समजतो त्या तुलनेत मानवाला अनेकपटींनी बुद्धी जास्त असून निसर्ग मात्र समजत नाही हे गेली अनेक वर्षं सिद्ध झालेलं आहे. जनावरं भुकेपेक्षा जास्त कधीच खात नाहीत. ज्या प्रकारचा प्राणी जे खाद्य निसर्गनियमानी खातो त्यापेक्षा निराळं काही खात नाही. शाकाहारी प्राणी मांसाला तोंड लावत नाहीत. मांसाहारी प्राणी गवताकडे बघतही नाहीत. या सगळ्याचा परिणाम म्हणजे जनावरांना एकूण आजार कमी, रोगांची यादीच छोटी. रक्तदाब आणि मधुमेह हे दोन विकार माणसात कितीही प्रमाणात असले तरी जनावरांना होत नाहीत. अगदी नुकतीच बातमी वाचली की, पाळीव प्राण्यांना विशेषतः शहरातल्या पाळीव मांजरं, कुत्री यांना मधुमेह आढळायला लागलाय. शहरात मिळणाऱ्या हवा, अन्न, पाणी जीवनशैली याबद्दलचंच हे निरीक्षण आहे.



## 2) साधी राहणी

साधी राहणी याचा अर्थ असा नाही की, चारचौघांसारखं पारंपरिक चालीरीती पाळून जगायचं. आधुनिकतेच्या म्हणजेच खऱ्या प्रश्नांच्या आणि खऱ्या उत्तरांच्या शोधाच्या मागे तर सतत राह्यलाच पाहिजे. चालीरीती डोळ्यांना दिसतात, अनुकरण करायला सोप्या असतात. त्यांच्या मागची मूल्यं डोळ्यांना दिसत नाहीत त्यामुळे ती समजत नाहीत. बुद्धीचे कष्ट आणि शरीराचे कष्ट हे अखंड करत राह्यला हवेत. बुद्धीच्या कष्टाची सवय गेली तरी ती शिथिल होते. शरीराचे कष्ट थांबले तरी त्याला शिथिलता येते. 'स्वावलंबन आणि साधी राहणी' या मूल्याची समजच याबाबतीत खरी उपयोगी पडते.

माणसं जी निरनिराळी कामं करतात, उद्योगधंदे करतात त्यांचे तीन प्रकार समजतात. इंग्रजीत 'प्रायमरी, सेकंडरी आणि टर्शरी.' म्हणजे अत्यावश्यक, अत्यावश्यक गरजांशी संबंधित पण दुय्यम आणि अत्यावश्यक गरजांचा काही संबंध नसलेला तिय्यम प्रकार.

अत्यावश्यक गरजांसंबंधी म्हणजे हवा, पाणी, अन्न यासंबंधीचं काम, त्या गरजांशी संबंधित म्हणजे त्यांची वाहतूक, व्यवस्थापन, वितरण करणारे म्हणजे दुय्यम प्रकारचं काम आणि बाकी सगळं म्हणजे तिय्यम प्रकारचं काम. ही तिय्यम प्रकारची कामं पहिल्या दोन प्रकारांकडे झालेल्या दुर्लक्षामुळे निर्माण झालेली असतात. शहरात तर फक्त तिय्यम प्रकारची कामं करणारेच नव्याण्णव टक्के लोक राहतात. माझा बांधकामाचा पूर्वीचा व्यवसाय, सध्याचा समुपदेशनाचा व्यवसाय, सगळे डॉक्टर्स, वकील, टॅक्स कन्सल्टंटस् हे सगळेच लोक तिसऱ्या गटातलं काम करतात. शोभा करते ते बालरंजन केंद्राचं काम दुसऱ्या गटात असं म्हणता येईल. बाकीचे सगळे सॉफ्टवेअर इंजिनीयर्स, चित्रकार, नर्तक, तमाम लोक तिसऱ्या गटात आहेत.

बैठी घरं, त्याचा जगाच्या पातळीवरचा आढावा, त्याचे फायदे हे सगळं मला तर माझ्या टाउन प्लॅनिंगच्या औपचारिक शिक्षणामुळेच माहिती आहे. शोभाला माझ्यामुळे माहिती आहे. आम्ही दोघांनी आमच्या परीनी या दिशेनी बरेच प्रयत्न केले पण ते आम्हाला जमलं नाही. शहरी सुविधांची सवय म्हणजे

व्यसनांसारखी आहे. त्यातून सुटका होणं कठीणच असतं. मुद्दामून ठरवून गरजा कमी करणं याला 'डी-क्लासिंग' असा शब्दप्रयोग रूढ आहे. आमच्या ओळखीत असे अगदी कमी लोक आहेत आणि त्यांचं मला आणि शोभाला खूप कौतुक आहे. पर्यावरणवादी जीवनशैली, साधी राहणी, त्याचा अभ्यास-प्रसार हेच आयुष्याचं ध्येय मानलेली काही लोकं आमच्या ओळखीची आहेत, त्यांचंही आम्हाला खूप कौतुक आहे.

आमचा मुलगा शोनील पर्यावरण याच विषयात डॉक्टरेट करून इंग्लंडमधे ऑक्सफर्ड विद्यापीठात काम करतो. तो शिकवतो आणि जागतिक पातळीवरच्या पर्यावरण प्रश्नांबद्दल उपायांचं संशोधन करतो. तो ऑक्सफर्डजवळच्या एका उपनगरात बैठ्या घरात राहतो, सायकलचा भरपूर वापर करतो. चारचाकी गाडीचा वापर अगदी आवश्यक तेवढाच करतो. अगदी साधे, बिनइस्त्रीचे सुती कपडे वापरतो. त्याची बायकोही तशीच आहे. त्या दोघांचंही आम्हाला कौतुक आहे.

आमच्या ओळखीच्या दोघी तरुण मुली सेंद्रीय शेतीचे प्रयोग करण्यात गुंतल्या आहेत. त्यांचंही काम आम्ही खूप जवळून बघितल्यामुळे आम्हाला त्यांची कमाल वाटते.

मी आणि शोभा पर्यावरणाचे मध्यम अभ्यासक आहोत पण अशा बघितलेल्या अनेक कामांचा, माझ्या आर्किटेक्चर, बांधकाम, टाउन प्लॅनिंग, व्यवस्थापन, मानसशास्त्र आणि तत्त्वज्ञान यातल्या अनुभवाचा, शोभाच्या मुलांच्या क्षेत्रातल्या अनुभवाच्या एकत्रित ज्ञानाचा आम्हाला खूप फायदा होतो.



## 3) स्वच्छता

तत्त्वज्ञानाच्या प्रवासाच्या टप्प्यात स्वच्छता आणि प्रतिकारशक्ती याचाही अनेक वर्षं अभ्यास झाला. वैद्यकीय शाखेत त्याला 'इम्यूनॉलॉजी' असं नाव सध्याच्या काळात वापरतात. त्यातलं सामान्य माणसापुरतं सोपं तत्त्वज्ञान असं आहे. स्वच्छता ही चांगलीच गोष्ट आहे. त्याचा अतिरेक झाला तर शरीराला कुठच्याच जंतूंची सवय राहात नाही. त्याचं सोपं उदाहरण म्हणजे स्वच्छ विलायती पाणी पिण्याची सवय झालेला माणूस भारतात आला आणि त्यानी इथलं पाणी प्यायलं की त्याचं पोट बिघडतं. दुसरं महत्त्वाचं उदाहरण म्हणजे लसीकरण. विशिष्ट रोगाचे जंतू मुद्दामून शरीरात घालायचे म्हणजे या जंतूंविरुद्ध प्रतिकारशक्ती तयार होते.

या गोष्टी सांगण्याचा उद्देश एवढाच आहे की, अस्वच्छतेनीही तब्येतीला त्रास होतो आणि अतिस्वच्छतेचाही त्रास होतो तर याचा सुवर्णमध्य कोणता हे सर्वसामान्यांना समजावं. त्यातल्या लक्षात ठेवण्याच्या आणि पाळण्याच्या गोष्टी एवढ्याच आहेत. फक्त तीन गोष्टी.

1) कुठचाही पदार्थ हातानी खाताना-पिताना हात स्वच्छ धुवावेत. साबण असला नसला तरी एवढा फरक पडत नाही. खाल्यानंतरदेखील हात धुवावेत. 2) शौचाला जाऊन आल्यावर साबणानी हात धुतलेच पाहिजेत. 3) लघवीला जाऊन आल्यावर लघवीचा स्पर्श हाताला झाला असला तर हात धुवावेत.

मातीत मुलं खेळण्याची पालकांना जी भीती वाटते ती तर घोर गैरसमजूत आहे. मातीमुळे मुलं उलटी टणक होतात. थोडं खरचटणं, कापणं ह्या गोष्टीदेखील मुलांची प्रतिकारशक्ती वाढवतात. आजारी असतानाची गोष्ट वेगळी. याहीपेक्षा जास्ती काळजी घेण्याची जरूर असू शकते, पण ते आजारावर अवलंबून आहे आणि ते वैद्यकीय क्षेत्रातल्या व्यक्तींनी ठरवावं. पण एरवी एवढं ज्ञान पुरेसं आहे. साबण, डिटर्जंट यांचा अतिवापर ही अगदी चुकीची गोष्ट अनेकांच्या मनात ठसलेली आहे. त्याचा वापर पहिल्यांदा कमी करावा.



# 4) आरोग्य आणि व्यायाम

तत्त्वज्ञानाच्या विचार-प्रवासात मन म्हणजे नेमकं काय, ते कुठे असतं अशा गोष्टींवर भरपूर काथ्याकूट झाला. अजूनपर्यंत याचं उत्तर कोणाला सापडलेलं नाही. काही लोकं असं मानतात की शरीर आणि मन एकच असतं. मला स्वतःलाही असंच वाटतं. काही लोकं म्हणतात की शरीर नेहमी खरं बोलतं. मन मात्र खोटं बोलतं. शरीर म्हणतं, हा पदार्थ आणखीन नको, त्रास होईल. मन म्हणतं, याची चव छान आहे त्यामुळे आणखी खाऊया. माझ्या मते मन म्हणजे मेंदूच. त्यामधे विचार आणि भावना असे दोन कप्पे असतात.

आरोग्य या विषयाचा एकूण विचार करताना व्यायाम हा खरं म्हणजे खूप महत्त्वाचा विषय आहे पण एकूण सबंध भारतीय समाजाचं त्याकडे फार दुर्लक्ष झालेलं आहे. तुमच्या मनात लगेच विचार येईल की, शहरात एवढ्या 'जिम' दिसतात, त्यांच्या एवढ्या 'फिया' असतात, एवढी लोकं तिकडे जाताना दिसतात याअर्थी लोकांना व्यायामाची खूप आवड असली पाहिजे. एका विशिष्ट वर्गापुरतं हे खरं आहे, पण एकूण जनतेचा विचार केला तर व्यायाम करणारे फार कमी प्रमाणात आहेत.

शहरांमधल्या कष्टकऱ्यांचा व्यायामावर विश्वास नाही. त्यांना वाटतं, ते जे काम करतात तो व्यायामच समजायचा. डॉक्टर लोकांना औषधांची खूप माहिती असते, पण आहार आणि व्यायाम यांबद्दल पुरेशी माहिती नसते. मला गेली अनेक वर्षं कंबरदुखीचा त्रास आहे. लिखाणाचं प्रमाण जास्त असलं की मानदुखीचाही मला त्रास होतो. निरनिराळ्या अनेक डॉक्टरांना मी यासाठी भेटलो, पण खात्रीशीर उपाय सापडला नाही.

हे जे जीवनसाथच्या कार्यशाळेच्या पुस्तकांचं काम मी गेले पावणे दोन वर्षं करतोय त्यात पहिल्या काही दिवसांतच माझ्या लक्षात आलं की कंबर आणि मान मला हे काम करू देणार नाहीत. मग मी व्यायामाचे दोन प्रकार शोधून काढले, करून बघितले आणि काही काळानंतर माझा प्रश्न संपला. आता मी रोज 16 तास पुस्तक प्रकरणात असतो. त्यांपैकी साधारण 2-3 तास माझे व्यायामात जातात. जेवण-चहा वगैरेंमधे आणखी एक तास जातो. पण मी रोज 12 तास

पूर्ण एकाग्रतेनी काम आणि समुपदेशन करू शकतो इतके ते दोन व्यायाम परिणामकारक आहेत. हे व्यायाम मला डॉक्टरांनी सांगायला हवे होते, पण तसं झालं नाही. ही गोष्ट माझ्या बुद्धीला पटलेली नाही. ते दोन व्यायाम मी इथे सांगतो आहे, कारण कंबरदुखी आणखी मानदुखी यांनी बेजार झालेली खूप माणसं आहेत.

साधी चटई, सतरंजी असं काहीतरी अंथरून उताणं झोपायचं. कंबरेखाली उशी ठेवून उताणं काही काळ झोपायचं. मी दहा मिनिटं झोपतो. प्रत्येकाला करून बघून हा वेळ ठरवावा लागेल. त्यानंतर खांद्याखाली उशी ठेवून मान खाली लटकू द्यायची. ताण जास्त वाटला तर थोडा मानेचा भाग उशीवर सरकवायचा. असं काही काळ पडून राहायचं. मी पाच मिनिटं करतो. हे 15 मिनिटांत होणारे दोन्ही व्यायाम मी दिवसातून साधारणपणे दोनदा किंवा तीनदा करतो. या व्यायामाच्या वेळी डोळे मिटून त्याच्यावर ओला कापूस, काकडीच्या चकत्या ठेवून डोळ्यांनाही विश्रांती देता येते.

पहाटे, जेवणाआधी आणि रात्रीच्या जेवणाआधी अशा तीन वेळांची मी शिफारस करतो. कोणी हे व्यायाम करून बघायचे ठरवले तर 15 दिवसांत फरक जाणवेल, त्याआधी नाही एवढं मात्र ध्यानात ठेवा.

खांदे, पाठीचे फरे यांचाही मानेशी जवळचा संबंध असतो. खांद्याच्या व्यायामानीही मानदुखी थांबते. मी म्हणतो तो खांद्याचा व्यायाम सांगतो. उभं राहून दोन्ही हातात दोन बाजूंना वजन मुठीनी पकडायचं आणि खांदे उचलून धरायचे. मी 5 कि.चे डंबेल्स वापरतो. वय उंची याप्रमाणे वजनाचा निर्णय घ्यावा. डंबेल्सना काही महत्त्व नाही. कुठचंही वजन चालेल. दोन्ही बाजूंना सारखं वजन मात्र पाहिजे. अगदी वाळू भरलेल्या दोन पिशव्याही चालतील.

माझं वय 72 आहे आणि मधून मधून गुडघे दुखतात. सांध्यांच्या दुखण्यांचं एक मला सापडलेलं तत्त्व इथे सांगतो. जो सांधा दुखतो त्याच्या अलीकडचा आणि पलीकडचा न दुखणारा सांधा शोधून त्याचा व्यायाम करायचा. मधल्या दुखणाऱ्या सांध्याचा व्यायाम करायचा नाही, पण शेजारच्या सांध्यांच्या व्यायामाच्या वेळी त्याला जो किंचित व्यायाम होतो त्याचा हळूहळू फायदा दिसायला लागतो. मी गुडघा दुखला की घोटा आणि माकडहाडाच्या सांध्यांचा असा व्यायाम करतो. हमखास फायदा होतो. काही दिवसांनी गुडघा सुधारला की मग गुडघ्याचा व्यायाम मी सुरू करतो.

मी सांगतोय ते सगळं किरकोळ तक्रारींसाठी ऊठसूट डॉक्टरांकडे जायला लागू नये इथपतच आहे. यापेक्षा निराळी किंवा जास्त अडचण असली तर अर्थातच डॉक्टरांना गाठायला हवं.

व्यायाम या विषयीचा शास्त्रशुद्ध अभ्यास केलेले सांगतात की, पायावर ताठ उभं राहून चालणारा फक्त मानव हा एकच प्राणी आहे आणि ताठ उभं राहण्यामुळे, चालण्यामुळे त्याच्या कंबरेवर ताण येतो. जनावरांची कंबर कधी दुखत नाही, रांगणाऱ्या लहान मुलाची कंबर दुखत नाही. माणसानी ठरवून मधून मधून रांगण्याचा व्यायाम केला तर कंबरदुखीला आराम मिळतो. मी स्वतः असं करतो नि मला त्याचा खूप फायदा होतो.

आणखी एक व्यायामाचा उत्तम प्रकार म्हणजे झाडावर चढणं. शहरात चढण्याजोगी झाडंच शिल्लक नाहीत. गावात झाडं आहेत, पण शहरी लोकांच्या अनुकरणानी गावातले लोक भारलेले असल्यामुळे बहुतेकांनी झाडावर चढणं सोडून दिलं. जे लोक रोज चढतात ते बऱ्याच वयापर्यंत चपळ राहतात, आरोग्यपूर्ण आयुष्य जगतात. शरीरातला एकही अवयव झाड चढण्याच्या व्यायामात सुटत नाही. मी म्हणतो, अजून ज्यांना शक्य आहे त्यांनी करून बघावं. झाड शोधायचं आणि रोज एकदा जमेल तेवढं चढून उतरायचं.

आता माझ्या स्वतःच्या व्यायामाबद्दल एवढं सविस्तर सांगण्याचा उद्देश सांगतो. वय वाढलं की झोपेची तक्रार सुरू होते. मधूनमधून झोपेच्या गोळ्यांची जरूर भासते. हळूहळू त्यांची सवय लागते. मलाही लागली होती.

सकाळी चार वाजता मी या पुस्तकांच्या निमित्तानी उठायला लागलो. रोज आत्ता आपण बोललो तो व्यायाम मी करतो. दिवसभर लिखाण, मधे 'काउन्सेलिंग' असं करून रात्री साडेनऊला मी काम थांबवतो. साडेनऊ - पावणेदहा ते दहा शोभाबरोबर थोडं बोलतो, किंचित टी.व्ही. बघतो. दहा वाजता झोपतो. झोपण्यापूर्वी दुसऱ्या दिवशीच्या पहाटे चार वाजताचा गजर लावून झोपतो आणि पाच मिनिटांत झोप लागते. माझी झोपेची गोळी या चार ते दहाच्या वेळापत्रकामुळे बंदच झाली.



# 5) वैद्यकीय क्षेत्र आणि सामान्य माणूस

वैद्यकीय क्षेत्रातली प्रगती हा मुळातला तत्त्वज्ञानातलाच भाग होता. जसंजसं एकएक शास्त्र निराळं झालं तसं त्याचं निराळं नाव रूढ झालं. भारतात सध्यादेखील अनेक वैद्यकीय उपचारांच्या पद्धती वापरतात, पण त्यांतल्या तीन मुख्य प्रकारांची परिस्थिती बघू. मी स्वतः डॉक्टर नसल्यामुळे माझा दृष्टिकोन म्हणजे सर्वसामान्य माणसाचा दृष्टिकोन आहे.

1) ॲलोपथी – जास्तीत जास्त वापरात असलेली, पाश्चात्त्यांकडून उचललेली ही पद्धत एका विशिष्ट पद्धतीनीच विचार करते. विकार आणि त्यावरचा उपाय. त्या औषधांचे इतर अवयवांवर, शरीर क्रियांवर जे परिणाम होतात त्यासाठी आणखी औषधं. आहार आणि व्यायाम यांच्याकडे ॲलोपथीमधे पुरेसं लक्ष दिलं जात नाही हे आपण मगाशीच बोललो.

2) आयुर्वेद – भारतामधे हजारएक वर्षं अनेक पिढ्या चालत आलेली ही विद्या आहे. संपूर्ण जीवनशैली, आहार, औषधं यांच्यावर खूप अभ्यास आणि निरीक्षणं यांच्यावर आधारलेल्या या वैद्यकशाखेच्या परिणामकारकतेबद्दल प्रश्नच नाही. भारतापुरता विचार केला तर याचा बराच प्रसार झालेला आहे, पण जगात इतरत्र याची फारशी माहिती नाही.

स्वतः ॲलोपथीची अनेक वर्षं प्रॅक्टिस करणारे एक वयस्कर डॉक्टर बरेच आजारी पडले. ॲलोपथीत निदान होईना म्हणून माझ्या ओळखीच्या एका खूप ज्ञानी आयुर्वेदाचार्यांकडे त्यांना दाखवायला नेलं. त्यांनी पहिल्यांदा चालू असलेली सगळी औषधं बंद करून त्यानंतर 15 दिवसांनी यायला सांगितलं. त्यानंतरच इलाज करणार म्हणाले. ॲलोपथीच्या प्रभावाखाली सबंध जग असताना त्याबद्दलची इतकी कडक टोकाची भूमिका मला योग्य वाटली नाही. त्यांनी काहीतरी मार्ग काढून समतोल साधला असता तर फार बरं झालं असतं. उपचारांना सुरुवात झाली असती. शेवटी प्रत्यक्षात त्यांच्या त्या आग्रहामुळे औषधयोजना होऊ शकली नाही.

ज्या आयुर्वेदाचार्यांबद्दल मी बोलतोय ते माझ्या खूप ओळखीचे होते. आता हे हयात नाहीत. त्यांनी मला एकदा सांगितलं होतं ते मला खूप भावलं होतं.

दिवसातल्या 15-16 तासांमधे 5-6 वेळा विभागून थोडं थोडं खाण्याविषयी ते सांगत होते. विभागून जेवढ्या वेळा खाणं तेवढ्या वेळा शौचाला जाणं आणि त्याच्या दुप्पट वेळेला लघवीला जाणं हे कसं नैसर्गिक आणि त्यामुळे आदर्श पद्धत आहे असा तो मुद्दा होता. ज्यांना शक्य त्यांनी महिनाभर करून बघावं. नक्की तब्येत सुधारेल. स्वस्थ वाटेल.

3) होमिओपॅथी – मुळात जर्मन शास्त्रज्ञानी तयार केलेली ही उपचारपद्धती भारतात बऱ्याच प्रमाणात वापरात आहे. अचूक लक्षणं सांगण्यावर आणि ओळखण्यावर याचा भर आहे. होमिओपॅथीयमधे फक्त रोगावर औषधं देत नाहीत. संपूर्ण शरीराचा, व्यक्तिमत्त्वाचा अभ्यास करतात. सामान्य माणसाच्या दृष्टिकोनातून होमिओपॅथीकडे बघितलं तर असं आढळतं की, चुकून योग्य औषध सापडलं तर जादूसारखा परिणाम होतो आणि औषध नाही सापडलं तर वेळ, पैसे वाया जातात.

माझ्या मते ह्या तीनही उपचारपद्धती चांगल्या आहेत. पण अशा अनेक पद्धतींचा अभ्यास केलेली, शिक्षण घेतलेली एक व्यक्ती मला तरी माहिती नाही. ही मला मोठी अडचण वाटते. शेवटी रुग्णाचे हाल आणि फरपट होते. माझ्या लहानपणी आयांना खूप घरगुती उपचार माहीत असत. आजीबाईचा बटवा घरात असायचा. त्यामुळे जरा काही झालं की जा दवाखान्यात असं करावं लागत नसे. असे उपचार प्रत्येक घराला माहीत हवेत.

सगळ्या उपचारपद्धतींची प्राथमिक माहिती आणि ज्ञान मिळेल असा वर्षभराचा कोर्स तयार व्हायला हवा. कोर्स झालेल्यांनी फॅमिली डॉक्टर म्हणून व्यवसाय करावा, विकाराचं निदान करून मग तज्ज्ञांकडे पाठवावं. अशा पद्धतीचा 'इंटिग्रेटेड मेडिकल कोर्स' अमेरिकेत सुरू झाला आहे असं माझ्या कानावर आलं. भारतात त्याची फार जरूर आहे.



# 6) ऊर्जेची गणितं

पर्यावरणाच्या, ऊर्जास्रोतांच्या अनेक प्रयोगांचं 'ऑडिट' करण्याची एक पद्धत वापरतात. त्यातला मुख्य विचार असा की, ती वस्तू, त्या पद्धतीनी तयार करण्यासाठी जेवढी ऊर्जा लागते त्यापेक्षा त्या वस्तूनी जास्त ऊर्जा निर्माण करावी लागते तरच 'ऑडिट' मधे ती वस्तू किंवा पद्धत पास होते.

पवनचक्की ही एक याप्रकारची गोष्ट आहे. मधल्या काळात अनेक लोकांनी पवनचक्क्या उभारल्या खऱ्या, पण शेवटी असं ठरलं की, पवनचक्की 'ऑडिट'मधे नापास होते. विक्रीसाठी धातूची सुबक दिसणारी पवनचक्की बनवून उभी करायला जेवढी ऊर्जा लागते त्यापेक्षा निर्माण होणारी ऊर्जा फार कमी असते.

पर्यावरणाच्या क्षेत्रात निरनिराळ्या पद्धतींनी लोक अभ्यास करत असतात. त्यातल्या एका अभ्यासाचा गोषवारा मला फार उपयोगी वाटतो. कुठच्याही प्राण्याचं शरीर हे एक स्नायू, हाडं, मेंदू, हृदय आणि इतर अवयवांचं बनलेलं एक यंत्र मानलं, की त्या यंत्राला खायला लागणारं अन्न म्हणजे ऊर्जा आणि त्यापासून त्या यंत्राची असलेली कार्यक्षमता मोजायची. निव्वळ शारीरिक ताकदीचं मोजमाप धरलं तर बैलाचं शरीर हे सर्वांत कार्यक्षम यंत्र आहे. बैल जो चारा खातो, म्हणजेच ऊर्जा शरीरात घेतो त्या तुलनेत त्याची शारीरिक ताकद खूप असते.

याच पद्धतीनी माणसाच्या शरीराच्या यंत्राचंही मोजमाप केलं. माणूस जेवढं अन्न म्हणजेच ऊर्जा खातो त्या तुलनेत त्याची शारीरिक ताकद बैलापेक्षा खूप कमी असते, पण त्या मोजमापात बुद्धीचाही विचार केला तर माणसाच्या शरीराचं यंत्र अनेकपटींनी जास्त कार्यक्षम असतं. प्रथम ऐकल्यावर हा विचार खूप गमतीचा वाटतो. स्वतः मानव असल्याचा अभिमान वाटायला लागतो. त्याचबरोबर जबाबदारीचीही जाणीव होते.



# 7) पर्यावरण विषयाबद्दलचे प्रश्न

पर्यावरणशास्त्र आणि व्यवस्थापनशास्त्र यांच्या तत्त्वांमधल्या फरकाची तात्विक गुंतागुंत कशी असते याचं आणखी एक उदाहरण सांगतो. पर्यावरणाच्या रक्षणासाठी कमीत कमी कागद वापरावा त्यामुळे दगडी पाटीवर लिहिण्याचा प्रघात ठेवावा. याउलट व्यवस्थापनशास्त्राप्रमाणे प्रत्येक गोष्टीची नोंद जपून ठेवावी आणि त्यासाठी कागदच वापरावा. पर्यावरणाच्या तत्वाप्रमाणे कागदावर लिहिताना त्याचा संपूर्ण पृष्ठभाग वापरावा. टोकापासून टोकापर्यंत आणि पाठपोट लिखाण करावं. व्यवस्थापनशास्त्राप्रमाणे प्रत्येक कागदाला समास सोडलाच पाहिजे कारण त्या कागदाला भोकं पाडून फायलिंग करायचं असतं. शिवाय सुटा ठेवलेला कागद म्हणजे हरवण्याचा धोका. दोन परिच्छेदामधे जागा सोडायला हवी कारण विषयातले उपविषय निराळे काढले पाहिजेत, वाचकाला तो मजकूर वाचावासा वाटला पाहिजे आणि सुबकही दिसला पाहिजे. याखेरीज पाठपोट मजकूर कधीही लिहायचा नाही कारण त्या मजकुराचं 'कटिंग-पेस्टिंग' करता येत नाही. कटिंगपेस्टिंगमुळे पुनपर्लिखाणाचा वेळ, श्रम वाचतात आणि चुकीची शक्यता नाहीशी होते. या सगळ्यातून प्रत्यक्ष लिखाण करताना वाट काढावी लागते, निर्णय घ्यावा लागतो आणि स्वतःच्या निर्णयाची अंमलबजावणी करावी लागते.

पर्यावरणवाद्यांची मांसाहारविरोधी भूमिका मला समजते. मांसाहारामुळे शाकाहाराच्या तुलनेत पर्यावरणाची जास्त हानी होते हे मला पूर्ण माहिती आहे. पण एरवीच्या धार्मिक आग्रहांमुळे मांसाहाराला विरोध मला योग्य वाटत नाही. त्याबाबतीतली निसर्गयोजना काय होती हे शोधलं तर निराळंच सत्य समोर येतं.

फार पूर्वी मानव छोटे प्राणी आणि फळं एवढंच खायचा. त्यामुळे पूर्वीच्या परंपरेनुसार मांसाहार योग्य असंही म्हणता येतं. काही ठिकाणी शाकाहारी पदार्थच मिळत नाहीत अशी अडचण असते. ज्या काळात मी आणि शोभानी आठ महिन्यांचा सलग प्रवास केला त्या काळी कित्येक ठिकाणी लोकांना शाकाहारी म्हणजे काय हे समजायचं देखील नाही. मांसाहारी पदार्थातला मांसाचा तुकडा काढून टाकला की झाला शाकाहारी पदार्थ असं त्यांना वाटायचं. भारतीय संस्कारांच्यातला धार्मिक आग्रहांचा आणि संवेदनांचा भाग त्यांना समजू शकत नाही.

मी आणि शोभा धार्मिक प्रवृत्तीचे नाही आहोत. ज्याला ‘हॅमबर्गर’ म्हणतात तो विलायतेत प्रत्यक्षात ‘बीफ बर्गर’ असायचा. आम्ही तो खायचो कारण कित्येक ठिकाणी दुसरं काही मिळायचंच नाही.

भारतात आल्यावर म्हणजे गेली अनेक वर्षं मी आणि शोभा अगदी कमी प्रमाणात मांसाहार करतो. मुळात आमचं मांसाहाराचं प्रमाण अगदी कमी आहे. महिन्याच्या 60 जेवणांपैकी 2 जेवणांत आम्हाला कोंबडीचं कालवण किंवा अगदी क्वचित मासे आवडतात. धार्मिक रूढीबंधनांच्या दृष्टिकोनातून याकडे बघणाऱ्यांसाठी आम्ही मांसाहारी आहोत, पण पर्यावरणाच्या दृष्टीनी शहाण्णव टक्के शाकाहारीच आहोत.

घरी शिजवण्याऐवजी बाहेरून अन्न मागवलं की पर्यावरणाची हानी होतेच. केटररचा तो धंदा असल्यामुळे तो पोषणमूल्यांचा, आरोग्याचा थोडा विचार करेल. पण चव, पदार्थाचं सौंदर्य, सर्व्हिस याचा त्याहून जास्त विचार करेल आणि सर्वांत जास्त विचार नफ्याचा करेल हे सरळच आहे.

समारंभांमधल्या जेवणावळी घालताना पर्यावरणाची हानी याचा विचार आपला समाज करताना दिसत नाही. या पुस्तकसंचामधे लग्नसमारंभ या विषयावर अगदी सविस्तर लेख आहे आणि ज्याला लोक मंगलकार्य म्हणतात ते पर्यावरणाच्या दृष्टीनी अमंगलकार्य कसं आहे हेही सविस्तर सांगितलेलं आहे.



## ८) पर्यावरणातलं संशोधन आणि अंमलबजावणी

सौरऊर्जा या विषयावर भारतात भरपूर उपयोगी काम करण्याची संधी आहे. नॉर्वे या देशात फक्त सहा महिनेच सूर्यप्रकाश असतो तरी त्यांनी या विषयात संशोधन करून बरीच प्रगती केली. भारताला 'करंटा' म्हणतात ते उगीच नाही. इतका सूर्यप्रकाश, मध्यम टेंपरेट हवामान इतर कुठच्याही देशामधे नाही.

भारतात, महाराष्ट्रात कल्पनादारिद्र्य आणि अंमलबजावणीतली शिथिलता, बेपर्वाई इतकी आहे की साध्या गोष्टीही घडू शकत नाहीत. मी पर्यावरणाचा अभ्यासक नाही, पण 'टाउन प्लॅनिंग' हा विषय मात्र शिकलेलो आहे. महाबळेश्वरसारख्या ठिकाणी, जिथे पावसाळ्यात जीव नकोसा करण्याइतका धो धो पाऊस पडतो तिथे उन्हाळ्यात पाणीटंचाई असावी ही गोष्ट लाजिरवाणी आहे. चेरापुंजी या ठिकाणी सबंध जगात जास्त पाऊस पडतो. तिथे उन्हाळ्यात पाणीटंचाई ही गोष्ट नुसती हास्यास्पद, लाजिरवाणीच नाही, तर थक्क करणारी आहे.

'रेन वॉटर हार्वेस्टिंग' या विषयाचा माझा स्वतंत्र औपचारिक अभ्यास नाही, पण मला एवढं कळतं की ज्या भागाला पुरेशा पावसाचं निसर्गाचं वरदान आहे तिथे पाणीटंचाई हा शब्द उच्चारायची नैतिक परवानगीच नाहीय.

समजण्यापुरतं पुण्याचं उदाहरण घेतलं तर प्रत्येक सोसायटीच्या रिकाम्या जागेत पावसाचं पाणी चार महिने साठवण्याची व्यवस्था केली की त्याच्यावर पुढचे आठ महिने गोड्या पाण्याची कमतरताच असणार नाही. सबंध पुण्याला पाणीपुरवठा करण्यासाठीचे एवढे धरण प्रकल्प, कालवे, पाइपलाइन्स, पाणी शुद्धीकरणासाठीची प्रचंड सामुग्री आणि व्यवस्था या कशाचीच जरूर नव्हती. शहराचा कारभार चालवणाऱ्यांनी यासंबंधीचा हा रेन वॉटर हार्वेस्टिंगचा निर्णय फार पूर्वीच घ्यायला हवा होता.

पुण्यात ज्या गोष्टी अजून शक्य आहेत त्या मुंबईत फार कठीण आहेत, कारण मुंबईत जमीन कमी, त्यामानानी लोकसंख्या फार आणि तरी मुंबईत 'रेन वॉटर हार्वेस्टिंग' ही गोष्ट तांत्रिकदृष्ट्या कठीण आहे, अशक्य नाही.

ड्रेनेज या विषयाची परिस्थिती अशीच आहे. ज्या जमिनीत जी इमारत असेल, जेवढी माणसं राहात असतील, त्यांचा मैला त्या जमिनीच्या बाहेर

नेण्याची गरजच नाही. सेप्टिक टँक, त्यातले प्राणवायू वापरणारे, आणि प्राणवायू न वापरणारे जंतू ही निसर्गाची जादू आहे. दोन जंतूंच्या क्रियांमुळे सगळ्या मैल्याची माती, खत, पाणी होतं. ही गोष्ट भारतासारख्या उष्ण प्रदेशाला गेली हजारो वर्षं माहिती आहे. पृथ्वीवरच्या थंड प्रदेशांना ही गोष्ट शक्य नाही कारण तिथे ते जंतू नाहीत. पण भारत हा श्रीमंत देश आहे हे विसरायलाच होतं त्याचा हा परिणाम आहे.

कचऱ्याचंही असंच आहे. त्या जमिनीतला कचरा त्याच जमिनीत जिरवता येतो, त्याचं उत्तम खत बनवता येतं. अगदी संपूर्ण शहरभर हे शक्य आहे. कचरा डेपो, त्याच्यावरून होणारी भांडणं हे सगळं निरर्थक आहे.

याबद्दल तत्त्वज्ञानामधलं एक तत्त्व समजून लक्षात ठेवण्याजोगं आहे, 'प्रत्येकाला स्वतः केलेली घाण स्वतःच साफ करावी लागते.'

माझ्या 'टाउन प्लॅनिंग'च्या अभ्यासातली एक गोष्ट मला आठवते आहे आणि ती मला पर्यावरण या विषयाशी खूप जवळची संबंधित वाटते. शहरांच्या बाहेर गेलं की सगळ्या इमारती बैठ्या दिसतात. जास्तीत जास्त उंच इमारत म्हणजे तळमजल्यावर एक किंवा अर्धा वरचा मजला. अशा इमारती पर्यावरणसंवर्धनाला अतिशय पोषक असतात.

बांधकामातल्या या विषयाला 'ॲप्रोप्रिअेट बिल्डिग टेक्नॉलॉजी' म्हणतात. तुम्हाला आश्चर्य वाटेल, पण हा विषय बांधकाम क्षेत्रातला असूनही 'आर्किटेक्चरच्या कोर्स'मधे शिकवत नाहीत. 'ॲप्रोप्रिअेट' शब्दाचा अर्थ अगदी साधा आहे. ज्या ठिकाणी बांधकाम असेल त्या परिसरात निसर्गात मिळणाऱ्या वस्तूंपासून बांधकाम करायचं. ते बांधकाम ज्यांच्यासाठी इमारत बांधायची असेल त्या लोकांनी स्वतःच्या हातानी करायचं. अशा इमारतीची उंचीची मात्र मर्यादा असते. मुळात वरचा मजला बांधायचा असला तर जाणकार व्यावसायिक आणि कारागीर लागतात.

या सगळ्या वर्णनावरून एक गोष्ट स्पष्ट होते की, अशा फक्त तळमजल्याच्या प्रकारच्या कामात फी देऊन आर्किटेक्ट नेमण्याची गरज क्वचितच पडणार. बांधकामाच्या वस्तू-माती, विटा, दगड, काठ्या, बांबू, कौलं अशा असणार. 'आर्किटेक्चर' मधे याविषयी काही शिकवत नाहीत हे साहजिकच आहे. मी ते शिकलो पण स्वतंत्रपणी. महात्मा गांधींच्या विचारांनी भारावून जाऊन अनेक परकीय लोकं भारतात आली आणि भारतातच राहिली. अशांपैकी एक म्हणजे ब्रिटिश आर्किटेक्ट इंजिनीयर लॉरी बेकर. ॲप्रोप्रिअेट बिल्डिंग टेक्नॉलॉजी या

विषयावर त्यांनी जेवढं काम केलेलं आहे तेवढं सबंध जगात कोणी केल्याचं मला माहीत नाही. ॲप्रोप्रिअेट बिल्डिंग टेक्नॉलॉजीमधे 5 मैलांच्या परिसरात जे सामान मिळतं तेच वापरायचं असतं.

अशा बैठ्या इमारतीत राहण्यानी मानवाला खूप फायदे होतात. पर्यावरणाला पोषक जीवनशैली शक्य होते. पाणी, अन्न, जलोत्सारण, कचरा या सगळ्या प्रश्नांना योग्य दिशा सापडते. शिवाय आरोग्य सुधारतं.

केवळ शहराचा अनुभव असलेल्यांना प्रश्न पडणार की, बैठ्या इमारतींमध्ये एवढी लोकसंख्या राहणार कशी. त्यांना प्रामाणिकपणे वाटतं की, अनेक मजली इमारतींना दुसरा काही पर्यायच असू शकत नाही.

यासंबंधीचा जगभराच्या परिस्थितीची पाहणी केल्यावरचा निष्कर्ष सांगतो. सबंध जगात जेवढी जमीन आहे आणि जेवढी लोकसंख्या, कुटुंबं आहेत त्याचं गणित मांडलं तर प्रत्येक कुटुंबाला पुरेसं मोठं बैठं घर, आसपास चारही बाजूंना फळबागा, भाजीबागा, पाण्याचा साठा, सेप्टिक टँक आणि कचऱ्यासाठीचे खड्डे, खेळायला अंगण एवढ्या सोयींना पुरेशी जमीन, रस्ते सगळ्यांची सोय शक्य आहे. एकूण जमीन मोजताना समुद्र, तळी तर त्यातून वजा केलीच आहेत, पण पर्वत, टेकड्या, जंगलं, नद्या, बर्फाळ प्रदेश, दलदलीच्या जागा सगळं वजा केलं आहे.

हेच गणित त्या त्या देशापुरतं मांडलं तरी प्रत्येक देशात बैठी घरं शक्य आहेत. भारताला सुद्धा हे लागू आहे. महाराष्ट्र राज्यालाही लागू आहे. मग अडचण कुठे आहे? अडचण हे राज्यकर्त्यांना समजण्याची, पटण्याची आणि अंमलबजावणीची आहे.



# 3

# सावकाश काम करणारे अपायकारक घटक आणि त्यावर उपाय

## 1) या लेखामागची कल्पना

जेव्हा एखाद्या माणसाला बरं नाहीसं होतं तेव्हा तो डॉक्टरकडे जातो. डॉक्टर काहीतरी औषध देतो. कधीकधी लगेच गुण येतो, कधी उशिरा गुण येतो, कधी अजिबात येत नाही. बिघाड व्हायला खरं म्हणजे पूर्वीच सुरुवात झालेली असते. त्याची कारणं एवढ्या उशिरा कळणंही कठीण असतं. बऱ्याच वेळेला निरनिराळ्या कारणांचं मिश्रण हे कारण असतं. हे सगळे अपायकारक विषारी घटक आपण टाळू शकूच असं नाही, पण निदान प्रत्येकाला ते माहिती तरी असावेत म्हणून ही यादी बनवली आहे.

मी या विषयाचा अभ्यास गेली काही वर्षं करतोय. जीवनसाथच्या पहिल्या रविवारच्या कार्यशाळेत हा विषय घ्यायचा असं ठरवलं. जीवनसाथचे दोन सदस्य म्हणजे विक्रांत पाटील, त्याची बायको मोहिनी पाटील आणि त्यांची मुलगी अंशुल हे दापोलीजवळच्या कुडावळे नावाच्या छोट्या गावी स्थायिक झालेले आहेत. त्यांच्याशी बोललो. मला वाटलं की, माझ्यापेक्षा त्यांना या विषयातल्या जास्त गोष्टी, जास्त बारकावे माहिती आहेत. मग जीवनसाथमधे हा विषय आम्ही तिघांनी घेतला. या लेखातल्यासुद्धा निम्म्याअधिक मुद्द्यांचं श्रेय विक्रांत आणि मोहिनीलाच जातं.

1947 साली भारताला स्वातंत्र्य मिळालं तेव्हा सरासरी माणूस 28 वर्षं जगायचा. मधल्या 60-65 वर्षांत आयुर्मान 28 चं 56 झालं. आयुष्याचा दर्जा

मात्र घसरला.

आयुष्यभरात माणसासमोर येणारे साधारण 60 प्रश्न आणि त्यांवरचे उपाय याचा जीवनसाथनी गेली अनेक वर्षं अभ्यास केलाय. त्यांची यादी या पुस्तकसंचाच्या सुरुवाती-सुरुवातीला दिली आहे. आजच्या या कार्यशाळेत, या लेखात बऱ्याच गोष्टी सांगितलेल्या आहेत. मला आणि शोभाला आमची 72 आणि 69 ही वयं लक्षात घेऊन यात सांगितलेले उपाय अमलात आणणं कठीण आहे. पण जीवनसाथमधल्या आणि हे वाचणाऱ्या तरुणांना आणि मध्यमवयीन लोकांना यापुढेही ते बदल शक्य आहेत. त्यांनी या सगळ्या मुद्द्यांचा विचार करावा आणि त्याप्रमाणे कृती करावी.



## 2) हवा

शुद्ध हवा – ही प्रत्येक माणसाची गरज आहे. शहरातली हवा आणि शहराबाहेरची हवा यात जमीन-अस्मानाचा फरक असतो. शहरात वाहनांचा धूर, प्रचंड प्रमाणातल्या कचऱ्यामुळे होणारं प्रदूषण (कचऱ्यामधली दुर्गंधी आणि रसायनं – दोन्हींमुळे होणारं प्रदूषण), ध्वनी प्रदूषण या सगळ्यांचा आपल्या प्रत्येकावर सतत परिणाम होत राहतो. त्याशिवाय काही ठिकाणची हवा दमट तर काही ठिकाणी कोरडी असते.

रसायनं ही काही द्रवरूपातच असतात असं नाही. अनेक कारखान्यांमधून धूर बाहेर पडतो, त्याबरोबर धुराड्यातून विषारी वायूही बाहेर पडतो.

आपल्याला माहीत असलेली विषारी वायूगळती दुर्घटना भोपाळला घडली. ती खूप मोठी होती म्हणून आपल्या लक्षात आली. प्रत्यक्षात दूषित वायूचे अनेक छोटे साठे शहरात जिथे तिथे असतात. वाहणारी कचराकुंडी हा नुसता वाईट वास नसतो. तो विषारी वायूही असतो. शहरातून जाणाऱ्या नद्यांची गटारं झालेली आहेतच. तीदेखील नुसती दुर्गंधी नसते. सौम्य विषारी वायू असतो.

आपल्याला सगळ्यांना या प्रदूषणाचा त्रास तर होईलच. पण लहान मुलांचं काय? गेल्या काही दशकांत श्वासाचा त्रास होणाऱ्या लहान मुलांची संख्या खूप वाढलीय. मतिमंद मुलांचीही संख्या बरीच वाढलीय. काही रोगांना भारत देशानी पूर्ण हाकलून काढलं हे खरं आहे, पण नवीन काही रोगांनी जन्मही घेतलेला आहे.

मागे मी आखाती देशांच्यात प्रॉजेक्ट मॅनेजर म्हणून काम करायचो. तिथे तपमान इतकं भयानक म्हणजे कायम 40 ते 50 सेंटिग्रेड एवढं असतं. प्रत्येक घर, दुकान, ऑफिसला एअरकंडिशनर बसवलेला असतोच. एअर कंडिशनिंग या विषयाचा मला अभ्यास करणं भागच होतं. त्यातली मुख्य गोष्ट अशी की, हवा थंड करण्याच्या प्रक्रियेत हवा गरम करून बाहेर टाकली जाते. तिथल्या परिस्थितीबद्दल माहिती काढली. 30-40 वर्षांपूर्वी तिथे प्रत्येक ठिकाणी एअरकंडिशनर नसायचा. जशी तांत्रिक प्रगती झाली तशी जास्त ठिकाणी एअरकंडिशनर बसवायला सुरुवात झाली आणि गरम हवा वातावरणात मिसळून एअरकंडिशनरची गरज वाढत गेली. सबंध देश दुष्टचक्रात अडकले.

भारतातल्या शहरांत अशीच परिस्थिती आहे. ए.सीं.ची संख्या दिवसेंदिवस वाढतेय. प्रत्यक्षात उकाड्यावर काही इलाज आहेत ते जरूर करून बघावेत. हवेतलं तपमान वाढलं की आपलं शरीर नैसर्गिकपणी काही योजना करत असतं. त्या योजनांना आपण मदत करायला हवी. दिवसातून अनेक वेळा थोडं थोडं खोलीतल्या नैसर्गिक तपमानाचं पाणी प्यावं. कोकम सरबत, लिंबू-पाणी पिऊन फायदा होतो. मधून मधून गाईचं थोडं थोडं तूप पोटात घ्यावं.

याखेरीज खिडक्यांना वाळ्याचे पडदे लावावेत, ते भिजवावेत. शहरी माणसांना उन्हाळ्याचे तीन महिने ए.सी. लावण्याची सवय असते. प्रयत्न केला तर त्या तीन महिन्यांचे हळूहळू पहिल्या उन्हाळ्यात अडीच महिने करता येतील. सगळे उपाय नीट कळले, जमले की हळूहळू त्याचे दोन महिने करता येतील.

एअरकंडिशनरच्या नियमित वापरामुळेही हळूहळू अपाय व्हायला सुरुवात होते. त्वचा कोरडी पडते, डोळ्यातून पाणी येतं, चष्म्याचा नंबर वाढू शकतो. मुख्य म्हणजे बाहेरच्या तापमानाशी जुळवून घेण्याची शरीराची क्षमता कमी होत जाते.

यावर उपाय म्हणजे ए.सी. आणि एक्झॉस्ट दोन्हींचा वापर करणं, ए.सी. ऐवजी कूलरचा वापर शक्य असेल तर जरूर करावा. पाण्याचा पडदा, त्याच्यामागे पंखा अशीही पद्धत आहे. सगळ्या उपायांचं मिश्रण करून बघावं. मुख्य म्हणजे पाणी जास्त पिणं. पण ते हवेतल्या नैसर्गिक तपमानाचं पाहिजे. फारफार तर पाण्याच्या पिपाभोवताली फडकं गुंडाळावं. ते ओलं ठेवावं. पण रेफ्रिजिरेटर टाळावा. मला कल्पना आहे की शहरी माणसाला फ्रीजशिवाय घर याची कल्पनाही करता येणार नाही. मधूनमधून ठरवून फ्रीज बंद ठेवावा आणि तसे दिवस हळूहळू वाढवत न्यावेत.



## 3) पाणी

शुद्ध पाणी – भारत देशात खरं म्हणजे भरपूर गोडं पाणी आहे. भरपूर नद्या, खूप तळी यांची रेलचेल आहे. गेल्या 50-60 वर्षात शहरं वाढत गेली. राजकारण्यांनी सगळं पाणी सुरुवातीला अज्ञानामुळे आणि नंतर स्वार्थी हेतूंनी शहरांकडे वळवलं. शहराबाहेरची शेती पाण्यावाचून अशक्य व्हायला लागल्यावर जीव जगवण्यासाठी शेतकऱ्यांची कुटुंबं शहराकडे यायला लागली.

लोकसंख्या वाढली की त्या संख्येला पाणी लागतंच. त्यामुळे शहरांना अधिक जास्त पाणी लागायला लागलं. प्रत्येक मोठ्या शहराला पाणी पुरवण्यासाठी धरणांवर धरणं बांधली गेली. ज्या नद्यांभोवती शहर वसलं होतं त्या नद्यांची गटारं झाली. कालव्यांमधलं पाणी जास्त जास्त अस्वच्छ झालं. पाण्याच्या शुद्धीकरणासाठी खूप मोठे प्रकल्प, त्यासाठी प्रचंड खर्च सुरू झाले.

ज्याला शुद्धीकरण केलेलं पिण्याजोगं स्वच्छ पाणी असं म्हणायचं ते पाणी शुद्ध असण्याची खात्रीच राहिली नाही. पाणी शुद्ध करण्यासाठी घराघरांत यंत्रं, मोठ्या टाक्या, छोट्या टाक्या बसायला लागल्या. बंद बाटल्यांमधून पाणी विकत घेण्याचं प्रमाण वाढलं. खरं म्हणजे कुठल्याच पाण्याच्या स्वच्छपणाची खात्री देता येत नाही अशी स्थिती निर्माण झाली. प्रत्येक माणसावर या पाणी प्रकरणाचा सारखाच परिणाम होतो असं नाही. पण अगदी सावकाश प्रत्येकाच्या शरीरावर आणि मनावर याचे दुष्परिणाम होतातच.

पाणी या बाबतीतली मुख्य पंचाईत अशी आहे की, आपल्यापर्यंत पोहोचतं तेव्हा आपल्याला ते फक्त नळातून पडताना दिसतं. त्याच्या मागे काय आहे ते आपल्याला दिसत नाही त्यामुळे त्याचा आपण विचार करत नाही.

अगदी शहरी माणसानीसुद्धा सहज करण्याजोगे तीन उपाय आहेत. एक म्हणजे नळाला फडकं बांधून गाळलेलं पाणीच वापरणं. फडकं मात्र रोज बदलायला हवं. दुसरी गोष्ट म्हणजे आजचं पाणी आज भरून बाजूला ठेवायचं आणि उद्या वापरायचं. एका दिवसात त्यातली माती, घाण तळाशी बसते. पाण्याच्या पिंपाची तोटी 2'' वर ठेवायची. नसली तर तशी करून घ्यायची. आणि तिसरी गोष्ट म्हणजे पाण्यात किंचित तुरटी फिरवायची. एवढं केलं की

पाण्यातले उपयुक्त क्षार शिल्लक राहतात आणि अशुद्ध घटक टाळता येतात.

रसायनांनी शुद्ध केलेल्या पाण्यामधले वाईट आणि चांगले सगळे घटक मरतात. अशा पाण्याला इंग्लिशमधे चक्क ‘डेड वॉटर’, म्हणजे मृत पाणी असाच शब्द आहे.

पिण्याच्या पाण्याबद्दल संपूर्ण शहरभर सगळ्या लोकांनी केवळ एका साध्या सवयीमधे बदल केला तरी काम होईल.

स्वतः पाणी प्यायचं असो किंवा दुसऱ्याला पाणी द्यायचं असो, भांडंभर पाण्याऐवजी अर्धं भांडंच पाणी द्यायचं आणि घ्यायचं. जास्त तहान ज्याला लागली असेल त्यांनी दोनदा अर्धं भांडं पाणी जरूर प्यावं.

या साध्या युक्तीमुळे अर्धं भांडं पाणी पिऊन उरलेलं पाणी ओतून, फेकून देणं तर नक्की टळेल. शहराच्या पूर्ण लोकसंख्येनी ही एवढी गोष्ट महिनाभर केली तरी या कल्पनेतली जादू सगळ्यांना कळेल.



# 4) अन्न

स्वच्छ अन्न – सध्या शहरामधे आपल्यापैकी प्रत्येक जण रोज जे अन्न खातो त्यापैकी एकही कण खात्रीशीरपणी शुद्ध आहे असं म्हणता येत नाही. भाज्या, फळं, दूध, धान्यं, मांस यांपैकी कुठचीच गोष्ट आपल्यापर्यंत शुद्ध स्वरूपात पोहोचू शकत नाही. शहरीकरणाच्या रेट्यामुळे वस्तूंना प्रचंड मागणी आली. नफा जास्त कमावण्यासाठी प्रत्येक वनस्पती पिकवताना प्रचंड प्रमाणात रासायनिक खतं वापरली जायला लागली. जो शेतकरी धान्य, भाज्या, फळं पिकवतो, जो व्यावसायिक या गोष्टी विकण्याचा व्यवसाय करतो तोदेखील या विखारातून सुटत नाही. दुधासकट प्रत्येक गोष्टीत रसायनं मिसळलेली आहेत.

आपल्या लहानपणापासून आपण ऐकलेलं आहे की, दूध हे पूर्णान्न आहे. अगदी लहान मुलांना दूध पिणंच फक्त शक्य असतं तेवढ्यापुरतंच ते खरं असतं. मूल साधारण सहा महिन्यांचं झालं की ते आईच्या दुधाखेरीज बऱ्याच निरनिराळ्या पातळ गोष्टी हळूहळू पिऊ शकतं. आईचं दूध चांगलं असतं इथपर्यंत वाद नाही, पण बाहेरचं विकतचं दूध या विषयाबद्दल उलटसुलट खूप गोष्टी ऐकू येतात.

दूध विकणं हा पैसे मिळवण्याचा धंदा झाल्यापासून गेली अनेक वर्षं दुधाच्या धंद्यात प्रगती आणि दर्जात अधोगती व्हायला लागली. गायींनी जास्तीतजास्त दूध द्यावं यासाठी विशिष्ट पद्धतीनी संकरित गायींची पैदास, जास्त दुधासाठी गाईंना, म्हशींना दिलेली 'हार्मोन्सची इंजेक्शन्स', यामुळे आपल्यापर्यंत पोहोचणाऱ्या दुधाची खात्री कशी देणार? त्यापुढे एक प्रगतीचं पाऊल म्हणजे संपूर्ण रासायनिक दूध बनायला लागलं. थोडक्यात, स्वतःच्या गोठ्यातल्या गाईचं किंवा म्हशीचं आपल्या घरच्या माणसानी काढलेलं दूध ही एकच गोष्ट विश्वास ठेवण्याजोगी झाली आहे.

मोठ्या माणसासाठी तर रोज दूध पिणं अगदी चुकीचं आहे. काही विकारांवर, उदाहरणार्थ, जळजळ होण्यावर दूध हे औषध आहे. इतर काही आयुर्वेदिक औषधंही दुधातून घ्यायची असतात. थोडक्यात दूध हे औषध आहे, अन्न नाही.

यावर उपाय म्हणून काही लोकं सेंद्रीय शेती स्वतः करतात आणि सेंद्रीय शेतीचा प्रसार करतात. पण त्यांना मिळणाऱ्या बियाणांची तरी कुठे खात्री आहे? प्रत्यक्ष शेती करत असताना त्यांनी स्वतः त्यात रासायनिक खतं वापरली नाहीत एवढंच त्यांना समाधान. रासायनिक शेतीमुळे मातीदेखील पिकांना अपायकारक बनते. कोणी नवीन शेत विकत घेतलं तरी त्या शेतातली माती शुद्ध असेल याचीही खात्री नसते.

घराबाहेर जाऊन 'रेस्टॉरंट' मधे जाऊन ज्याला परवडेल तो खाईल असा युक्तिवाद करता येईल. पण खाद्यपदार्थांमधली मूळ द्रव्यं तीच. शिवाय खाऊ घालण्याचा त्यांचा धंदा असल्यामुळे गिऱ्हाइकाला आकर्षक वाटेल आणि किमतीत बसेल अशा भेसळीच्या सगळ्या युक्त्या धंदेवाला करणारच.

मानवाच्या पचनशक्तीमधे व्यक्तीव्यक्तीत फरक असतो, तरीदेखील त्याचीही काही सरासरी असते. चुकीचं अन्न पोटात गेलं तर शरीराची खूप शक्ती अन्न पचवण्यावर आणि न पचलेलं अन्न बाहेर काढण्यावर खर्च होते. याचा अर्थ असा की शरीराला इतर कामं करायला वेळ आणि शक्ती उरत नाही. शरीराची इतर कामं म्हणजे आजाराशी सामना करणं, नवीन पेशी निर्माण करणं. पचलेलं अन्न शरीराच्या शेवटच्या पेशीपर्यंत पोहोचवणं या गोष्टींसाठी शक्ती उरत नाही.

शरीरात टॉक्सिन्स म्हणजेच विषारी द्रव्यं साठणं म्हणजे शरीराची कार्यक्षमता कमी होणं, आजारांना आमंत्रण देणं, आयुष्य कमी करणं. पचनसंस्था व्यवस्थित नसेल तर टॉक्सिन्स शरीरात निर्माण होतात आणि साठतात. यातला महत्त्वाचा भाग म्हणजे पचनसंस्था आणि नर्व्हस सिस्टिमवर परिणाम. ही धोक्याची घंटा समजावी. लहान आजार म्हणजे ती घंटा ऐकू येणं आणि मोठे आजार म्हणजे घंटा जोरजोरात वाजणं.

शहरी आयुष्यातला साखरेचा वापर ही अशीच एक मोठ्या काळजीची गोष्ट आहे. गोड पदार्थाची चव बहुतेकांना आवडते. मग तो पदार्थ आणखी गोड आवडायला लागतो. हळूहळू आरोग्याच्या कल्पनांप्रमाणे आहारात जेवढी रोज चालते त्याच्या अनेकपट साखर पोटात जाते. जास्त साखर खाल्ली की त्याच वेगानी रक्तातल्या साखरेचं प्रमाण कमी होतं आणि आणखी साखर खावीशी वाटते.

सरासरी शहरी माणूस निरनिराळ्या पदार्थांमधून रोज 8 ते 10 चमचे साखर खातो. प्रत्यक्षात माणसाची सरासरी क्षमता रोज 1 चमचा साखर पचवण्याची असते. त्यामुळे यकृतावर खूप ताण पडतो. साखरेपेक्षा गूळ केव्हाही

बरा. रसायनं मिसळून बनवलेल्या गुळापेक्षा, काळा-लाल गूळ बरा. कृत्रिम रासायनिक 'शुगर फ्री' गोळ्या-पावडरींपेक्षा 'स्टीव्हिया शुगर' बरी. बिनसाखरेच्या पदार्थांची सवय करणं त्याहून चांगलं. गोड चवीसाठी फळं या सगळ्यापेक्षा चांगली.

अलीकडे भलत्या वेळी जेवण्याचं प्रमाण खूप वाढलेलं दिसतं. दुसऱ्याबरोबर जेवण्याच्या उपचारामुळे भूक नसताना खाल्लं जातं, वेळेच्या अडचणीमुळे जास्त खाणं, उपाशी राहणं या दोन्ही अपायकारक गोष्टींचं प्रमाणही खूप वाढलंय. अगदी उशिरा रात्री झोपण्यापूर्वी खाणं हे पण वाईटच. या सगळ्याच गोष्टी बदलणं जरूर आहे. दिवसातून अनेकदा आणि विभागून थोडं खाणं हे सर्वांत उत्तम. ही गोष्ट तर सगळ्यांना शक्य आहे. निर्धारानी करण्याची फक्त गरज आहे. कामाच्या ठिकाणी स्वतःचे छोटे डबे न्यायला कोणाचीच हरकत असण्याचं कारण नाही.

आणखी एक 'फास्ट फूड' नावाचं प्रकरण आहे. काउंटरवर गेल्यापासून काही मिनिटांत आपल्या हातात खाद्यपदार्थ हा विचार आकर्षक आहे यात शंकाच नाही. खरोखर घाई असेल तेव्हा दोन महिन्यांतून एकदा फास्ट फूड खाल्लं तर त्यातल्या घटकांना प्रतिकार करण्याची शक्ती सर्वसाधारण माणसात असते. महिन्यातून 15 वेळेला 2 मिनिटांत मिळणारे बर्गर, पिझ्झा, फ्राइड चिकन, नगेट्स्, सॉसेजेस् किंवा नूडल्स खायला सुरुवात केली की प्रतिकारशक्ती कमी कमी होत जाते.

मुळात जी वस्तू दोन मिनिटांत खाण्यासाठी तयार होते ती गोष्ट आधी शिजवून वाळवलेली असणार हे अगदी सरळ आहे. ती टिकावी म्हणून तिच्यामधे 'प्रिझर्वेटिव्हज्' म्हणजेच रसायनं मिसळावीच लागतात. त्या वस्तूची टी.व्ही.वरची जाहिरात कितीही मोठ्या नटानी किंवा नटीनी केली तरी त्यामुळे ते पदार्थ आरोग्यकारक आहेत हे सिद्ध होत नाही.

अशा नूडल्सनी सध्या सबंध भारताला पार वेड लावलेलं आहे. बाकी सगळी पाककला व्यर्थ होत आहे. सकाळ-संध्याकाळ नूडल्स खाऊन सगळ्यांचं 'कल्याण' काही काळानी होणारच आहे.

ही अशी अन्नाच्या अशुद्धतेची परिस्थिती केवळ भारतातच नाही तर जगभर आहे. सबंध जगात यावर संशोधन चालू आहे. भारतात कुठच्याच गोष्टीच्या संशोधनासाठी पुरेशी धडपड चालू नाही. पाश्चात्यांनी एव्हाना याची काही प्रमाणात उत्तरं शोधली आहेत, पण याबाबतीत आपण तरी असहाय आहोत, हे

मान्य करावं लागतं. सावकाश पण खात्रीनी अपाय होणारच.

अनैसर्गिक काळात फळं/भाज्या खाणं – उदाहरणार्थ, फेब्रु-मार्च-एप्रिलमधे येणारे आंबे, ऑगस्टमधे बाजारात येणारे अननस, पावसाळ्यात किंवा हिवाळ्यात बाजारात मिळणाऱ्या शेवग्याच्या शेंगा या टाळायच्या गोष्टी आहेत. फळं/भाज्या मोसमाअगोदर तयार करण्यासाठी वापरात येणाऱ्या औषधी वगैरेंचा दुष्परिणाम सावकाश होतो, पण होतोच. अशा भाज्या आणि फळं पचायला जड असतात. त्यामुळे पचनशक्तीवर ताण पडतोच. यावर उपाय म्हणजे निसर्गचक्रात येणाऱ्या भाज्या आणि फळांचा अभ्यास करून त्या निसर्गचक्राप्रमाणे आहार ठेवणं.

आखाती देशांच्यात केवळ प्रयोगासाठी प्रयोग म्हणून काही काचेची घरं उभारली. काचेच्या घरात कूलर, हीटर, ह्युमिडिफायर, सॅलिनेटर, जगातून आयात करून आणून टाकलेली निरनिराळ्या प्रकारची माती आणि जगभरचे शेतीविषयातले तज्ज्ञ गोळा केले. या सगळ्यासाठी लागणारा पैसा तिथे होता. जगातल्या कुठच्याही फळाचं, वनस्पतीचं पीक तिथे काचेच्या घरात काढण्याचा यशस्वी प्रयोग झाला. या धडपडीबद्दल सबंध जगानी त्यांचं कौतुक केलं. याचे पुढे काय परिणाम होतील याबद्दल मात्र अनेकांना शंका आहेत.

कुठचीही कलमी फळं म्हटली की, त्यांना जगवण्यासाठी रसायनांचा वापर केलेला असतोच. ती रसायनं नेमकी कुठची वापरली, ती अपायकारक असतात का नाही, हे शोधणं जवळजवळ अशक्य आहे. त्याला त्यातल्या त्यात उपाय म्हणजे गावठी आंबे, गावठी फळं खाणं. त्यांना मागणी कमी असल्यामुळे पूर्ण व्यापारी स्वरूप आलेलं नसतं. त्यामुळे त्यावर उत्पादन वाढवण्यासाठी अपायकारक रसायनं फवारत नाहीत. सेंद्रीय हापूसही असू शकतो पण जिथे तो पिकतो तिथे जाऊन तो खाल्ला तरच त्याची खात्री असते.

अति-तिखट, अति खारट, तळलेल्या पदार्थांचा अति किंवा सतत वापर अपायकारकच असतो. उदाहरणार्थ, वेफर्स, 'चिप्स'. विशेषतः लहान मुलांना याची आवड लवकर लागते. सवय लागते, जिभेपासून पचनसंस्थेच्या शेवटपर्यंत त्रास होतो. असं अन्न पचवण्यासाठी आणि मलाच्या रूपात उत्सर्जनासाठी पचनसंस्थेवर ताण येतो. असे पदार्थ अगदी क्वचितच खावेत. त्याचं प्रमाण ठरवून कमी करत करत नेऊन पूर्ण बंद करावेत.

फळं आणि दूध एकत्र करून खाणं ही अपायकारकच सवय आहे. सर्वात जास्त वापरात येणारा पदार्थ म्हणजे शिकरण. त्याचा पोटात एक गोळा तयार

होऊन तो बाहेर टाकणं हे शरीराचं मुख्य काम बनतं. त्यातून पोषण मिळत नाही. शिवाय शरीराचं काम वाढतं. त्यामुळे पचनसंस्थेवर जास्तीचा ताण येतो. याच्यावरचा उपाय म्हणजे मिल्क शेक्स, आइस्क्रीम्स पूर्ण टाळणं. मुलांसकट सबंध कुटुंबानी असे पदार्थ खाण्याचे दिवस कमी करत न्यावेत.

बिस्किटं, टोस्ट, केक, वनस्पती तेलापासून तयार केलेले बेकरीमधले सगळे पदार्थ हे देखील अपायकारक पदार्थच आहेत. जे पदार्थ खराब न होता टिकतात ते आपल्यापर्यंत पोहोचेपर्यंत बनवून खूप दिवस झालेले म्हणजेच जुने असतात. बेकरीचे पदार्थ खाणं म्हणजे एक महिन्यापूर्वी केलेली पोळी आज खाणं आहे. पुन्हा त्यात प्रिझर्व्हेटिव्हज असतात तीही पोटात जातात. असे कोरडे पदार्थ खाल्ल्यानी शरीरातली शुष्कता वाढते. त्यातल्या स्निग्धतेमुळे ते अन्ननलिकेला चिकटून बसतात. शक्यतोवर असे पदार्थ टाळावेत. चुकून खाल्लेच तर त्यावर गरम पाणी प्यावं.

प्रिझर्वेटिव्हज् वापरून डबाबंद किंवा बाटलीबंद केलेले पदार्थ हे अगदी हळूहळू परिणाम करत शेवटी आपल्याला कर्करोगापर्यंत पोचवू शकतात. तशाच चवीचे, त्याच मूळपदार्थांपासून घरी बनवलेले खाद्यपदार्थ अर्थातच चांगले कारण घरी बनवताना आपण त्यात प्रिझर्वेटिव्ह घालणार नाही.

जिकडेतिकडे जाहिरातीमुळे बोलबाला झालेलं आयोडाइज्ड मीठ प्रत्यक्षात आपल्यासाठी चांगलं नसतं. ते आपल्या नसांच्या जाळ्यासाठी अपायकारक असतं. ‘आयोडीन’ हा घटक शरीराला आवश्यक असतो. पण तो आलं किंवा पालकाच्या भाजीतून भरपूर मिळतो. स्वयंपाकासाठी मीठ मात्र शक्यतोवर खडेमीठ वापरावं. ते दिसतं चमत्कारिक पण तरीही तेच वापरावं.



## 5) पेय

दिवसातून अनेकदा चहा, कॉफी पिणारी खूप लोकं असतात. यामधे टॅनिन, कॅफिन ही तरतरी आणणारी द्रव्यं असल्यामुळे तरतरी येते यात शंकाच नाही. पण भुकेची नैसर्गिक रचना बिघडते. नसांवर देखील वाईट परिणाम होतो. चहा आणि कॉफीऐवजी आलं-हळद आणि दूध-पाणी यांचा उकाळो, धने, जिरे, ज्येष्ठमध यांचं उकळलेलं पाणी, गरम पाण्यातलं लिंबू सरबत यांचा वापर करून हळूहळू टप्प्याटप्प्यानी चहा-कॉफीची सवय घालवणं कोणालाही शक्य आहे.

कृत्रिम रासायनिक साखर घातलेली आणि यंत्रांनी दाबून त्यात हवा मिसळलेली 'एअरेटेड ड्रिंक्स' म्हणजेच कोल्डड्रिंक्स यांसारखी सगळी पेयं ही सारखीच अपायकारक असतात. खरं म्हणजे खऱ्या साखरेपेक्षाही ही गोड पेयं जास्त वाईट असतात. त्यामुळे 'टॉक्सिन्स' साठतात, शिवाय शरीरातली आम्लता वाढवतात, भूक मारतात, थोडक्यात वाट लावतात. त्यांचा दातांवर आणि आतड्यांवर खूप वाईट परिणाम होतो.

अशा पेयांची सवय घालवण्यासाठी हळूहळू त्यांचं प्रमाण कमी करावं, साधी सरबतं प्यावीत आणि शेवटी बाजारामधली थंड पेयं पूर्ण सोडून द्यावीत हेच खरं.



## 6) मलमूत्र

पोटात अन्न गेलं की पचनक्रिया अहोरात्र चालूच असते. कामाच्या ताणांमुळे, वेळ नसण्यामुळे, प्रवासात असण्यामुळे शेवटी शहरातल्या माणसांच्या सरासरी सवयी बघितल्या तर वेळेवर शौचाला न जाणाऱ्यांचं प्रमाण खूप दिसतं. लघवीला वेळेवर न जाण्याचंही प्रमाण खूप आहे. सार्वजनिक मुताऱ्या घाण असतात ही शहरातली परिस्थिती जिथे तिथे तशीच असते. पुरुषांच्या मुताऱ्या घाणेरड्या असतात, पण निदान संख्येनी बऱ्याच असतात. स्त्रियांसाठी तर मुताऱ्या इतक्या कमी असतात की स्त्रियांचे एकूण हालच होतात. शाळांच्या स्वच्छतागृहांची परिस्थिती सगळीकडे फार वाईट असते.

या परिस्थितीला उपाय म्हणजे वेळेवर शौचाला जाणं. जिथे अशी सोय नाही अशा ठिकाणी फार वेळ राहू नये. घरी असताना अगदी लहान मूल आणि फक्त आई किंवा फक्त बाबा असले तर लहान मुलाला पाळण्यात, क्रिबमधे ठेवून लघवीला जायला हवं. मूल जरा मोठं असलं तर त्याला घेऊन जायला हवं आणि जरा मोठं असलं तर घराच्या मुख्य दरवाजाला वरच्या उंचीवरचा बोल्ट लावून, मोरीवर जाऊन यावं.

कुठच्याही परिस्थितीत शौच किंवा लघवी दाबून ठेवू नये. आपण मगाशी म्हणालो त्याप्रमाणे भारत हा मुख्यतः उष्ण प्रदेशच आहे. म्हणजे थोडंथोडं पाणी दिवसभर पीत रहायला हवं. त्याचा परिणाम म्हणून लघवीला अनेक वेळा जावं लागणारच. मुख्य म्हणजे त्याबद्दलचा संकोच सोडून द्यावा. बाहेर कोणाकडे गेलेलं असताना हा संकोच वाटण्याचा प्रश्न जास्त प्रमाणात येतो. लघवीला जाताना तोंडानी विचारताना त्याला फ्रेश होणं, वॉशरुमला जाणं असं इंग्रजीत म्हणायचं का लघवीला, मोरीवर जाणं म्हणायचं याला कमी महत्त्व आहे.



# 7) झोप

आणखी एक सावकाश अपाय करणारी सवय म्हणजे झोपेच्या अनियमित वेळा. हा सगळ्यांचा मोठा शत्रू असतो. काही लोकांना मधूनमधून किंवा कायम रात्रपाळी करावी लागते. त्यांच्या बुद्धिमत्तेवर आणि आकलनशक्तीवर वाईट परिणाम होऊ शकतो. शिवाय पचनसंस्थेवर, प्रतिकारशक्तीवर वाईट परिणाम होतातच. सर्दी, खोकला वारंवार होतो आणि जास्त टिकतो. थकवा लवकर येतो आणि जास्त टिकतो.

यावर उपाय म्हणजे दिवसपाळीत काम शोधणं. झोपेच्या वेळा नियमित करणं. सूर्यप्रकाशाशी जुळवून घेणं आणि भरपूर, नियमित सर्वांगाचे व्यायाम करणं.

नियमितपणी अनेक वर्षं मऊ गादीवर झोपण्याची सवय झालेली खूप लोकं आजकाल आढळतात. कुटुंबाची सुबत्ता जशी वाढत जाईल तशी जुनी कापसाची गादी जाते आणि महागाची मऊ गादी येते. गादी मऊ, उशी मऊ, पांघरुण मऊ अशी सगळी प्रगती होत जाते. पाठीच्या कण्याला आधार मिळत नाही आणि हळूहळू अनेक आजार उद्‌भवतात. त्यात कंबरेचा बहुतेक वेळा पहिला नंबर लागतो आणि मानेचा दुसरा.

यावर उपाय म्हणजे ठरवून सतरंजीवर, चादर टाकून, रजईवर झोपावं. थंड प्रदेश असला किंवा थंडीचा मौसम असला तर खाली प्लायवूड अंथरुन त्यावर रजई टाकून झोपावं.

'आता माझी झोपण्याची वेळ झाली. माफ करा पण मला आता निघायला हवं' हे म्हणता येण्याचा मुख्य प्रश्न असतो. आपल्या घरी आलेल्या पाहुण्याला जा सांगणं त्याहून कठीण असतं. त्यासाठी जरा आधी याची कल्पना देण्याचं तंत्र आत्मसात करावं लागतं.



# 8) व्यसनं

व्यसनं – साधारणपणी तरुणपणी व्यसनं लागण्याची शक्यता जास्त असते. पालक-शिक्षणात मी आणि शोभा नेहमी सांगतो की अमूक गोष्ट करायची नाही अशी बंधनं घातली की पालकांपासून चोरून ती गोष्ट करण्याची शक्यता वाढते. चोरून याच प्रकारे काहीतरी करणारी मित्रमंडळी एकत्र जमतात आणि हळूहळू आवड, सवय करत करत त्याचं व्यसन बनतं. कुठचं व्यसन वाईट आणि कुठचं चांगलं असं खरं म्हणजे काही नसतंच. तंबाखू, मावा, गुटखा, बिडी, सिगारेट, बिअर, दारू, चरस हे सगळंच वाईट असतं. अशा व्यसनांत अडकलेल्यांचं प्रमाण बरंच आहे एवढं मला नक्की माहिती आहे, टक्केवारी माहिती नाही. पण यातल्या कुठच्याच व्यसनाचा ताबडतोब वाईट परिणाम होत नाही. व्यसन सावकाश सावकाश शरीर आणि मन पोखरत जातं.

तंबाखू, बिडी, सिगारेट यांमुळे तोंडाचा, फुफ्फुसाचा कर्करोग होतो हे सगळ्यांना माहिती आहे. तंबाखूचं व्यसन घालवण्यासाठी पेरूच्या झाडाचा पाला उपयोगी आहे, व्यायाम पण असतात.

दारुचं व्यसन घालवण्यासाठी मानसिक उपचार, औषधं, अल्कोहोलचं प्रमाण कमी कमी करत नेणं वगैरे बऱ्याच गोष्टी करता येतात. त्या व्यसनी माणसाच्या निर्धारावर मुख्यतः अवलंबून असतात.

अमली पदार्थांचं व्यसन हा इतका गंभीर आणि मोठा विषय आहे की, इथे त्याविषयीचा उल्लेख करूनच थांबतो. त्यातले खास तज्ज्ञ असतात, आणि व्यसनमुक्ती केंद्रं असतात. मानसिक समुपदेशनाच्या कक्षेत ते येत नाही.



## 9) औषधं आणि आरोग्य सुविधा

भारतातल्या सुशिक्षित आणि इंग्लिश लिहिता-वाचता येणाऱ्या माणसाला एक वाईट सवय लागलेली आढळते. औषधांच्या दुकानदारांवरही बंधनं बेताचीच असतात. त्यामुळे किरकोळ कारणासाठी डॉक्टरांना न विचारता औषधाच्या गोळ्या घेण्याचं प्रमाण खूप आहे. त्यामुळे शरीराच्या प्रतिकारशक्तीची क्षमता कमी होते.

यावर उपाय असा की, केवळ विश्रांती आणि भरपूर पाणी पिण्यामुळे बरं वाटण्याची शरीराला दोन दिवस संधी द्यावी.

बाम, व्हिक्स, इनहेलर, व्हेपरायझर यांचा वापरसुद्धा हळूहळू शरीर बधीर करत जातो. त्यापेक्षा व्यायाम, त्या त्या अवयवाचा स्वतंत्र व्यायाम, दीर्घश्वसन, विश्रांती असे उपाय वापरावेत.

आरोग्य सुविधा – आपण आत्तापर्यंत बघितलेल्या अडचणींमुळे मानसिक-शारीरिक परिणाम झाले नाहीत तरच नवल आहे. प्रचंड मानसिक ताणांमुळे शरीरावर दुष्परिणाम आणि आरोग्य सुविधांची अवस्था बघून आणखी मानसिक ताण अशी समाजाची परिस्थिती आहे.

हॉस्पिटलमधला खर्च, डॉक्टरांच्या निदान करण्याच्या फिया, इतर तपासण्यांचा खर्च, औषधांचा खर्च इतका भयानक वाढलेला आहे की, आपण आजारी पडलो तर काय होईल या चिंतेनीच माणूस आजारी असतो.

गेल्या 50 वर्षांत भारतीय माणसाचं सरासरी आयुर्मान वाढलं पण आरोग्याचा दर्जा खालावला हे आपण सुरुवातीला बोललो ते अगदी खरं आहे.



## 10) व्यायाम

विषारी घटकांचं आपल्या आयुष्यातलं प्रमाण आपण ठरवायचं. काही प्रमाणात हे घटक आयुष्यात असतीलच. त्यांचे परिणाम कमी करण्यासाठी भरपूर पाणी प्यावं, नियमित व्यायाम करावा.

व्यायामापैकी सर्वात सोपा व्यायाम म्हणजे चालणं. शक्य तेव्हा धावणं. ट्रेडमिल वगैरे प्रकार नाइलाज असला तरच वापरावेत. स्वतःची जास्तीतजास्त कामं चालत जाऊन केली की सगळे प्रश्न आपोआप सुटतात. मातीवर चालता आलं तर फारच छान.

पन्नास वयानंतर धावण्यापेक्षा चालण्यावर भर दिलेला बरा. सगळ्या सांध्यांचे स्वतंत्र व्यायाम रोज करावेत.

दुर्दैव असं आहे की, बहुतेकांचा व्यायामाच्या फायद्यांवर विश्वास नाही. काम, दगदग, धावपळ, खेळ, नृत्य आणि व्यायाम या निराळ्या गोष्टी आहेत हे भारतीयांना कळत नाही.

काम, खेळ, नृत्य चांगलं करता यावं, म्हणून व्यायाम करायचा असतो. दगदग, धावपळ यांचा दुष्परिणाम कमी व्हावा म्हणून व्यायाम करायचा असतो.

चांगलं, रुबाबदार, आरोग्यकारक, स्लिम ट्रिम दिसण्यासाठी व्यायाम करण्यात चूक काहीच नाही. पुरुष जे वजनांचे व्यायाम करून स्नायूंचा आकार सुधारतात, बॉडी बिल्डिंग करतात, त्यात चुकीचं काहीच नसतं. त्यातलं सातत्य मात्र महत्त्वाचं असतं. असा व्यायाम बंद झाला किंवा बंद करावा लागला तरी त्याचे पर्याय शोधून ते चालू ठेवण्याला महत्त्व आहे. नाहीतर वजन वाढण्याची खूप शक्यता असते.



## 11) शिक्षण

शिक्षण – मी स्वतः निरनिराळ्या ठिकाणी 100 वेळा ऐकलेला आणि मी किमान 100 वेळा बोललेला शिक्षणाबद्दलचा एक महत्त्वाचा विचार असा आहे,

'प्रत्येक मुलाला शिकण्याची इच्छा असतेच. घरातल्या मोठ्या माणसांनी आणि शिक्षकांनी फक्त त्यांना त्याची गोडी लागेल एवढं बघायचं आहे. निदान शिक्षणाच्या प्रवासातला अडसर बनू नये.'

भारतीय शिक्षण पद्धतीत ही एक महत्त्वाची गोष्ट सोडून बाकी सगळं करतात. खुद्द माझ्या आणि शोभाच्या ओळखीत औपचारिक शिक्षणामधले अनेक विद्वान, उच्चशिक्षित लोक आहेत. सरकारनी अनेक प्रयोग केले, अनेक फतवे काढले. पण आत्तापर्यंत भारतीय शिक्षणात ही गोष्ट कोणालाही जमली नाही.

सध्या तर संपूर्ण शिक्षणाचा उद्देश फक्त भविष्यात पैसे मिळवण्याची सोय एवढाच बनलेला आहे. शिक्षणात मिळणारा आनंद सगळे मिळून विसरले आहेत.

विलायतेतली शिक्षण पद्धती भारतातल्यापेक्षा नक्की सरस आहे. प्रत्येक लहान मुला-मुलीला 'सक्तीचं आणि मोफत शिक्षण' इथपर्यंत इंग्लंड-अमेरिका 50 वर्षांपूर्वीच पोहोचले. भारतात ते महत्त्वाचं असून जमलं नाही, पण 'इंग्रजी माध्यम' मात्र आलं. विलायतेतली मुलं इंग्लिशमधे शिकतात कारण ती त्यांची मातृभाषा, कुटुंबभाषा आहे. भारतातली मुलं घरी निराळी भाषा आणि शाळेत इंग्लिश याच्या कात्रीत सापडली. या 'इंग्लिश मीडियम'मधल्या शिक्षणामुळे अनेक कुटुंबांत मुलं आईवडलांना अडाणी आणि तुच्छ समजायला लागली.

कौटुंबिक स्वास्थ्य हरवत चाललं. कुटुंबातल्या कुटुंबात गैरसमजुतीच्या मोठ्या दऱ्या निर्माण झाल्या.

भारतभरातल्या उच्च शिक्षणात एक रोग खूप बळावला. फक्त 'थिअरी'चं साम्राज्य चालू झालं. 'प्रॅक्टिस'चं महत्त्व कमी झालं. थिअरी-थिअरी करणारे 'अॅकॅडेमिशियन्स' फक्त कॉलेजेसमधले प्रोफेसर्स बनायला लागले. कॉलेजेस खूप निघाली. त्यामुळे अशा अॅकॅडेमिशियन्सकडे शिकणारे विद्यार्थीही पुढे थिअरी शिकवण्याच्याच मार्गानी गेले. थिअरी आणि प्रॅक्टिस यांच्यात देखील

मोठी दरी निर्माण झाली.

थिअरी शिकणं-शिकवणं हे श्रेष्ठ, आणि प्रॅक्टिस करणाऱ्या अनेक पद्धतींचा दर्जा कनिष्ठ अशी समजूत पक्की झाली. प्रॅक्टिसमधल्या व्यावसायिकांना, सामाजिक कार्यकर्त्यांना समाजात दुय्यम स्थान मिळायला लागलं. त्यांचा उल्लेख 'फ्रिल' असा व्हायला लागला. समाजरचनेतला हा विखार खूप वाढला.

या विषाचा परिणाम सामाजिक कौटुंबिक जीवनावर सावकाश सावकाश एव्हाना झालाच आहे आणि असाच होत राहणार.



*'प्रत्येक मुलाला शिकण्याची इच्छा असतेच. घरातल्या मोठ्या माणसांनी आणि शिक्षकांनी फक्त त्यांना त्याची गोडी लागेल एवढं बघायचं आहे. निदान शिक्षणाच्या प्रवासातला अडसर बनू नये.'*

## 12) कपडे

रसायनांपासून बनवलेल्या कृत्रिम धाग्यांनी बनवलेल्या म्हणजेच 'सिंथेटिक' कापडांपासून देखील सावकाश होत जाणारे खूप परिणाम असतात. सुती कापडासारखी ऊब त्यांत नसते. घाम शोषला जात नाही. त्यामुळे त्वचेच्या आरोग्याला ते हळूहळू अपाय करतात.

यावर उपाय म्हणजे ज्याला पैशानी परवडेल त्यानी पूर्ण सुती पोषाख वापरावा. परवडण्याचा उल्लेख करण्याचं कारण म्हणजे सुती कपडे कमी टिकतात, जास्त प्रमाणात शिवावे लागतात. असेही धागे, कापडं मिळतात की ज्यात 80% सूत आणि 20% कृत्रिम धागा असतो. अशी कापडं जास्त टिकतात. त्यामुळे मध्यमवर्गीय माणसं याला सुवर्णमध्य समजतात. ही कल्पना रोजच्या दिनचर्येसाठी सर्वात व्यवहार्य असल्यामुळे मान्य करण्याखेरीज इलाज नाही.

सुती कपडे किंवा टेरिकॉटचे कपडे पांढऱ्या रंगाचे असले तर ते पांढरेशुभ्र करणं, पांढरे राखणं यात खूप खटपट, खर्च, रसायनांचा वापर असतो. त्यासाठी मुळातच मध्यम गडद, फिक्या मळखाऊ रंगाचे कपडे हाही अनेक प्रश्नांचा सुवर्णमध्य ठरतो.

ज्याला हा मुद्दा समजला आणि पटला असेल त्यानी स्वतःच्या कपड्यांच्या दुरुस्त्याही स्वतःच कराव्यात. त्यासाठी जरूर असणारं कसब शिकून घ्यावं आणि अशा दुरुस्त्या वेळेवर कराव्यात.

धुतल्यावर कपडे नीट सरळ करून टांगून वाळत टाकता आले तर इस्त्री हा एक प्रश्नही निकालात निघू शकतो. अशा पद्धतीनी वाळवलेले कपडे अगदी व्यवस्थितही दिसतात. इस्त्री करायचीच ठरलं तर निदान ती स्वतः घरी करावी.



# 13) सौंदर्यप्रसाधनं

निरनिराळ्या प्रसाधनांचा वापर गेल्या काही वर्षांत प्रचंड प्रमाणात वाढलेला आहे. घाम येणं ही नैसर्गिक क्रिया आहे हे माहिती असून घाम न येणाऱ्या फवाऱ्यांच्या जाहिराती दिसतात. टाल्कम पावडरचा वापर प्रचंड वाढला आहे. गोरं दिसावं म्हणून अनेक क्रीम्स, लोशन्स मिळतात. ही सगळी उत्पादनं संपूर्णपणी रासायनिक असतात. शरीररचनेच्या नैसर्गिक प्रक्रियेत त्वचेला छिद्रं असणं हे गृहीतच आहे. फवारे, पावडर, क्रीम, लोशन कशानीही ती छिद्रं बंद करणं अपायकारकच असतं. त्यांचा वापर करताना ती रसायनं सूक्ष्मपणी नाकातोंडातून फुफ्फुसांपर्यंत जाऊन फुफ्फुसाच्या आत चिकटून बसतात आणि त्याची कार्यक्षमता कमी करतात.

यावर साधे सोपे उपाय आहेत. ओठ कोरडे होऊ नयेत, फुटू नयेत म्हणून व्हॅसेलीन, लिपस्टिकऐवजी गाईच्या तुपाचा वापर करावा. कोल्ड क्रीमऐवजी कोकम तेल वापरावं. रोज एकदा ऐवजी दोनदा आंघोळ करावी. चेहरा नीटनेटका ठेवण्यासाठी फक्त चेहरा दिवसातून जास्त वेळा धुवावा. शक्य तेव्हा चेहऱ्यावर हातानी पाणी मारावं. रासायनिक टाल्कम पावडरऐवजी माफक संगजिरा पावडर वापरावी. आयुर्वेदिक औषधांच्या दुकानात ती सहज मिळते. ती ब्रँडेड, सुवासिक, आणि संपूर्णपणी रासायनिक असलेल्या टाल्कम पावडरपेक्षा स्वस्तही असते.



## 14) काम

कामाचे प्रकार – काही काही कामांचा प्रकारच असा असतो की शरीराच्या एकाच अवयवाला ताण पडतो. काही लोक दिवसभर उभं राहून काम करतात. त्यांना पोटऱ्यांच्या रक्तवाहिन्या फुगण्याचा, नसा दाबल्या जाण्याचा म्हणजेच 'व्हेरिकोज व्हेन्स'चा त्रास होण्याची खूप शक्यता असते, असं काम करणाऱ्यांनी वेळापत्रक ठरवून पाय वर करून बसणं, चालणं अशा हालचाली कराव्यात.

एकाच हातानी जास्त ताण घेऊन काम करणाऱ्यांनी देखील हातांचे-बोटांचे व्यायाम करण्याची गरज असते.

बैठं काम करणाऱ्यांनी ठरवून अनेक वेळा थोडं चालणं, शक्य असलं तर कंबरेचे व्यायाम करणं, धाप लागेपर्यंत स्पॉट रनिंग करून, जलद श्वसन, दीर्घ श्वसन आणि नेहमीसारखं श्वसन असे व्यायाम टप्प्याटप्प्यानी दिवसभरात काही वेळा करावेत.

कामाच्या प्रकारात धूळ, सिमेंट, रसायनं यांचा संबंध असला तर नाक आणि तोंड झाकण्यासाठी मास्क वापरावा. जरूर तिथे झीरो नंबर चष्मा वापरावा.

थोडक्यात, चरितार्थासाठी काम करावं, ते मनापासून आणि उत्तम करावं, पैसे मिळवावेत, बढती, सन्मान मिळवावा, पण स्वतःची तब्येत जरूर निःसंकोचपणी सांभाळावी.



## 15) प्रवास

प्रवास – शहरवासीयांना घरापासून आपापल्या कामावर पोचण्यासाठी पूर्वी सरासरी 15-20 मिनिटं लागायची. आता अर्धा ते एक तास लागणार हे लोकांनी मान्यच केलं आहे. जेवढं शहर मोठं तेवढी अंतरं जास्त. कामावर पोचण्यासाठी जास्त वेळ, जास्त गर्दी, जास्त दमणूक यामुळे दिवसाच्या 24 तासांचं सगळं गणितच बिघडतं. कुटुंबाबरोबरचा वेळ, बायको, मुलं, नातेवाईक, मित्र यांच्यासाठीचा वेळ प्रवासात गेल्यामुळे खरा आनंद म्हणजे कौटुंबिक सहवासाचा आनंद आयुष्यातून कमी कमी व्हायला लागतो. आनंद कमी याचा परिणाम तर होणारच की!

यावर उपाय म्हणजे घर आणि कामाची जागा यातलं अंतर चालत जाण्याजोगं म्हणजे एक ते तीन किलोमीटरमधलं ठेवणं.

शक्य तेवढा बसनी प्रवास करणं म्हणजे स्वतःवर ड्रायव्हिंगचा ताण येत नाही. प्रवासाचा वेळ कमी असला तर तेवढा वेळ कंबर आणि पाठ ताठ ठेवून बसता येतं. त्यामुळे रस्त्यावरच्या खड्ड्यांचा कमी त्रास होतो.



# 16) पैसे

पैशांचे ताण – प्रत्येक व्यक्तीला, कुटुंबाला अन्न, वस्त्र, निवारा या तीन अत्यावश्यक गरजा भागवण्यासाठी मूळ निसर्ग योजनेपेक्षा फार कष्ट घ्यावे लागतात. अन्न आणि वस्त्र यांची परिस्थिती वाईट आहेच, पण 'निवारा' याची परिस्थिती भयानक आहे. जागा विकत घेण्याचा प्रश्न असो, भाड्यानी घ्यायची असो, त्याच्या भयानकतेत फरक नाही. अक्षरशः पेकाट मोडल्यागत सगळ्यांची अवस्था आहे. शहरंच काय, त्यांची उपनगरं, त्यापलीकडची छोटी गावं यांचीही परिस्थिती तीच. हा पैशाचा ताण प्रत्येकावर येणारच की!

भारतातल्या कष्टकरी आणि कनिष्ठ मध्यमवर्गीयांची परिस्थिती अशी आहे की, चालू महिना कसा काढायचा या चिंतेत ते 24 तास असतात. या एकाच विचारानी डोकं भरलं तर इतर काही डोक्यात शिरूच शकत नाही, अशी अवस्था त्यांची झालेली असते.

असं म्हणतात की, ज्याच्या गरजा कमीत कमी तो सर्वांत श्रीमंत. या विचारात खूप तथ्य आहे. मोठ्या शहरात मध्यमवर्गीय आयुष्य जगायला माणशी 15,000 रुपये दर महिना खर्च येत असेल तर छोट्या गावात माणशी 1500 रुपयात खर्च भागतो.

मगाशी मी उल्लेख केला त्या विक्रांत आणि मोहिनी पाटील यांच्याशी मी याबद्दल सविस्तर बोललेलो आहे. तुमच्यापैकी एखाद्या कुटुंबानी जरी शहरीकरणाच्या अजगराच्या विळख्यातून स्वतःची सुटका करून घेतली तरी या लेखाचं सार्थक होईल.



# 17) उपकरणं

एका धक्कादायक माहितीनीच सुरुवात करूया. मायक्रोवेव्ह या कल्पनेनी तंत्रज्ञानातल्या प्रगतीमुळे अवाक् व्हायला होतं हे खरं आहे, पण त्यातल्या पदार्थातलं सत्व मात्र नाहीसं होतं. अगदी नाइलाज असेल तेव्हाच मायक्रोवेव्ह वापरावा.

कॉम्प्युटर – साधारण 1980 नंतर भारतात खऱ्या अर्थानी कॉम्प्युटर्स सगळ्यांना माहीत झाले. हळूहळू कॉम्प्युटर सगळ्या क्षेत्रांत शिरला. हातानी, स्वतःची बुद्धी वापरून लिखाण, आकडेमोड या गोष्टी हळूहळू बंद झाल्या. सध्या तर बघावं तिकडे सगळ्या गोष्टी कॉम्प्युटरवर करणं चालू आहे. मुख्य मुद्दा एवढाच आहे की, जो अवयव, बुद्धीचा भाग वापरला जाणार नाही त्याची कार्यक्षमता कमी कमी होईल आणि शेवटी तो अवयव किंवा ती बुद्धीची क्षमता पूर्णच नाहीशी होईल.

अशी लोकं जिकडेतिकडे दिसतात की ज्यांना कॉम्प्युटरबरोबर वेळ घालवता येतो, त्यात ते रमतात, पण लग्नाच्या जिवंत जोडीदाराबरोबर नीट वागणं त्यांना कठीण जातं. आणखीन 20-25 वर्षांनी याबाबतीत मानव कुठे पोचला असेल कोण जाणे! अत्यंत हुशारीनी ज्या गोष्टीचा शोध लावला तीच हुशारी महाग पडणार की काय!

जास्त वेळ कॉम्प्युटरवर काम करण्यानी किंवा खूप वेळ कृत्रिम उजेडात काम करण्यानी डोळे बिघडतात, मेंदूला थकवा येतो हे अगदी नक्की आहे. यावर उपाय म्हणजे सूर्यप्रकाशात जास्तीत जास्त काम होईल असा प्रयत्न करणं. कॉम्प्युटरवर काम करत असताना वेळापत्रक ठरवून मधेमधे उठून चालायला जाणं, कंबरेचे, मानेचे, हाताचे व्यायाम करणं, डोळे आयग्लासनी धुणं, चेहरा धुणं, नैसर्गिक प्रकाशात चक्कर मारून येणं, डोळ्यांचे व्यायाम करणं, डोळे मिटून त्यांवर काकडीचे काप ठेवून पडून राहणं, ओला कापूस डोळ्यावर ठेवणं, जेवणात रोज गाजराचा कीस खाणं एवढ्या करण्याजोग्या गोष्टी आहेत.

त्याशिवाय संगणक ज्या वेगानी आकडेमोडी करतो, प्रश्नांची उत्तरं शोधतो, त्याची सवय झाली की प्रत्येक कृतीच्या वेगाची कल्पनाच बदलायला

सुरुवात होते. थोडक्यात माणूस अधीर बनतो.

यावर उपाय म्हणजे ठरवून कॉम्प्युटरशिवाय आकडेमोडी, चित्रं, लिखाण करण्याचा सराव ठेवणं.

लॅपटॉप कॉम्प्युटर हे आणखीनच निराळं प्रकरण आहे. तो मांडीवरच ठेवण्याकरता बनवल्यामुळे साहजिकच मांडीवर बरेच वेळा ठेवला जातो. तो सोयीचा असतो यात शंका नाही, पण त्यातून जी उष्णता निर्माण होते ती नेमकी जननेंद्रियाच्या फार जवळ असते.

याउलट पुरुषाच्या वृषणाची नैसर्गिक रचना लक्षात घेतली तर शुक्रजंतू निर्माण व्हायला ती उष्णता अपायकारक असते. त्यामुळे वंध्यत्वाच्या प्रमाणात वाढ होते.

यावर उपाय म्हणजे लॅपटॉपचा वापर टेबलावर ठेवून करणं.



*जो अवयव, बुद्धीचा भाग वापरला जाणार नाही त्याची कार्यक्षमता कमी कमी होईल आणि शेवटी तो अवयव किंवा ती बुद्धीची क्षमता पूर्णच नाहीशी होईल.*

## 18) तंत्रज्ञान

सबंध जगात निरनिराळी आयुधं बनली त्यामुळे माणसाची सोय झाली. कामं लवकर, कमी शारीरिक कष्टात आणि सुबक होण्यासाठी हत्यारं, अवजारं आणि आयुधं उपयोगी आहेत हे जगभर मान्य झालं.

प्रगतीच्या पुढच्या टप्प्यावर अशी यंत्रं बनली की, ज्यामुळे ती अनेक पटींनी आणि खूप लवकर उत्पादन करायला लागली. तेव्हा मात्र घोटाळा सुरू झाला कारण माणसांच्या संख्येला पुरेसं काम उपलब्ध होईना. दुर्दैवानी तंत्रज्ञानाचे दुष्परिणाम खूप उशिरानी म्हणजे पुढच्या पिढ्यांना कळणार आहेत. ते कळेपर्यंत खूप उशीर होणार आहे.

यावर उपाय म्हणजे अवाढव्य आकाराचे उद्योग न उभारता सोपी तंत्रज्ञानं आणि मध्यम आकाराचे उद्योग उभारायला उत्तेजन द्यायला पाहिजे. मध्यम आकाराच्या छोट्या उद्योगधंद्यात नोकरी करणाऱ्याला, तो उद्योग चालवणाऱ्या माणसाला मध्यम पैसे, कामाचं समाधान जास्त मिळतं. दर महिना पगार घेणाऱ्या नोकरांची संख्या जितकी जास्त तितकी मालकावर जबाबदारी जास्त. त्यामुळे मानसिक शांतीवर वाईट परिणाम होतो.

अणु ऊर्जा या गोष्टीचा शोध म्हणजे मानवाच्या बुद्धीचा चमत्कार म्हणण्याइतका अफाट आहे, अणूची ताकद जेवढी उपकारक तेवढीच संहारक आहे.

जगात खरोखर अणुयुद्ध झालं तर सगळे मानव, प्राणी, वनस्पती यांचा देखील संहार होऊ शकेल.



## 19) करमणूक

करमणूक – करमणुकीचे इतर सगळे प्रकार, नाटक, सिनेमा, संगीत, नृत्य, वाचन– हे एका बाजूला आणि टेलिव्हिजन दुसऱ्या बाजूला. इतर सगळ्या प्रकारांत तिकीट काढून, प्रवास करून कुठेतरी जावं लागतं. त्यामुळे त्यांच्यावर नैसर्गिकपणे मर्यादा असतात. टी.व्ही., व्ही.सी.आर. यांची गोष्टच निराळी. अगदी कमी खर्चात, कमी श्रमात, सहजपणे टी.व्ही., व्ही.सी.आर. चालू करता येतो आणि कितीही वेळ बघता येतो. इतक्या सोप्या गोष्टीचं एका अर्थानी कौतुकही वाटतं आणि त्याचं व्यसनदेखील लागू शकतं.

खरं म्हणजे एव्हाना टी.व्ही.चं व्यसन अनेकांना लागलेलं आहेच. टी.व्ही.चा प्रकार बदलेल, त्यात आणखी सुधारणा होतील, पण व्यसनाधीन लोकांची संख्या वाढत जाईल. टी.व्ही.चे दुष्परिणाम डोळ्यावर तर होणारच पण त्याहीपेक्षा जास्त गंभीर परिणाम मेंदूवर होणार. स्वतः विचार करण्याची क्षमता कमी होणार ही एक अडचण. त्याशिवाय टी.व्ही.वर जे बघायला मिळेल तसंच प्रत्यक्ष जगात सगळीकडे चालतं ही गैरसमजूत जास्त पक्की होणार. प्रत्यक्ष अनुभवाचं महत्त्व आत्ताच कमी व्हायला लागलंय. टी.व्ही.वर बघून सबंध जगाची इत्थंभूत माहिती मिळतेच की!

दूरदर्शन, टेलिव्हिजनवरचे शेकडो चॅनल्स आणि त्यांच्यावरच्या शेकडो सीरियल्स आणि जाहिराती आपण बघतो. अगदी कल्पना करू की, जाहिरातींच्या वेळी टी.व्ही. 'म्यूट' केला तरी काय दिसायची ती साबणाची, तेलाची, मोटरसायकलची जाहिरात आपल्याला दिसतेच. त्या विशिष्ट उत्पादनाबद्दल आपला पूर्वग्रह तयार होतोच.

यावर उपाय म्हणजे टी.व्ही.चा वापर कमी कमी करत जाणं, पुस्तकं, नियतकालिकांचा वापर करणं, खेळ, नाटक, नाच, संगीत अशा इतर करमणुकीच्या साधनांचा वापर वाढवणं.

अनेक मुलांचा संध्याकाळचा टी.व्ही. हा 'वीकपॉइंट' असतो. त्यापायी मुलं मैदानी खेळांचा कंटाळा करतात. शोभाच्या गरवारे बालभवनची मुलांना गोडी लागली की हे चित्र बदलतं असं आढळलेलं आहे. अशा संध्याकाळी

खुल्या मैदानात खेळणाऱ्या मुलांना तो खेळ टी.व्ही.वरच्या कार्यक्रमापेक्षा जास्त महत्त्वाचा वाटतो.

खूप मोठ्यानी वाजणारं संगीत ऐकणं, लाउडस्पीकरवरचं बोलणं खूप वेळ ऐकणं, आसपास कर्कश्श आवाज, गोंगाट, यंत्रांचा धाड् धाड् असा आवाज सतत ऐकणं अशा गोष्टींमुळे हळूहळू मनाच्या शांततेवर वाईट परिणाम होतो, कानांवर वाईट परिणाम होतो.

याच्यावर उपाय म्हणजे अशा त्रासदायक आवाजाच्या ठिकाणाहून लवकरात लवकर पळ काढणं, हळू आवाजातलं मंद संगीत किंवा बोलणं ऐकणं हा आहे. त्याशिवाय निर्मनुष्य ठिकाणी जाऊन शांत बसून राहण्याचा प्रयत्न करणं.

मोबाईल, कॉर्डलेस फोन, कानात सतत प्लग घालून संगीत ऐकत बसणं, ऐकता ऐकता चालणं, या उपकरणामधल्या रेडिएशनमुळे शरीरातल्या पेशी तयार करणाऱ्या यंत्रणेवर वाईट परिणाम होतो. तो परिणाम अगदी हळूहळू पण भयानक होतो. त्यावर उपाय एकच. अशा उपकरणांचा वापर हळूहळू कमी करत जाणं.



## 20) प्रसारमाध्यमं

काही काही सामाजिक रूढीदेखील जवळजवळ व्यसनांचं रूप धारण करतात. त्यांपैकी वर्तमानपत्र ही एक गोष्ट आहे. सकाळी वर्तमानपत्र वाचल्याशिवाय बेचैन होणारी खूप माणसं दिसतात. त्यातल्या बातम्या माहिती नसणं म्हणजे हळूहळू कमीपणाच वाटायला लागतो. एकमेकांशी बोलताना स्वतःविषयी काहीतरी खरं बोलण्यापेक्षा वर्तमानपत्रातल्या बातम्यांविषयी बोलणं सोयीस्कर वाटायला लागतं. हळूहळू अशा वर्तमानपत्रातल्या उल्लेखांचं रूपांतर फक्त कुचाळक्या ऊर्फ 'गॉसिप' पुरतं होतं.

खरं म्हणजे जगात कुठे काय झालं याच्या बातम्या आपल्याला ताबडतोब, दुसऱ्या दिवशी, आठ दिवसांनी कळल्यानी स्वतःच्या आयुष्यात काही फरक पडत नाही.

काही गोष्टी वर्तमानपत्रांमुळे आपल्याला अतिशयोक्त स्वरूपात चांगल्या किंवा अतिशयोक्त स्वरूपात वाईट वाटतात. आपली रास्त भूमिका हरवून जाते. विवेक कमी होतो आणि हळूहळू आपण विवेकनिष्ठेपासून दूर जातो. आपले अनेक पूर्वग्रह बनतात आणि त्यामुळे अपाय होतो.

सर्व प्रकारची माध्यमं आपल्यावर माहितीचा भडिमार करतात, पण त्यामुळे ज्ञान वाढत नाही. ज्ञान वाढलं अशी स्वतःची नुसती समजूत होते. त्यामुळे जोडीदार, मित्र, सगळ्या नात्यांवर वाईट परिणाम होतो. इतरांशी जमवून घेता येत नाही, त्यामुळे एकटेपणा सावकाश सावकाश वाढत जातो. यावरचा उपाय म्हणजे माध्यमांचा वापर बेताचा ठेवणं, लोकांशी जास्त संपर्क ठेवणं, स्वतःचं चिंतन वाढवणं.



## 21) कुटुंबातला बेबनाव

आपला मुख्य अभ्यासाचा विषय, काळजीचा विषय म्हणजे कौटुंबिक विसंवाद.

याच पुस्तकसंचाच्या सुरुवातीच्याच प्रकरणात मी उल्लेख केल्याप्रमाणे एकमेकांशी नीट पटणाऱ्या विवाहित जोडप्यांचं भारतातलं प्रमाण आहे 3%. या सगळ्याचा ताण, म्हणजे सत्याण्णव टक्के लोकांवरचा रोजचा ताण त्यांच्या स्वतःवर आणि मुलांवर येणारच की!

लग्नाच्या जोडीदाराबद्दल खरोखरच काही वाटेनासं होतं. एकमेकांच्यात 'कॉमन' काहीच न राहिल्यानी जोडीदाराबद्दल पूर्ण बेपर्वाई नजरेला पडते.

अशा घरात मुलं असली तर ती अस्वस्थ असतात. आईवडील मुळात एकमेकांवर नाराज असल्यामुळे मुलांवर देखील रागवारागवी करतात. मुलांचा अपमान करतात. याचा मुलांच्या मनावर परिणाम होणारच ना! सावकाश सावकाश पण मुलांवरचा ताण वाढत जातो.

समुपदेशनाच्या माझ्या एवढ्या वर्षांच्या अनुभवात मला दिसतंय की, नवरा-बायकोची लैंगिके संबंधाची इच्छा, प्रमाण, वेळा, प्रणयाच्या वेळा या सगळ्यांचा व्यवस्थित अभ्यास होऊन जी प्रमाणं सरासरी मानलेली आहेत त्यापेक्षा अनेक बदल झाले आहेत.

लैंगिक विकृतींचं प्रमाण वाढलं पण खरोखरच्या आनंददायक लैंगिक संबंधाची इच्छा कमी झाली, प्रमाण, वेळ सगळं कमी झालं. त्याचे परिणाम म्हणजे कृतज्ञतेची भावना आपुलकी, प्रेम कमी झालं.



## 22) सारांश

आणखी एक लक्षात ठेवण्याची गोष्ट आहे.

ज्याची खूप जाहिरात केली जाते, ती गोष्ट चांगली नसण्याची जास्त शक्यता असते.

एवढ्या आपण उल्लेख केलेल्या सगळ्या विषारी घटकांबद्दल सरकार काय करतंय हा प्रश्न कोणाच्याही मनात येणारच. त्याचं उत्तर साधं आहे. आपण या घटकांच्या बाबतीत काहीतरी करतो आहोत असा देखावा सरकार करतंय. सरकार काहीतरी करेल हे विसरून आपण स्वतःच काय करू शकू असा विचार करणं जरूरीचं आहे.

प्रश्नांची यादी संपतच नाही हे स्पष्ट दिसतंय. लोकांच्या अंतर्मनात असं असतं की, हे प्रश्न सोडवण्याची जबाबदारी सरकारची आहे, आपली नाही. एखादा दिवस केर काढणारी कामवाली आली नाही त्याबद्दल मालक आणि मालकीणबाई म्हणायला लागल्या की, मोलकरणीला यासाठी नेमलेलं असल्यामुळे मी त्या कामाला हात लावणार नाही तर ते योग्य होईल का?

सगळ्याचा निष्कर्ष अगदी तसाच साधा आहे.

जे काही करायचंय ते स्वतःला करायचं आहे. त्याची सुरुवात आज, आत्ता करायची आहे.



# 4

# इतर महत्त्वाचे प्रश्न

## 1) शहरीकरण

ग्रीक तत्त्वज्ञानी सॉक्रेटिस यानी 2500 वर्षांपूर्वीच्या अॅथेन्समधे राहून आदर्श गाव कसं असायला हवं याविषयी विचार मांडले. बऱ्याच लोकांनी त्या विषयावर विचार केला, सॉक्रेटिसच्या पुढाकारानी आदर्श गावाची काल्पनिक रचना त्यांनी त्यावेळच्या राजापुढे मांडली. ती मान्य होऊन राजानी अशा नवीन गावाची रचना प्रत्यक्षच करायचं ठरवलं. ते म्हणजे 'अॅक्रोपोलिस'. एका टेकडीवर वसलेलं अॅक्रोपोलिस हे गाव 5000 लोकवस्तीचं होतं. त्याचं कारण त्यावेळच्या मानसशास्त्राप्रमाणे आणि व्यवस्थापनशास्त्राच्या कल्पनांप्रमाणे किती माणसं एकमेकांशी शांततेनी वागतील, सगळ्यांच्या सगळ्या गरजा पुऱ्या होतील, किती माणसं, कुटुंबं यांना आवश्यक त्या सुविधा पुरवता येतील, किती माणसांचं व्यवस्थापन करणं शक्य होईल या सगळ्यांचा विचार करून ठरलं की, एक गाव 5000 लोकवस्तीचं असावं. लोकसंख्या वाढली तर पलीकडे दुसरं गाव वसवावं पण पहिलं गाव आणखी वाढू देऊ नये.

मी आणि शोभानी आमच्या मोठ्या 8 महिन्यांच्या प्रवासात अॅक्रोपोलिस प्रत्यक्ष बघितलं तेव्हा टाउन प्लॅनिंग या विषयात मी पूर्वी शिकलेल्या अनेक गोष्टी आठवल्या. अॅक्रोपोलिसवरचं प्रार्थना मंदिर 'पार्थेनॉन' हे तर फारच प्रसिद्ध आहे. ते पडलेल्या अवस्थेत बघावं लागतं ही मात्र वाईट गोष्ट आहे.

अॅक्रोपोलिस फार जुनं आहे. त्यानंतर हजारो वर्षांनंतर 'शूमाखर'नी मांडलेली 'स्मॉल इज ब्युटिफुल' कल्पना निराळ्या प्रकारे सॉक्रेटिसनी प्रत्यक्षच

अमलात आणली होती. ‘ऑप्टिमम’ म्हणजे योग्य, रास्त. फार मोठं काम आणि फार छोटं काम दोन्हींमधे अडचणी असतात. गाव, शहर वसवणं याच्या आकाराबद्दलची कल्पना एकाच गोष्टीनी स्पष्ट होते. गावाच्या कुठच्याही एका टोकापासून दुसऱ्या टोकाला धडधाकट ‘ॲडल्ट’ माणसाला 10 ते 15 मिनिटांत चालत पोचता आलं पाहिजे.

शूमाखरच्या कल्पना भारतातल्या मध्यमवर्गीय वातावरणात कशा अमलात आणायच्या हा एक स्वतंत्र लेखाचा विषय आहे. इथे फक्त एक उदाहरण घेऊया. मध्यमवर्गीय माणूस आपली मालमत्ता वाढवण्याच्या मागे आहे असं दिसतं. राहण्याचा फ्लॅट फार मोठा वाटतो, स्वच्छताही करणं कठीण जातं असं म्हणणारी खूप लोकं शहरात आहेत. याउलट काही लोकं मोठा फ्लॅट, मोठा बंगला, गुंतवणुकीसाठी फार्महाउस, त्याच गावात आणखी काही फ्लॅट, दुकान अशी मालमत्ता जमवतात. तेवढ्या जागांची देखरेख, व्यवस्था या सगळ्या कटकटी करायच्या का नाही हा निर्णय घेताना ‘शूमाखर’ची आठवण करावी.

त्यावेळची ती सॉक्रेटिसची कल्पना आजही योग्य वाटते. आपण त्याचं स्वरूप 1 नगरसेवक आणि त्याच्या वॉर्डची लोकसंख्या असं समजलं तर लोकांचे प्रश्न सोडवण्यासाठी, सुविधा पुरवण्यासाठी एका नगरसेवकाकडे 5000 वस्तीपेक्षा मोठा विभाग असल्यामुळे समाधानकारकपणी काम होत नाही.

जगात पूर्णपणे नवीन वसवलेली शहरं फार कमी आहेत. त्यातले सेक्टर्स अजूनही 5000 लोकवस्तीच्या अंदाजानी रचलेले असतात. टाउन प्लॅनिंग न शिकलेल्या माणसालाही माहिती असलेली नव्या शहराची भारतामधली दोन उदाहरणं म्हणजे चंदीगढ आणि नवी मुंबई.

शहरामधल्या कष्टकऱ्यांच्या डोक्यात एकच एक विचार असतो, तो म्हणजे जगण्यापुरते पैसे कसे मिळवायचे. जगण्याचा दर्जा हा विचार त्यांच्या डोक्यातच नसतो. मध्यमवर्गाला, उच्च मध्यमवर्गीयाला जगण्याचा दर्जा सुधारण्याची इच्छा असते. पण त्यांची नजर आपल्या कुटुंबापलीकडे जात नाही. त्याखेरीज मित्र, नातेवाईक ही त्यांच्या विचाराची मर्यादा असते. आपल्या घरात कामाला येणाऱ्या कामवाल्या कुठच्यातरी झोपडपट्टीत राहतात, यापलीकडे त्यांना झोपडपट्ट्या, शहरीकरण नावाचा राक्षस याची कल्पनाच नसते.

समजायला सोपं व्हावं, त्या प्रश्नाच्या राक्षसीपणाची कल्पना यावी म्हणून काही आकडे सांगतो. पुण्याची लोकसंख्या 50 लाख आहे आणि त्यांतले 50%

लोक झोपडपट्टीत राहतात. मुंबईची लोकसंख्या एक कोटी पंचवीस लाख आहे आणि त्यांत 70% लोक झोपडपट्टीत राहतात.

मुंबईच्या एखाद्या झोपडपट्टीत, त्यातल्या एखाद्या घरात माणसानी एकदा तरी जायला हवं. सगळी दृष्टीच बदलून जाते. मी पुण्यात अनेक वर्षं व्यवसाय आणि धंदा केला. त्यात झोपडपट्ट्यांच्यात लेबरला भेटायला जाण्याचे बरेच प्रसंग आले. त्यामानानी मी मुंबईत फारच कमी काळ धंदा केला, त्यामुळे मुंबईच्या झोपडपट्टीत मी कमी वेळा गेलेलो आहे. मुंबईतल्या फुटपाथवर उभारलेल्या पत्र्याच्या छोट्या झोपडीत सबंध कुटुंब राहतं. घरासमोरच्या रस्त्यावर स्वयंपाक चालतो, जेवणं चालतात, रात्री माणसं झोपतात. आंघोळीसाठी मोऱ्या नाही तर आडोसे असतात. संडास लांब कुठेतरी, अस्वच्छ आणि संख्येनी फार अपुरे असतात. याखेरीज मुंबईत पाऊस खूप असतो. कशाबशा प्लास्टिक शीटस् वापरून झोपड्यांच्यात राहणारे लोक पावसाळ्याचे दिवस ढकलतात. पुण्याच्याही झोपड्या वाईट असतात, पण मुंबईच्या फारच भयानक असतात. ही एवढी मुंबईच्या झोपडपट्टीतली जनता घरासमोर तिथेच कचरा टाकते. सबंध वस्तीमधे कचऱ्याचा घाण वास 24 तास भरून राहिलेला असतो.

वर्तमानपत्रांना कचरा, त्याचं वर्गीकरण, त्याठिकाणी कचरा जिरवणं वगैरे विषय तात्पुरतं श्रेय घेण्यापुरते महत्त्वाचे वाटतात. वर्तमानपत्रांचा त्याबद्दलचा झटका संपला की पुढे तो विषय पुन्हा बाजूला पडतो. खरी गरज झटक्याची नाही, प्रसिद्धीची नाही तर त्याबद्दलच्या कायद्याची, अंमलबजावणीची आणि सातत्याची आहे.

झोपडपट्ट्यांमधे एवढे लोक राहतात हे मान्य केल्यावर त्यांना नागरी सुविधा पुरवाव्या लागतातच. त्यांच्याकडून करही घेता येत नाही. थोडक्यात कर देणारे विरुद्ध कर न देणारे असं चित्र तयार होतं. झोपडपट्टीत राहणारे लोक कितीही, कसेही राहत असले तरी त्यातल्या प्रत्येक सज्ञान स्त्री-पुरुषाला एक मत असतं ना! तेच तर राजकारण्यांना महत्त्वाचं असतं.

महात्मा गांधींनी 80 वर्षांपूर्वी सांगितलं होतं की, भारतात राक्षसी आकाराची मोठी शहरं बनवू नयेत. त्यांनी स्पष्ट सांगितलं होतं की 'विकेंद्रीकरण' हेच भारताच्या विकास धोरणांचं मर्म आहे. विनोबाजींनी पण हेच म्हटलं होतं. भारतातली शहरं मोठी होत गेली पण राज्यकर्त्यांना त्याचे परिणाम समजले नाहीत. काहींना समजले पण निवडणुकीमधल्या मतांच्या आकर्षणामुळे कोणी

काही हालचाल केली नाही. शहराला नागरी सुविधा लागतात त्यांचा पुरेसा विचारच केला गेला नाही. स्वातंत्र्य मिळालं आणि त्याच्या नशेत जबाबदारी विसरली गेली.

प्रत्येक शहरात झोपडपट्ट्या हा काळजीचा विषय आहे. त्याचा अनेक अंगांनी अभ्यास झालेला आहे, होतो आहे. कॉंट्रॅक्टरांचा संबंध झोपडपट्ट्यांशी येतो तो आयत्या वेळी माणसं शोधताना, ठरलेल्या वेळी कोणी मिस्त्री हजर न झाल्यामुळे तावातावानी त्याच्याकडे बोलवायला जाण्यासाठी आणि कधी कोणी कामगार आजारी असल्यामुळे किंवा कधी सत्यनारायणाला, लग्नाला वगैरे. झोपड्या सुधारणं ही एक कठीण पण शक्य अशी गोष्ट आहे. पुनर्वसन हा फार किचकट, थोडा तांत्रिक आणि बऱ्याच अंशी राजकीय कठीण प्रश्न आहे. झोपडपट्ट्यानिर्मूलन जवळजवळ अशक्य वाटणारी गोष्ट आहे.

या सगळ्याचं मुख्य कारण म्हणजे शहरातल्या लोकांना त्या झोपडपट्ट्यांचा त्रास वाटतो म्हणून आपण शहरवासीय त्या प्रश्नाचा शहरात बसून खल करत असतो. प्रत्यक्षात या प्रश्नाचा 'मेन स्विच' शहराबाहेर आहे. हे सगळे लोक गावच्या शेतीत भागत नाही म्हणून इकडे आलेले आहेत. अलीकडची शेवटची पिढी तेवढी मूळची शेतकरी नाही. या सगळ्यांच्या गावच्या शेतीला पाणी मिळालं तर हे शहरात खुषीनी येणारच नाहीत. हे म्हणजे पोटातल्या बिघाडामुळे डोकं दुखत असताना पोटात औषध घेण्याऐवजी डोक्याला पेनबाम लावण्यासारखं आहे. त्यालाही कारणं आहेतच अर्थात, पण ती तुमच्याआमच्या आवाक्यापलीकडची आहेत.

शेतीला पाणी म्हणजे धरणांच्या योजना, छोटे कालवे, पाझर तलाव वगैरे करत तो विषय केंद्र शासनाच्या योजनांपर्यंत म्हणजे आपल्या आवाक्याबाहेर जाऊन पोहोचतो आणि इथे शहरात गुजराण करणाऱ्या तुमच्याआमच्यासारख्या माणसाला ह्या झोपडपट्ट्या हताशपणी नुसत्या बघत बसावं लागतं.

शहराच्या महानगरपालिकेनी करदात्यांसाठी ज्या सुविधा पुरवायला हव्यात त्या म्हणजे रस्ते, वीज, पाणी, ड्रेनेज आणि कचरा व्यवस्थापन. त्याबाबतींत महानगरपालिकेतला कारभार दिव्य असतो. महानगरपालिकेच्या हद्दींमधून अनेक शहरांच्यात नद्या वाहतात. त्या सगळ्या नद्यांना गटाराचं स्वरूप आलेलं आहे. महानगरपालिकेची कामं करणाऱ्या कॉंट्रॅक्टर्सच्या खास प्रशिक्षणाची जरूर आहे.

महानगरपालिकेत रस्ते विभागात अनेक इंजिनियर्स काम करतात. त्यातल्या

प्रत्येकाला माहीत असतं की, कुठच्याही रस्त्याच्या रुंदीमधल्या मधल्या भागात उंचवटा असतो आणि कडेला उतार असतो. त्याला रस्त्याचा 'कँबर' म्हणतात. इंजिनीयरला रस्त्यांच्या दुरुस्तीमधे तेवढा छोटा डांबरीकरणाचा तुकडा कसा करायचा हे माहिती असतं. प्रत्यक्ष परिस्थितीत त्याला आपलं इंजिनीयरिंगचं ज्ञान बाजूला ठेवून काम करावं लागतं. शहरातले रस्ते मुळात वाईट असतात आणि त्यांच्या दुरुस्त्यांचे 'पॅच' त्याहूनही वाईट असतात. या सगळ्यामधे 'कँबर' नाहीसा होतो. जिथे तिथे पाणी साचतं. डांबराचं पाण्याशी वाकडं असल्यामुळे डांबर कुजतं आणि रस्ते आणखी खराब होतात.

सार्वजनिक ठिकाणी रस्ते खोदलेले, ड्रेनेज चेंबर्स बांधण्याचं काम चालू आहे, टेलिफोन लाईन खोदायची आहे, अशा वेळेला ही कामं महिनोन्महिने, वर्षन्वर्षं रेंगाळतात. हा नागरिकांच्यावर अन्याय आहे. अशी कामं आळीपाळीनी 'दिवसरात्र' पद्धतीनी चालू राहून लवकर संपली पाहिजेत. त्याचंही एक स्पेशलायझेशन असतं. पण हे म.न.पा.नी मनावर घेतलं पाहिजे. अशी कामं लौकर करणाऱ्यांना जास्त रेटस्नीही कामं दिली पाहिजेत.

'टाउन प्लॅनिंग' हा विषय शिकलेली लोकं कमी असतात हे मान्य आहे. पण महानगरपालिकेच्या कारभारामधल्या काही गोष्टी अशा टाउन प्लॅनिंग मधल्या जाणकारांना विनोदी वाटतात. कालव्याच्या दुरुस्तीसाठी शहराचा पाणीपुरवठा बंद करण्याची काही गरज नसते. कालव्याचे थोडे थोडे भाग आळीपाळीनी दुरुस्त करता येतात. पाणी खात्यातल्या सगळ्या महत्त्वाच्या लोकांना ही गोष्ट समजत असते, पण तेही काही बोलत नाहीत, लोकांना काही माहिती नसल्यामुळे लोकही असे अन्याय सहन करतात. जनतेच्या पैशानी अनेक राज्यकर्ते परदेशात जातात तेव्हा 365 दिवस 24 तास सगळ्या शहरी सुविधांचा पुरवठा विलायतेत कसा करतात ते हे लोक बघत नाहीत का? त्याबाबतीत पाश्चात्त्यीकरण कसं होत नाही?

एवढ्या प्रगत समजलेल्या यू.एस्.ए. सारख्या देशात काय परिस्थिती आहे ती माहिती हवी. आपल्या तुलनेत तिथले प्रश्न बरेच कमी असले तरी आहेतच. मुळात वर्णद्वेष, बेकारी, गरिबी, त्याचे परिणाम म्हणजे 'घेट्टो' वस्त्या. आपल्याकडच्या झोपडपट्ट्यांसारखी अवस्था नसते, पण घरं जुनी असतात. सुविधा अगदी बेताच्या असतात. अमेरिकेत जशी महागाई वाढत गेली तशा वस्त्या वाढल्या. महागाईमुळे प्रत्येकजण कालच्यापेक्षा आज गरीब होत होत काहींना घरं सोडावी लागली. अशा लोकांना 'होमलेस' म्हणतात आणि त्यांच्यासाठी 'सिटी काउन्सिल'तर्फे

'शेल्टर्स' असतात.

प्रगतीचा खरा अर्थ 'आहे रे' आणि 'नाही रे' मधला फरक कमी होत जाणं. या व्याख्येत यू.एस.ए.चा नंबर जगामधे पहिल्या दहात देखील लागत नाही. भारताचा पहिल्या शंभराच्या आतही नसतो यावरून या प्रश्नाचं स्वरूप कळेल. आणि तरी अशा शेल्टर्सचं काम कसं चालतं हे भारतीय राज्यकर्त्यांनी तिथे जाऊन अभ्यासलं तर खूप फायदा होईल असा मुद्दा आहे.

आपण पर्यावरणाविषयी बोलत असताना मी म्हणालो होतो की, लोकांना सगळ्या सुविधा मिळतील याची महानगरपालिकेची जबाबदारी असते. लोकांना या सुविधा मिळाल्या पाहिजेत यात शंका नाही, पण याबाबतीत खरा उपयोगी, शाश्वत विकासाचा मार्ग म्हणजे महानगरपालिकेनी जनतेला सगळ्या सुविधांच्या बाबतीत स्वयंपूर्ण करणं. त्यासाठी जनतेला मार्गदर्शन करण्याची जबाबदारी महानगरपालिकेची असायला हवी.

पाण्याविषयीचे सगळे अभ्यासक एकमुखानी म्हणतात की, एका महाकाय धरणाची कल्पना चुकीची आहे. छोटे विखुरलेले पाण्याचे साठे हेच शहरांच्या प्रश्नाचं उत्तर आहे. जिथे दरवर्षी पाऊस पडतो त्या ठिकाणी 'रेन वॉटर हार्वेस्टिंग' करण्याची तंत्रं सबंध शहरातल्या जनतेनी समजावून घेऊन ती आचरणात आणायला हवीत. व्यक्तीच्या स्वावलंबनाबद्दल जे तत्त्व योग्य तेच शहराबद्दल योग्य समजायला हवं. उचलून एखाद्याला जशी पैशाची मदत करण्यापेक्षा त्याला पैसे कसे मिळवायचे याचं शिक्षण देणं श्रेष्ठ आहे तसंच शहराचं असायला हवं. असं सगळ्या जनतेला स्वयंपूर्ण करणं तांत्रिकदृष्ट्या शक्य आहे. ते साध्य करण्यासाठी फार हुशारी आणि कसब मात्र हवं.

मगाशी मी जे जगातलं प्रत्येक कुटुंब सुविधांच्या बाबतीत स्वयंपूर्ण करणं शक्य आहे असं म्हणत होतो ते ऐकल्यावर अशक्य वाटतं याची मलाही कल्पना आहे. पण स्वयंपूर्णता हे तत्त्व समोर ठेवलं तर यापुढे जिथे जिथे नवीन गावं व्यवस्थित रचना करून निर्माण केली जातील तिथे तरी ही गोष्ट अमलात आणता येईल. तो एक टप्पा ठरेल.

विजेच्या खांबावरून खांबावर गेलेल्या तारांच्या दुरुस्तीसाठी वीज बंद ठेवण्याची गरज नसते. ज्ञान आणि कसब कमी पडल्यामुळे महावितरण अशा प्रकारचे निर्णय घेतं आणि लोकांना माहिती नसल्यामुळे ते अन्याय सहन करतात.

मी ज्या काळात जनमानस वार्तापत्र चालवायचो त्या काळात मी त्या

काळच्या पुण्याच्या एम.एस.ई.बी.च्या चीफ इंजिनीयरना एक प्रश्न विचारला होता. जोपर्यंत भारनियमन करावं लागतं आहे, तेवढा काळ भारनियमनाच्या वेळा वर्तमानपत्रातून थेट जाहीर करून टाकाव्यात आणि पाळाव्यात. लोक त्याप्रमाणे आपापली कामं योजतील. त्यांना ही कल्पना पटत होती पण डिपार्टमेंटच्या कार्यक्षमतेबद्दलच्या शंकेमुळे ते हो म्हणायला तयार नव्हते.

सबंध नगर एकाच वेळी पाडून नवीन बांधणं कधीच शक्य नसतं. पण नगररचनेच्या तत्त्वांप्रमाणे पुढच्या 30 वर्षांनंतरच्या योजना ठरलेल्या असतात. जुनी इमारत पाडून तिथे नवीन योजनांप्रमाणे नवीन इमारत बांधायची सक्ती करत नाहीत, पण नवी इमारत बांधण्याचा प्रस्ताव जेव्हा येतो तेव्हा तो नव्या धोरणांप्रमाणेच मान्य करायचा अशा सावकाश गतीनी शहरं बदलतात. संपूर्ण शहराच्या विकासाचे असे अनेक टप्पे असतात. पुढची काहीशे वर्षं तरी शहरं असणारच आणि त्यांच्या सुविधांचे प्रश्नही असणारच. त्यातल्या एका सुविधेबद्दल मी आत्ता मुद्दा मांडणार आहे. ती आवश्यक सुविधा म्हणजे मैदानं. अत्यंत आवश्यक अशी ही गोष्ट आहे.

काहीशे वर्षं शहरं असणार तशा उंच इमारतीही असणार. सध्या एक एक करून मैदानं नाहीशी होतायत. या संदर्भात जगात लोकांनी अनेक प्रयोग केलेले आहेत. मी फिलाडेल्फियात असताना एका इमारतीवर काम करत होतो ती इमारत थेट शहराच्या मध्यावर होती. त्या इमारतीच्या एका भागात एक शाळा होती आणि मोठ्या गच्चीवर शाळेचं मैदान होतं. मैदान छोटं नाही, व्यवस्थित हॉकी, फुटबॉलची मॅच खेळण्याएवढं. त्याच्यावर नायलॉन मॅटचं लॉन होतं आणि बॉल बाहेर रस्त्यावर जाऊ नये म्हणून संपूर्ण गच्चीवर जाळीची व्यवस्था होती. त्या जाळीला आधार देण्यासाठी एक पाइप स्ट्रक्चर होतं. मी स्वतः त्या इमारतीचं काम करणाऱ्यांच्या टीमपैकी एक असल्यामुळे मला या गोष्टी अगदी बारकाव्यानी माहिती आहेत. भारतामधे एव्हाना 'बॉक्स गेम्स' सुरू झाले आहेत पण ते धंदा म्हणून. जाळीच्या आत क्रिकेट, टेनिस, फुटबॉल, हॉकी अशी सगळी सोय असते. दर तासाला पैसे देऊन तिथे जाता येतं.

मुद्दा असा आहे की, 45 वर्षांपूर्वी जी गोष्ट फिलाडेल्फियात होऊ शकत होती ती गोष्ट आज पुण्यात, मुंबईत का होऊ शकत नाही? अगदी शहराच्या मध्यभागी असलेल्या शाळेच्या गच्चीवर हे मैदान होऊ शकेल. या टप्प्यावर अशा मैदानासाठी खास नियम बनवून मान्य करून घ्यावे लागतील. तिथे मात्र

प्रश्न येतो राज्यकर्त्यांच्या विषय समजण्याचा, दूरदृष्टीचा, योजना-कौशल्याचा आणि राजकीय शहाणपणाचा.

आत्तापर्यंत एवढ्या देशांच्यात मी गेलो पण सिंगापूरला जाण्याची इच्छा राहिली ती राहिलीच. सिंगापूरबद्दल खूप ऐकलंय, वाचलंय. त्यातल्या अनेक गोष्टींनी मला प्रभावित केलंय. स्वच्छतेबद्दल, कडक कायदे पाळण्याविषयी तुम्हीही ऐकलं असेल. आत्ता मी सांगतोय ती गोष्ट म्हणजे शहरातल्या वाहनांचं, म्हणजे वाहनांच्या संख्येचं नियोजन. वाहतुकीचे नियम कडकपणी पाळण्यासाठीचं नियोजन तिथे असतंच. शिवाय तिथे शहरातल्या वाहनांची संख्या भरमसाठ वाढूच देत नाहीत. नवीन कार घ्यायची असली तर आधीच्या गाडीचं काय करणार हे सरकारला पटवावं लागतं. ज्यांना स्वतःच्या कारनी प्रवास करणं आवश्यक आहे त्यांनाच कार ठेवण्याची परवानगी असते. बाकीच्यांनी 'पब्लिक ट्रान्सपोर्ट' वापरायचा. तो सुरक्षित, स्वच्छ आणि कार्यक्षम ठेवण्याची जबाबदारी सरकार घेतं.

भारतातल्या एखाद्या तरी शहरात प्रायोगिक तत्त्वावर असं करून बघायला काय हरकत आहे? जगात अशीही शहरं आहेत की, जिथे शहराच्या दाट वस्तीच्या भागात खाजगी वाहन न्यायला परवानगीच नाही. शहराबाहेर गाड्यांच्या पार्किंगची सोय असते आणि चांगली सार्वजनिक वाहनांची सोय असते. असा प्रयोग यशस्वीपणी करणारं पहिलं शहर हॉलंडमधलं 'ॲम्स्टरडॅम'. जगभर या दिशेनी विचार चालू आहे.

शहरात आपण लाखोंच्या संख्येनी राहतो. आपल्याला दूध, किराणा, भाज्या, फळं रोजच लागणार. जे खपणार ते दुकानदार विकणार. या सगळ्या गोष्टी बऱ्याच अंतरावर पिकतात, बनतात. इथे आपल्यापर्यंत पोचवण्यासाठी त्या थंड वातावरणात ठेवून टिकवाव्या लागतात. वाहतुकीवर प्रचंड खर्च होतो, वेळ जातो. आपण ज्याला ताजं म्हणतो ती एकही गोष्ट खरोखर ताजी असणंच शक्य नाही. त्या वस्तू टिकवण्यासाठी त्यांवर फवारलेली औषधं हा स्वतंत्र गंभीर प्रश्न आहे. हे सगळंच निसर्गयोजनेच्या विरुद्ध आहे. आपण सगळे शहरी त्या दुष्टचक्रात पुरते अडकलो आहोत कारण चरितार्थासाठी आवश्यक असणारे पैसे मिळवायचे तर ते शहरात राहूनच मिळवणं आपल्याला भाग पडतं.

शहर आणि छोटं गाव यांच्यात लोकसंख्येचा मुख्य फरक असतोच. त्याखेरीज एक मोठा फरक असतो तो म्हणजे शहरातला कामाचा, धांदलीचा

दिवस खूप मोठा असतो. साधारण 7 वाजता शहर जागं होतं ते रात्री 12 वाजेपर्यंत जागंच असतं.

घराघरांत टेलिव्हिजन 24 तास चालू असतो. जगभरच्या घटना 'लाइव्ह' बघता येतात म्हटलं की सकाळी 5 ते रात्री 12 पर्यंत टी.व्ही.चा जास्तीत जास्त वापर होणारच.

पूर्वी क्रिकेट मॅचेस फक्त दिवसा असायच्या. 1 दिवसाचं क्रिकेट, 20 ओव्हर्सचे सामने वगैरे चालू झाल्यामुळे प्रेक्षकांच्या सोयीनी सामने खेळणं भाग पडलं. प्रेक्षकांना दिवसभराचं काम संपवून संध्याकाळी-रात्रीच वेळ असतो म्हणून 'नाइट क्रिकेट' चालू झालं. याच गोष्टीकडे वैज्ञानिक प्रगतीच्या दृष्टीनी बघितलं तर एवढ्या मोठ्या मैदानावर रात्री क्रिकेट खेळण्याइतक्या प्रकाशाची सोय करणं ही थक्क करणारी गोष्ट आहे. त्याचबरोबर त्यातल्या शहरीकरणाच्या पुढे होणाऱ्या दुष्परिणामांचा विचार केला तर याला प्रगती म्हणायचं का नाही, हा प्रश्न पडतो.

1986 साली पुण्याचं 2000 सालानंतर काय होणार याविषयी मोठी परिषद झाली होती. मी त्यात एकदम सक्रीय भाग घेतला होता. मी तात्पुरता 'पत्रकार' म्हणून वर्तमानपत्रांकडून अधिकार, ओळखपत्र वगैरे घेऊन अनेकांना भेटलो. माझा एक विशिष्ट दृष्टिकोन होता आणि तो सगळ्या वर्तमानपत्रांना पसंत होता. अनेक सरकारी विभागप्रुखांशी मी बोललो. मला त्यावेळी शहरीकरणाच्या प्रश्नाचं गांभीर्य जास्त स्पष्टपणी कळलं. तेव्हाच माझ्या डोक्यात 'जनमानस प्रतिष्ठान'बद्दल विचार सुरू झाले. त्याला मूर्त स्वरूप यायला त्यानंतर काही वर्षं लागली.



## 2) जनमानस ट्रस्ट

मी आणि शोभा कायम वास्तव्यासाठी यू.एस.ए. सोडून भारतात परत आलो त्याचं एक कारण मला स्वतःचा व्यवसाय करायचा होता. तिथे तो त्या काळात तरी अशक्य होता. दुसरं कारण मला आणि शोभाला आपल्या समाजासाठी उपयोगी काम करायचं होतं. मला आणि शोभाला जे मुख्य तत्त्व पटलेलं होतं ते म्हणजे आपण ज्या समाजात राहतो त्या समाजाचे आपण ऋणी आहोत आणि त्याच्यासाठी काहीतरी विधायक काम करणं हे आपलं कर्तव्यच आहे.

मी औपचारिक पद्धतीनी नगररचना, शहराच्या प्रश्नांचा अभ्यास हे शिकलेलो होतो आणि त्याबद्दल मला तळमळही होती. व्यवसाय सांभाळून मी जनमानसचं काम करण्यासाठी खूप धडपड केली. त्यासाठी एक व्यवस्थित रजिस्टर्ड ट्रस्ट स्थापन केला. त्याच्यातर्फे एक वार्तापत्र चालवलं. एकूण बऱ्याच विषयांना तेव्हा मी हात घातला होता. या सगळ्यांशी पत्रव्यवहार, कामगिरीत कार्यक्षमता आणण्यासाठी चर्चा, पाठपुरावा अशी सुरुवात केली.

पत्रव्यवहाराचं मला खूप महत्त्व वाटत होतं. जनमानसच्या पत्रांमधल्या शंकांना लेखी उत्तरं द्यायची म्हणजे मुळात त्याबद्दल स्पष्ट, खरा विचार करावाच लागतो. लेखी काही कळवायचं की माणसाला पुढचे परिणाम दिसायला लागतात. जनमानसनी पत्रात एखादा आरोप लेखी स्वरूपात केला की, एक तर तो आरोप चुकीचा आहे असं उत्तर द्यावं लागतं किंवा उत्तर दिलं नाही तर तो आरोप मान्य आहे असा अर्थ होतो. 'लेखी' या गोष्टीलाच लोक घाबरायचे. कारण त्याचं पुढे रूपांतर 'पब्लिक इंटरेस्ट लिटिगेशन' म्हणजे 'पीआयएल'मधे होणार हे त्यांना कळायचं. सगळे लोक 'तुम्ही या, आपण बोलू' म्हणायचे.

जनमानसचं काम ज्या निरनिराळ्या क्षेत्रांत सुरू केलं होतं, त्यांची त्रोटक यादी देतो म्हणजे कल्पना येईल.

1) पुणे, मुंबई आणि ठाणे महानगरपालिका
2) ट्रॅफिक पोलीस विभाग
3) न्यायालयांचा कारभार

4) पोलीस विभाग
5) एल.आय.सी.
6) इन्व्हेस्टमेंट कंपनीज्
7) बँकांच्या कार्यपद्धती
8) रिझर्व्ह बँक
9) रिक्षा, टॅक्सी व्यवसाय, संघटना
10) महाराष्ट्र राज्य विद्युतमंडळ
11) दूरसंचार निगम, टेलिफोन विभाग
12) रेल्वे विभाग
13) चॅरिटी कमिशनर ऑफिस
14) टपालखातं
15) दुकानदार
16) प्राप्तीकर विभाग
17) विक्रीकर विभाग
18) निवडणुकांची पद्धती
19) जिल्हाधिकारी
20) महाराष्ट्र राज्य परिवहन (एस.टी.)
21) राज्यशासन अपघाती सुविधा
22) शहराची भंगारसमस्या
23) शहराचं कचरानियोजन
24) सरकारी नोकरशाही
25) सामाजिक संस्था
26) पुस्तिका प्रकाशन
27) छोटे पत्रकार
28) पालक विद्यापीठ
29) सहवेदना-स्वेच्छानिवृत्ती अभ्यास
30) जीवनसाथ विवाह अभ्यास मंडळ

या एवढ्या यादीतलं पालक विद्यापीठ आणि जीवनसाथ ही दोनच कामं चालू राहिली. बाकीच्या कामांचा अभ्यास झाला, पण सुधारणा घडवून आणण्याचा मुख्य उद्देश सफल झाला नाही.

आम्ही पूर्वी अमेरिका, कॅनडा, युरोप असा मोठ्ठा प्रवास केला होता तेव्हा 'ए. ए. ए.' चे सभासद होतो. ए. ए. ए. म्हणजे अमेरिकन ऑटोमोबाइल असोसिएशन. त्यांच्या जगभर शाखा आहेत. खूप काम चालतं. त्यांना 'ट्रिपल ए' म्हणून जगभर ओळखतात.

तेव्हा आणि अजूनही रस्त्याच्या डावी-उजवीकडून वाहन चालवण्याच्या दोन पद्धती अस्तित्वात आहेत. पण सिग्नल्सची रचना, पद्धत, संकेत यांची सबंध जगभराची भाषा एकच असते. हिरव्या, पिवळ्या, लालच्या अर्थामधे कुठेही फरक नसतो.

त्याचप्रमाणे कशा प्रकारच्या चौकात, त्रिकोणात कशा प्रकारचे सिग्नल असावेत ही गोष्ट ठरलेली असते. पुण्याचं उदाहरण घेतलं आणि चौकामधला सिग्नल अशी कल्पना केली तर खांबावर तीन गोल असतील. सरळ जाण्यासाठी मधला गोल - लाल, पिवळा, हिरवा, किंवा हिरव्या आकड्यांचा हे ठीक आहे. उजवीकडे जिथे वळायची परवानगी नसेल तिथे तशा गोलाची आवश्यकता नाही. फार तर उजवीकडच्या गोलात 'उजवीकडे वळायचं नाही' वगैरे लाल बाण असावा. डावीकडे मात्र कायमचा उघडमीट करणारा पिवळा दिवा हवा. याचा अर्थ 'नीट बघून, जपून स्वतःच्या जबाबदारीवर जावं.' यातला मुख्य मुद्दा असा आहे की, ही सगळी सिग्नल पद्धती कोणाच्यातरी लहरीखातर वाटेल तशी वापरली जाते ते बंद व्हायला हवं.'

याच्या पाहणीखातर पुण्यातले सिग्नल पाहत हिंडलं तर असं दिसतं की, बऱ्याचशा ठिकाणी काय करायचं न कळल्यामुळे वाहनं खोळंबली आहेत. त्यामुळे अनावश्यक वादावादीही चालू असते.

आणखी एक पद्धत जगभर वापरतात. मोठा महत्त्वाचा रस्ता कुठचा आणि कमी महत्त्वाचा कुठचा यात गैरसमजूत नसावी म्हणून छोट्या रस्त्यावर रस्त्याच्या दोन्ही बाजूला 'स्टॉप साइन' असते. ही पद्धत तर भारतात कोणालाच माहिती नाही असं आढळतं. छोट्या रस्त्यावरच्या वाहनानी पूर्ण थांबून योग्य संधी असेल तेव्हाच जायचं असतं. घुसायचं नसतं. असे बरेच नियमांबद्दलचे संकेत अभ्यास करून एकसारखे करून टाकले तरच वाहतुकीत सुधारणा होण्याची शक्यता आहे.

मला माझ्या स्वतःच्या अनुभवावरून काही गोष्टी जास्त महत्त्वाच्या वाटायच्या. मी पुणेकर आणि बांधकाम क्षेत्रातला असल्यामुळे दोनचाकी वाहनं, मोटरकार्स यांचा माझा रोजच संबंध यायचा. त्यामुळे मी 'ट्रॅफिक पोलिस यंत्रणा'

प्रथम अभ्यासाला घेतली. त्या काळच्या ट्रॅफिक पोलीस मुख्यालयात जाऊन अधिकाऱ्यांशी बोललो. साध्या कमी अधिकाराच्या पदावरच्या पोलीस लोकांशी बोललो, लोकांशी चर्चा केल्या. त्या सगळ्यातून मला परिस्थिती सुधारण्याचा मार्ग दिसायला लागला. जनमानसच्या कामाची कल्पना यावी म्हणून या एका गोष्टीचं उदाहरण सविस्तर सांगतोय.

पुणे ट्रॅफिक पोलीस विभागाला मी सुचवली ती कल्पना अशी होती. पोलीस डिपार्टमेंटनी प्रत्येक पेठेत, म्युनिसिपल वॉर्डमधे– प्रत्येक पोलीस चौकीशी संबंधित अशी साध्या वेषात मोटरसायकलवरून हिंडणाऱ्या पोलिसांची नेमणूक करायची. त्यांनी निरनिराळ्या वेषांत, निरनिराळ्या वाहनांवरून विभाग आळीपाळीनी बदलत हिंडायचं. कोणी माणूस वाहतुकीचे नियम मोडताना दिसला तरच आपला पोलीस बिल्ला दाखवायचा. त्याला लेखी 'वॉर्निंग नोटीस' द्यायची. त्याची कार्बन कॉपी ऑफिसमधे द्यायची. त्या नोटिसमधे वाहनाचा नंबर आणि ड्रायव्हर्स लायसन्सचा नंबर दोन्हींचे उल्लेख असतील. अशा पोलिसानी दंड वगैरे करायचा नाही. नुसती समज द्यायची आणि कागदावरची नोटीस द्यायची.

असं पुणे शहरात सगळ्या भागात महिनाभर केलं तरी या प्रकाराची सांगोवांगीनी भरपूर चर्चा होईल. मुळात वाहतुकीचे नियम मोडण्याचं प्रमाणच कमी होईल. दुसऱ्या महिन्यात अशा 'ड्यूटीवरचे' पोलीस संख्येनी कमी लागतील. तिसऱ्या महिन्यात आणखी कमी लागतील. पोलीस खात्यानी तीन महिन्यानंतर आणखी कडक व्यवस्था करणार असं जाहीरपणे सांगावं.

तीन महिन्यांनंतरची कडक व्यवस्था अशी की, जी व्यक्ती नियम मोडेल तिला पोलीस मुख्यालयापर्यंत जावं लागेल. तिथे त्या व्यक्तीला जबरदस्तीनी वाहतुकीचे नियम आणि संकेत, ते न पाळण्याचे परिणाम वगैरेबद्दल एक तास एक फिल्म बघावी लागेल. कामधंदा, नोकरी, घरकाम सगळं सोडून सक्तीनी एक तास फिल्म बघणं ही शिक्षा लोकांना खूप अडचणीची होईल आणि तरी यात कुठेही दंड नसेल. असे तीन महिने गेले की सबंध शहराचं वातावरणच बदलेल. वाहतुकीचे नियम लोकं बऱ्याच प्रमाणात पाळायला लागतील.

या अशा सहा महिन्यांच्या काळात या वाहतूक नियंत्रण मोहिमेची भरपूर प्रसिद्धी अवश्य करायची. वर्तमानपत्रं, टी.व्ही., रेडिओ सगळीकडे अशा लोकांच्या बातम्यांनी, नियम मोडणाऱ्यांच्या फोटोंनी धमाल उडवून द्यायची. वाहतुकीचे सगळे नियम आणि संकेत रोज वर्तमानपत्रात छापून प्रसिद्ध करायचे.

सहा महिने संपले की दंड घ्यायला सुरुवात होईल याची कल्पना जनतेला द्यायची. ती दंडाची रक्कम किरकोळ असता कामा नये.

ही चर्चा झाली तेव्हा हजर असलेल्या सगळ्या अधिकाऱ्यांनी कल्पना छान आहे, उद्यापासूनच सुरू करू, पुढच्या महिन्यापासून सुरू वगैरे होकार भरले. त्यानंतर मी आठवणीसाठी दोन-चार फोन केले, चकरा मारल्या. काही उपयोग झाला नाही. आजपर्यंत यांतली एकही गोष्ट झाली नाही. बहुतेक सहा महिने एवढ्या मोठ्या काळासाठी कोपऱ्याकोपऱ्यावरच्या पैशाची आवक बंद ही कल्पना कोणालाच झेपली नसेल.

मी मात्र निराश झालो.

पुढे जनमानसच्या आर्थिक ताकदीच्या मानानी हे काम अगडबंब आहे हे लक्षात आल्यामुळे ते थांबवण्याचा निर्णय घेतला.



## 3) तज्ज्ञ-सत्ता

'बिझिनेस ॲडमिनिस्ट्रेशन' या विषयात कायम लक्षात ठेवण्याचं एक वाक्य सांगायचे, 'कस्टमर इज किंग'. ज्या गोष्टीला गिऱ्हाइकाची जशी आणि जेवढी मागणी असेल त्याप्रमाणे उत्पादन आणि विक्री करावी लागते असं मूलतत्त्व म्हणून आमच्या 'मॅनेजमेंट कोर्स'मधे सांगायचे. वर म्हणायचे, याचं कारण हीच नैसर्गिक प्रक्रिया आहे. मराठीत त्यावरून बळीराजा, ग्राहकराजा वगैरे शब्ददेखील रूढ झाले.

इतर प्रगत देशांत 'ग्राहक राजा' हा शब्द काही ठिकाणी तरी लागू पडू शकेल. भारतात मात्र हा शब्द सपशेल खोटा आहे. इथे ग्राहक राजा नाही, परिस्थितीचा गुलाम आहे. बळीराजा म्हणजे शेतकरी हा शब्द म्हणजे तर क्रूर चेष्टा आहे. फार तर 'बळी जाणारा राजा' असं म्हणता येईल.

तत्त्वज्ञानाच्या दृष्टिकोनातून जे जे नैसर्गिक आहे ते सगळं मान्य असतं. पण जे अनैसर्गिक, कृत्रिम, बेगडी, निरर्थक आहे ते मान्य नसतं.

भारतातल्या वातावरणाचा, अस्थिरतेचा परिणाम सामान्य जनतेवर झालेला आहेच. पण त्याचबरोबर त्या त्या क्षेत्रातल्या तज्ज्ञांवरही झालेला आहे. काही अपवाद सोडले तर बाकीच्या तज्ज्ञांचं वर्णन 'हुशार, लबाड, मतलबी आणि आढ्यताखोर' असंच करावं लागतं. तीच तर आपली खंत आहे. अशा लोकांचंच अनुकरण इतर समाज करणार आहे ना!

अनेक लोकांनी गेल्या अनेक वर्षांत हा प्रश्न मला विचारलेला आहे, 'तुम्हाला तज्ज्ञ-सत्ता म्हणजे नेमकं काय म्हणायचं आहे?' तज्ज्ञसत्ता याचा साधा अर्थ तात्पुरत्या मिळालेल्या अधिकाराचा गैरफायदा घेण्याची वृत्ती. ती आपल्याला पदोपदी, रोज, सगळ्या प्रकारच्या सरकारी, खाजगी क्षेत्रांत दिसते. माझा त्याला तात्त्विक विरोध आहे. मी स्वतः असा गैरफायदा कधीही घेतला नाही.

कुठल्या तरी एखाद्या धंद्यात आपण तज्ज्ञाच्या 'सत्ताधारी' भूमिकेत असू. बाकीच्या ठिकाणी? बाकी सगळीकडे सामान्य माणूस असू आणि तोही अशा तज्ज्ञ-सत्तेच्या लाथा खाणारा सामान्य माणूस.

तज्ज्ञ-सत्ता अवास्तव पातळीवरून योग्य पातळीवर खाली आणली तर त्या

त्या तज्ज्ञांना क्षणभर असं वाटेल की, ही स्वतःच्या धंद्याच्या नुकसानीची भाषा आहे. पण प्रत्यक्षात ते सर्वांच्या भल्यासाठीच आहे. ही सत्ता रोगावरच्या इलाजातच नाही तर पैसे आकारण्यात, वागणुकीत सुद्धा दिसते. आलेल्या माणसाला खोलीबाहेर बसवून ठेवण्यात तज्ज्ञाला मजा वाटते. 'अर्ध्या तासानी फोन करून बघा,' सांगायला बरं वाटतं आणि मग तोच तज्ज्ञ सरकारी ऑफिसमधे गेला, की पाहिजे ते गृहस्थ जागेवर नसताना, 'बहुतेक चहा प्यायला गेले असावेत, नाही तर मग घरी. तुम्ही असं करा ना, साडेदहा-अकराला उद्या चक्कर मारून बघा,' असं ऐकून घ्यावं लागतं. ती सरकारी 'कचेरी-सत्ता' झाली.

वाईट भाग असा आहे की, ही तज्ज्ञ-सत्ता आपल्या इतकी पचनी पडायला लागली आहे, की ती आपल्या लक्षात येईनाशी झाली आहे. आपण रेल्वेमधून चाललो असताना मधेच गाडी थांबली तर कुठच्या कारणामुळे गाडी थांबली आणि केव्हा पुढे जाईल हे रेल्वेनी आपल्याला कळवणं हे त्यांचं कर्तव्य आहे. डब्याडब्यांत 'अनाउन्समेंटस' करून हे सांगायलाच पाहिजे. त्यासाठी प्रत्येक डब्यात लाउडस्पीकरची सोय करायला हवी. आपण पॅसेंजर म्हणजे शेवटी रेल्वेचे कस्टमर आहोत.

काही तासांसाठी एखाद्या भागाची वीज तोडायचं एम.एस.इ.बी.मधे ठरतं. हे त्यांनी जाहीरपणे दिलगिरी प्रदर्शित करून कळवायला पाहिजे. वीज मन मानेल तेव्हा तोडणं, टेलिफोन बंद करणं हे सगळे हक्क या डिपार्टमेंटस्ना कसे पोचतात?

रस्ता बंद असला तर ट्रॅफिक पोलीस पलीकडून जायला सांगतो तेव्हा तो आपल्याला त्याचं कारण सांगणं लागतो. नो पार्किंगच्या पाटीवर निवडणुकीची जाहिरात चिकटवलेली असली तरी ट्रॅफिक पोलीस पैसे खाणारच चुकीच्या पार्किंगबद्दल. 'ये तो सरासर नाइन्साफी है' असं वाटतं का नाही आपल्याला?

आपण जिथे तज्ज्ञ असू तिथे सामान्यांशी जास्त वास्तव भूमिकेतून वागायला लागावं आणि जिथे सामान्य असू तिथे तज्ज्ञांकडे बघण्याचा अवास्तव दृष्टिकोन बदलावा. सामान्यांच्यात म्हणजे आपल्यात त्या त्या व्यवसायाकडे, धंद्याकडे वास्तव दृष्टीनी बघण्याची कुवत निर्माण व्हावी असा या लेखाचा आणि पुस्तकाचा उद्देश आहे. एका गोष्टीबद्दल मला खात्री वाटते. न सांगण्याजोगं किंवा तुम्हांला न कळण्याजोगं कुठच्याही धंद्यात काही नसतं.

'स्पेशलायझेशन'चं भूत आपल्या समाजावर राज्य करतं आहे. क्वचित

एखादं काम खरंच असं असतं, की तिथे अत्यंत तज्ज्ञ माणूस आणि स्पेशॅलिस्ट पाहिजे. बाकी बऱ्याचशा गोष्टी कॉमनसेन्स ऊर्फ सारासार बुद्धीतूनच झालेल्या असतात. अनेक निरनिराळ्या विषयांचा एकमेकांशी कधी थोडा, कधी जास्त संबंध असतो. उदाहरणांची, अनुभवांची सरमिसळ असते. जे ज्ञान 'आयात' करावं लागतं ते न पचणारं असतं. जी वस्तू स्वतः बनवू शकत नाही म्हणून 'आयात' करावी लागते, ती वस्तू खऱ्या अर्थानी आपण वापरूही शकत नाही.

ज्या सुधारणांमुळे माणसामाणसांत असमानता निर्माण होते त्या सुधारणा नाकारणं ही मुख्य कल्पना पाहिजे. भारतातल्या अनेक प्रश्नांना ते उत्तर आहे की काय, असं मला राहून राहून वाटतं. बांधकाम क्षेत्रात ते खरं आहेच, तसंच इतर व्यवसायांबाबतही आहे.

इथे एक-दोन उदाहरणं घेऊ. बँक म्हटलं की आपली काही गृहितं असतात. ज्यांचं रोजचं काम आकड्यांचंच आहे आणि ज्यांच्या दिमतीला टेबलाटेबलांवर कॉम्प्युटर्स आहेत अशा बँकांची आकड्यांच्या बेरजेत चूक होऊ शकेल असं आपल्याला कधी वाटेल का? तेच तर सांगतोय. बँकांची आकडेमोडीत चूक होऊ शकते. पासबुकच्या नावात चूक होऊ शकते.

बँकेच्या काउंटरच्या मागे बसला म्हणून त्या माणसानी स्वतःला श्रेष्ठ मानव समजण्याचं काहीच कारण नाही. अशा माणसाच्या वागणुकीला माज याखेरीज काही योग्य शब्दच नाही. बँकेत येणाऱ्या सगळ्यांशी सभ्यपणी वागणारे काही अपवादही माझ्या ओळखीचे आहेत.

माझ्या दृष्टिकोनातून बँकिंग सिस्टिम्स गिऱ्हाइकाच्या सोयीसाठी बनवलेल्याच नाहीत. त्या बँकांनी त्यांच्या स्वतःच्या सोयीसाठी बनवल्या आहेत. बँकेत चेक भरताना डिपॉझिट स्लिप भरताना प्रचंड प्रमाणात कारकुनी करावी लागते. डिपॉझिट स्लिपच्या पुढच्या भागात अकाउंट नंबर लिहिण्याबरोबरच चेकच्या मागे पुन्हा तो अकाउंट नंबर लिहायला लावतात. खरं म्हणजे एकदा अकाउंट नंबर कळल्यावर बाकी इतर सगळ्या गोष्टी कॉम्प्युटरमधे फीड केलेल्याच हव्यात. गिऱ्हाइकाला एवढी कारकुनी करायला लावणं अन्यायाचं आहे.

बँकांच्या कॅश काउंटरमागे नोटा मोजण्याचं मशीन असतं. सर्वसामान्य माणसाकडे तसं मशीन असणं शक्यही नाही. गिऱ्हाइकानी काउंटर सोडण्यापूर्वी नोटांची संख्या आणि दर्जा तपासणं ही जबाबदारी गिऱ्हाइकाची आहे, बँकेची नाही, हे आपण समजू शकतो. पूर्वी नोटांची सील केलेली बंडलं असायची.

त्याच्या स्टेपलमुळे नोटांना भोकं पडायची म्हणून ती पद्धत बंद केली. माझ्या मते बँकेनी पारदर्शक प्लॅस्टिक वापरून 100 नोटांची बंडलं, तशीच 50, 25 आणि 10 नोटांची बंडलं तयार ठेवावीत. 1 ते 9 नोटा फक्त मोजाव्यात. या पद्धतीत सगळ्यांचा खूप वेळ वाचेल आणि रांगा कमी होतील.

बँकांच्या वागणुकीचं आणखी एक उदाहरण सांगतो. बँकांकडे बऱ्यापैकी ठेवी व्याजानी ठेवलेल्या असल्या की ती व्यक्ती बँकेच्या दृष्टीनी 'खास गिऱ्हाईक' बनते. मी आणि शोभा अशा काही बँकांच्या खास यादीपैकी आहोत.

आम्हाला खास वागणूक काय मिळते, हा मात्र प्रश्नच आहे. बँकांचे मधूनमधून खाण्यापिण्याचे, तीर्थप्रसादाचे कार्यक्रम असतात. त्या कार्यक्रमांचं आम्हाला निमंत्रण असतं. हे म्हणजे 'खास'?

माझ्या दृष्टिकोनातून बँकेनी दिलेली चांगली वागणूक म्हणजे उगीच खेपा मारायला न लावणं. ते मात्र बँक करू शकत नाही. विशिष्ट काम झालं की फोन करून कळवण्याचंही सौजन्य बँक दाखवत नाही. 'तुम्ही फोन करून बघा, नाहीतर चक्कर मारून बघा.' अशा प्रकारची उत्तरं असतात.

दुसरं उदाहरण डॉक्टर्स, वकील, टॅक्स कन्सल्टंटस् वगैरे व्यावसायिकांचं घेऊ. त्यांनी देखील स्वतःला श्रेष्ठ मानव समजणं चूकच आहे. अशा सगळ्या व्यावसायिकांसाठी एक मूलतत्व थेट लागू असायला हवं. ते तत्व म्हणजे, 'जो नियम दुसऱ्याला तोच आपल्याला.'

डॉक्टर्स, टॅक्स कन्सल्टंटस्, वकील यांच्या सगळ्यांच्या ऑफिसेसमधे असं दृश्य दिसतं की, आपल्याला ते इतरांना चपला, बूट बाहेर काढायला लावतात आणि स्वतः चपला, बूट घालून आपल्यासमोरून थेट केबिनमधे जातात.

या सगळ्या व्यावसायिकांची अशीलाला जेवढी गरज असते तेवढीच व्यावसायिकांना अशीलांची असते. ओळखीच्या अशीलानी त्यांच्या ऑफिसमधे फोन केला आणि ते नसले तर आल्यावर किंवा मिस्ड कॉल बघितल्यावर त्यांनी अशीलाला उलटा फोन करायला हवा. प्रत्यक्षात तसं होत नाही. 'ते आत्ता बिझी आहेत, नंतर फोन करा', असं रिसेप्शनिस्ट मुलगी उत्तर देते.

अशा सगळ्या व्यावसायिकांविषयी सर्वसामान्यांची आणखी एक तक्रार आहे. ते दिलेल्या वेळा पाळत नाहीत. उशीर झाला तर कळवत नाहीत. डॉक्टरला उशीर झाला तर रिसेप्शनिस्ट सांगते, 'ऑपरेशनमधे अडकले, ट्रॅफिकमधे अडकले', ते खरं असतंच असं नाही. लोकांना खूप आधी येऊन

बसायला सांगायचं आणि त्यांना तिष्ठत ठेवून आपण आपल्याला सोयीच्या वेळेला यायचं असं कित्येक डॉक्टर्स, वकील, टॅक्स कन्सल्टंटस् करतात.

पेशंटस्ना तिष्ठत ठेवून स्वतः क्लिनिकमधे उशिरा पोचल्याबद्दल पेशंटची माफी मागणारा डॉक्टर, वकील, टॅक्स कन्सल्टंट मला तरी माहीत नाही.

मधल्या काळात आलेल्या डेंग्यूच्या साथीत डॉक्टर्सनी, हॉस्पिटल्सनी जनतेला लुटलं यात काही शंका नाही. रुग्णालयात एकदा रुग्णाला ठेवून घेतलं की रुग्ण थेट हातातच सापडतो. त्याच्या सारख्या रक्ताच्या तपासण्या कराव्या लागतात हे खरं, पण 'पॅथॉलॉजी'च्या 'लॅबोरेटरीज्नी' एरवीच्या दुप्पट पैसे घेऊन लुटण्याच्या मोहिमेला हातभार लावला.

व्यवस्थापनशास्त्रामधलं एक मूलभूत तत्त्व आहे. 'कुठचाही आर्थिक व्यवहार, मानसिक व्यवहार, म्हणजे एकानी दुसऱ्याला काहीतरी ज्ञान देणं, सुरळीतपणी दोघांसाठी सुखाचा होण्यासाठी दोघांना एकमेकांची सारखी गरज असावी लागते.'

भारतात जवळजवळ कुठच्याही क्षेत्रात ही गोष्ट घडत नाही. मग ते सरकार असो, निमसरकारी यंत्रणा असो, मोठी खाजगी यंत्रणा नाहीतर अगदी छोटा व्यवसाय असो, प्रत्येक जण स्वतःचं महत्त्व वाढवण्याच्या मागे असतो. न्यायपूर्ण वागण्याचं त्याला महत्त्व वाटत नाही.

या सगळ्याला तज्ज्ञ-सत्ताच म्हणतात आणि ते तत्त्व म्हणून सपशेल चूकच आहे. आत्मसन्मान जागृत असलेल्या कुठच्याही व्यक्तीला ते मान्य होणंच शक्य नाही.

गांधीजींची विश्वस्ताची कल्पना प्रत्येक अधिकारी व्यक्तीनी समजून घेतली पाहिजे. आपण तज्ज्ञ, सत्ताधारी असतो तेव्हा देशाचे विश्वस्त असतो. ती जबाबदारी पाळायला हवी.



## 4) माणसांचे वैचारिक प्रकार - सा प बं द

'सा, प, बं, द' हे माणसांचे 4 प्रकार असतात. ही कल्पना मी स्वतः विकसित केली आहे, त्याचं भारतीयीकरण केलं आहे, पण मूळची ही कल्पना व्यवस्थापनशास्त्रातून उचललेली आहे.

आपण राहतो त्या शहराचा विचार केला तर जे आसपास चालू आहे ते सगळं स्वतःला पसंत आहे का नाही याचा काही लोक विचारच करत नाहीत, काही जण करू शकत नाहीत. विचार केला तर मात्र खटकणाऱ्या खूप गोष्टी दिसायला लागतात.

प्रत्येक बाबतीत लक्षात ठेवण्याचं एक तत्त्व आहे. मला शक्य आहे तेवढं मी आसपासचं जग बदलण्याचा प्रयत्न करीन. जे मला अशक्य आहे ते सोडून देऊन त्याबद्दल दुःख करत बसणार नाही. सध्या आहे ते जग किती पसंत, किती नापसंत ते ज्यानी त्यानी ठरवायचं आहे. आहे ती व्यवस्था भ्रष्टाचारानी बरबटलेली आहे. पैशांचा, विचारांचा, भावनांचा भ्रष्टाचार जागोजागी आहे. त्याला हाताळण्याच्या चार पद्धती आहेत. सापबंद हे त्या चार प्रकाराचं थोडक्यात वर्णन. त्याचा अर्थ सांगतो.

1) सा – म्हणजे या भ्रष्टाचारी यंत्रणेला सामील होणारे. ज्याला श्रीमंत, प्रसिद्ध मोठं व्हायचंय त्याला या यंत्रणेपासून दूर राहणं फार कठीण असतं. अपवाद असतात पण अगदी हाताच्या बोटावर मोजण्याजोगे असतात. एखाद्या साध्या व्यक्तीच्या मागे स्वामी शब्द लागला की माझ्या मनात लगेचच शंका यायला लागते. स्वतः प्रत्यक्षात आहोत त्यापेक्षा जास्त योग्यतेचे दाखवायचा मोह झाला की असं काहीतरी करतात. स्वामी, बुवा, आचार्य, ओशो, श्रीश्री, सरश्री, महाराज असं काहीतरी लोकं म्हणतात आणि यामुळे खूष होणारे असं म्हणवून घेतात. खरं म्हणजे हे सगळं ज्यासाठी केलेलं असतं त्याला 'तज्ज्ञ-सत्ता'च म्हणतात. दुसरं काही नाही. ही अर्धधार्मिक-अर्धअध्यात्मिक तज्ज्ञसत्ता हा भक्तीमार्गातलाच एक प्रकार आहे. लोक त्या स्वामींवर अवलंबून राहायला शिकतात. साहजिकच

परावलंबित्वामुळे बसणारा फटका त्यांना केव्हातरी बसतो. ते दुःखात जातात. शुद्ध ज्ञानमार्गात म्हणजे विवेकवादात हा धोका नसतो.

2) प – या वातावरणाशी जुळवून घेणं अशक्य वाटल्यामुळे पलायन करणारे, म्हणजे परदेशात स्थायिक होणं. हा एक मार्ग असतो. रोज सतत 'याबद्दल आपण काही करू शकत नाही', म्हणत हळूहळू माणूस मनानी एकेका गोष्टीतून अंग काढून घेतो. मानसिक-बौद्धिक निवृत्ती पत्करतो. त्याचा संसार, काम आणि सबंध आयुष्य नीरस होतं. काही परिस्थितीला कंटाळून आत्महत्या करतात. आत्महत्या फारच कमी लोक करतात, पण परदेशात जाण्याची स्वप्नं बघणारे, प्रयत्न करणारे आणि परदेशात कायम वास्तव्य करणारे खूपच असतात.

3) बं – म्हणजे या व्यवस्थेला बदलण्याचा प्रयत्न करणारे बंडखोर. मला नि शोभाला साधायचं होतं ते साधलं असं आम्ही नाही म्हणू शकत, पण आटोकाट प्रयत्न अजूनही करतो आहोत. भ्रष्टाचारी यंत्रणा आम्हाला नमवू शकली नाही असं मात्र आम्ही अभिमानानी सांगतो. मी आणि शोभा थेट यामधेच बसतो.

4) द – म्हणजे या व्यवस्थेखाली दबलेले. अशांची संख्या अर्थात सर्वांत जास्त आहे. वरच्या तीनपैकी कुठच्याच वर्गात जे लोक बसत नाहीत ते सरळसरळ दबलेलेच असतात. सगळाच्या सगळा कष्टकरी वर्ग म्हणजे 85% भारतीय जनता दबलेलीच तर असते.

आपण स्वतः कुठच्या गटात मोडतो हे अर्थात ज्यानी त्यानी ठरवायचं. त्याच्या कारणांचा विचार करायचा. आयुष्यातल्या कृती, आपले निर्णय कुठच्या गटात बसण्याजोगे आहेत हे बघायचं. ज्या प्रकारच्या वागणुकीचं प्रमाण सर्वात जास्त असेल तो आपला गट मानायचा.



## 5) देशाटन

मी आणि शोभा एकूण बरेच देश, भारतातली बरीच राज्यं हिंडलेलो आहोत हे खरं आहे. आम्हाला त्याची खरोखर आवड होती आणि कष्टाची तयारी असल्यामुळे अगदी स्वस्तात नाही पण मध्यम खर्चात, थोड्या गैरसोयी सोसून शक्य तेवढं 'देशाटनामुळे येणारं पांडित्य' मिळवण्याची जिद्द होती.

1967 साली मी इंग्लंडला जाण्यापूर्वी माझ्या दोन मित्रांबरोबर शक्य तेवढा भारत बघायचा ठरवला. हे दोन्ही मित्र आर्किटेक्ट होते. काय आणि कशासाठी पाहायचं याच्या कल्पना जुळत होत्या. माझ्या डोक्यात आपण लवकरच कुठच्यातरी परदेशात जाणार हे होतं. किती वर्षं देशाबाहेर राहणार हे स्पष्ट नव्हतं. मी जर्मनीला जाण्याची तयारी म्हणून जर्मन भाषा शिकलो होतो. त्याच्याचबरोबर इंग्लंड आणि यू.एस.ए. या दोन ठिकाणच्या 'व्हिसा'साठी अर्ज केलेले होते.

महाराष्ट्रात मी आधी थोडा थोडा हिंडलेलो होतो. महाराष्ट्र भारताच्या साधारण मध्यावर असल्यामुळे एकतर शक्य तेवढे उत्तरेकडे हिंडूया किंवा दक्षिणेला जाऊया असा बेत होता. परदेशात जाण्यापूर्वी स्वतःचा देश काही प्रमाणात हिंडून बघितलेला असणं मला जरूरीचं वाटत होतं. आमचा तिघांचा उत्तर भारतात साधारण महिनाभर हिंडायचं हा बेत पक्का झाला. प्रवासाचा आराखाडा आखताना बहुमतानी असं ठरलं की, ईशान्य भारत आता आपल्या आवाक्यातला नाही, पण बाकी पंधरा राज्यांत आपल्याला जाणं शक्य आहे. कार्यक्रम थेट पक्का करून तारखा ठरवून आधीपासून हॉटेल बुकिंग, रेल्वे रिझर्वेशन्स वगैरे करण्याची सध्याची पद्धत तेव्हा शक्य नव्हती. आम्ही तरुण असल्यामुळे आम्हाला त्याची जरूर पण वाटली नाही. रेल्वे किंवा बस, सोयीचं असेल ते-आयत्या वेळेला तिकिटं काढून, ठरलेल्या ठिकाणी पोचल्यावर स्वस्तात मिळेल ती राहण्याची जागा, ढाब्यांवर मिळेल ते जेवण अशीच योजना होती.

मध्यप्रदेश, गुजराथ, राजस्थान, पंजाब, हरियाणा, काश्मीर असा भारताच्या पश्चिमेकडून सुरुवात करत उत्तर टोक आणि पूर्वेकडून खाली येत महिन्याभरात पुन्हा मुंबईत हजर असा महिन्याभराचा प्रवास आम्ही तीन मित्रांनी केला आणि

आपापल्या नोकऱ्यांवर रुजू झालो. पांडित्य काही जाणवलं नाही, पण भारतातली एवढी निरनिराळी भाषा बोलणारी राज्यं बघितल्यानी स्वतःची कष्टाची, धैर्याची क्षमता वाढल्यासारखं वाटलं. भारत हा एक देश आहे का निरनिराळ्या भाषा बोलणारे निरनिराळ्या संस्कृतीचे अनेक देश आहेत हा प्रश्न मनात निर्माण झाला.

1968 मधे मी इंग्लंडला गेलो. इंग्लंड, यू.एस.ए. आणि जर्मनी यांपैकी जो व्हिसा आधी मिळेल तिकडे जायचं, पण परदेशात काही वर्षं जायचंच असं ठरलं होतं. माझा रोजच्या वागणुकीतला तत्त्वनिष्ठपणाचा आग्रह, शिस्त, व्यवहारातला सरळपणा बघून अनेकजणांनी मला सांगितलं होतं, 'तुम्ही फॉरेनला जा. तिथे तुमच्या गुणांचं चीज होईल.' माझे वडील त्यांच्या मध्यवयात कामानिमित्त युरोपातल्या काही देशांत हिंडले होते. त्यांच्याकडून गोऱ्या लोकांच्या देशांतल्या निराळ्या संस्कृतींविषयी, शिस्तीविषयी ऐकलेलं होतं. त्यांचे काही युरोपियन मित्र आमच्या घरी काही वेळा आले देखील होते. तेव्हापासून 'परदेश' डोक्यात बसलेला होता.

मी जेव्हा इंग्लंडला गेलो तेव्हा परदेशात जाणाऱ्यांचं प्रमाण कमी होतं. आमच्या अनेक ओळखीच्या, नात्याच्या लोकांपैकी परदेशात नोकरीसाठी, वास्तव्यासाठी जाणारा मी एकमेव होतो. सुरुवातीला जाणाऱ्यांसाठी वाट नेहमीच खडतर असते. मी लंडनच्या विमानतळावर उतरल्यावर ओळखीच्यांचे एक-दोन फोन नंबर्स होते त्यांना फोन केले. खिशात अगदी थोडे पैसे, प्रत्यक्ष ओळखीचं कोणी नाही, आज रात्री आपण राहणार कुठे हेदेखील माहिती नाही अशी अवस्था होती. फोन केलेल्यांपैकी एक जण विमानतळावर आला. त्या रात्री मी कुठे राहावं ते त्यानी सांगितलं आणि मला तिथे घेऊन देखील गेला. दुसऱ्या दिवसापासून नोकरी शोधायची होती. नोकरी मिळेपर्यंत लंडनला तिथेच मी राह्यलो. नोकरी काही दिवसांतच मिळाली.

इंग्लंडमधे जरा मोठी जोडलेली सुट्टी बघून आम्ही 5 मित्रांनी इंग्लंडचा नैर्ऋत्य भाग बघायचा ठरवला. 5-6 दिवस कारनी हिंडून, ब्रिटिश 'बेड अँड ब्रेकफास्ट' असलेल्या ठिकाणी राहून ती ट्रिप केली. कामाच्या निमित्तानी मी उत्तर इंग्लंड, दक्षिण इंग्लंड आणि स्कॉटलंडमधे त्यापूर्वीच जाऊन आलो होतो.

पुढे काही काळ इंग्लंडमधे राहिल्यावर तिथेच मला यू.एस.ए.चा व्हीसा मिळाला. यू.एस्.ए.ला जाण्यापूर्वी युरोप बघायला हवा असं वाटलं. म्हणून एक 3 आठवड्याची 'कंडक्टेड टूर' घेतली आणि युरोपात हिंडलो. पूर्वी नकाशात

बघून कल्पना आलेली होती, पण प्रत्यक्ष युरोपात हिंडताना छोटे छोटे अनेक निरनिराळे देश, त्यांच्या निराळ्या भाषा, निराळी चलनं याची फार गंमत वाटली.

अमेरिकेत न्यूयॉर्क विमानतळावर उतरलो तेव्हाही इंग्लंडसारखीच परिस्थिती. एक-दोन ओळखीच्या लोकांना फोन केले. त्यातला एक मित्र म्हणाला, 'टॅक्सी पकडून थेट माझ्याकडे ये, इथे राहा, मग पुढचं काय ते बघू.' त्याच्याकडे गेल्याच्या दुसऱ्या दिवशी त्याचा एक मित्र कारनी फिलाडेल्फियाहून त्याच्याकडे यायचा होता, तो मित्र भेटल्यावर म्हणाला की, फिलाडेल्फिया मोठं शहर असल्यामुळे तिथे नोकरी सहज मिळेल. मी त्याच्याबरोबर फिलाडेल्फियाला गेलो, दोन-तीन दिवसांत मला चांगली नोकरी मिळाली आणि मी फिलाडेल्फियाकर झालो. तिथेच पुढे शनिवार-रविवारचा मॅनेजमेंटचा कोर्स केला.

शोभाचा आणि माझा पत्रव्यवहार होऊन आम्ही लग्न करायचं ठरवलं हा उल्लेख पूर्वी केला आहे. त्या पत्रांच्यात मी हे लिहिलं होतं की अमेरिकेत कितीही सुखसोयी असल्या तरी काही काळानी भारतात परत जायचं आहे. शिवाय भारतात परतण्यापूर्वी शक्य तेवढं जग हिंडून बघायचं आहे. तिला या दोन्ही गोष्टी मान्य होत्या.

प्रवासाची योजना मी आखत होतो आणि शोभाला सांगत होतो. तिला स्वतःला अमुक एक विशिष्ट गोष्ट बघायची आहे असं काही नव्हतं. मी खूप पूर्वीपासून जगाचा, भारताचा नकाशा कादंबरीसारखा वाचत बसायचो आणि स्वप्नरंजनात रंगून जायचो. माझी बघण्याच्या स्थळांची यादी बरीच मोठी होती. त्यामधे नैसर्गिक आश्चर्यं, आर्किटेक्चर-इंजिनीयरिंगच्या दृष्टिकोनातून खास जगप्रसिद्ध इमारती आणि निरनिराळ्या ओळखीच्यांना भेटी असं सगळं होतं. शोभाला सगळं पसंत होतं. त्याचबरोबर आणखी एक निर्णय पक्का केला. स्वतःच्या गाडीनी सगळे देश बघण्याचा. गाडीतच राहण्याची व्यवस्था ठेवायची म्हणजे हॉटेलमधे राहण्याचा खर्च कमी होईल.

तयार कँपर्स मिळत होते, पण त्यांचा आकार मोठा, खर्च जास्त आणि पेट्रोल ॲव्हरेजही कमी. त्यामुळे कँपर रद्द करून 'व्होक्सवॅगन मिनी बस' विकत घेतली. त्याच्या आतल्या सोयी आम्हीच केल्या. स्वयंपाकाची, जेवण्याची, झोपण्याची. त्यामधे एक फोल्डिंग टॉयलेटची सोयदेखील केली. आंघोळीची सोय फक्त शक्य नव्हती. पुढे असंही ठरलं की, आमच्या प्रवासातला काही भाग म्हणजे यू.एस.ए. आणि कॅनडा एवढा टप्पा माझे आईवडीलदेखील माझ्याबरोबर

असतील. ते असण्याच्या काळात ते गाडीत झोपतील अशी कल्पना होती. आमच्यासाठी एक घडी करता येण्याजोगा तंबू घेतला. माझे आईवडील आमच्याबरोबर युरोपात येणं कठीण वाटल्यामुळे त्यांच्यासाठी युरोपची 'कंडक्टेड टूर' बुक केली.

शोभाला आणि मला प्रवासाला निघण्यापूर्वी आपापल्या नोकऱ्या सोडायच्या होत्या. हातातली सगळी कामं पुरी करून, त्यांच्याशी चांगले संबंध राखून, जबाबदारीनी वागून निघणं आमच्या दृष्टीनी फार महत्त्वाचं होतं. त्याच पद्धतीनी घर सोडायचं होतं. काही घरगुती सामान विकणं, देणं हे सगळं उरकायचं होतं. घर सोडल्यावर चार दिवस आम्ही आमच्या एका मित्राकडे राहिलो. जरूर त्या खरेद्या केल्या. गाडीतल्या सोयी पूर्ण केल्या आणि त्यानंतर निघालो. साधारण पुढचे आठ महिने आमचं घर म्हणजे आमची गाडी असणार होती. व्होक्सवॅगनची सर्व्हिस स्टेशन्स हा काळजीचा विषय नव्हता.

अनेक निरनिराळ्या देशांचे व्हीसा मिळवायचे होते. त्यासाठी फिलाडेल्फियाहून न्यूयॉर्कला बऱ्याच वेळा आम्ही गेलो होतो. त्यामुळे फिलाडेल्फियाच्या दक्षिणेकडून प्रवासाला सुरुवात करायची ठरवली. असं कळलं की, लंडनमधे व्हीसा मिळवणं न्यूयॉर्कपेक्षा सोपं पडेल. त्यामुळे काही देशांचे व्हीसा न्यूयॉर्कमधे घेण्याच्या फंदात नाही पडायचं ठरवलं आणि निघालो.

शोभाचा मोठा भाऊ सुरेश आणि त्याची बायको नीवा साउथ कॅरोलिनामधे राहत होते. त्यांच्याकडे प्रथम गेलो. मग आणखीन दक्षिणेला प्रवास करत फ्लॉरिडा, तिथलं अचाट डिस्नेवर्ल्ड, नासा, मग यू.एस.ए.च्या दक्षिण किनाऱ्यानी पश्चिमेकडे प्रवास करत गेलो. मेक्सिकोत जाण्याचा मोह होता पण ते नाही जमत असं ठरलं. पश्चिमेला लॉसअँजेलिस, हॉलिवूड, सॅन फ्रान्सिस्को बघत उत्तरेला गेलो. अगदी सरळ या गावाहून त्या गावाला असं शक्यही नव्हतं आणि योग्यही झालं नसतं. कारण वाटेत थक्क करणारे ग्रॅंड कॅनियन्स, योसॅमिटी नॅशनल पार्क, यलोस्टोन नॅशनल पार्क ही खास ठिकाणं होती. उत्तरेला सिॲटल, कॅनडामधलं व्हॅनकूव्हर असा प्रवास केला. मग कॅनडाच्या दक्षिण हद्दीवरून पूर्वेकडे प्रवास करत गेलो. त्या काळचे व्हीसाचे नियम निराळे होते. आम्ही यू.एस. ग्रीन कार्ड होल्डर असल्यामुळे पुन्हापुन्हा कॅनडा– यू.एस.ए.– कॅनडा असं करण्यात काहीच अडचण नव्हती. शिकागोच्या आसपास काही महत्त्वाच्या इमारतीही बघायच्या होत्या. तसेच पूर्वेला प्रवास करत आम्ही कॅनडामधे टोरांटो, नायगारा फॉल्स, क्यूबेक, मग पुन्हा यू.एस.ए.मधे शिरून बॉस्टन आणि शेवटी

पुन्हा न्यूयॉर्क. न्यूयॉर्कहून आम्ही गाडी जहाजानी इंग्लंडला पाठवली आणि आम्ही विमानानी लंडनला गेलो. लंडनच्या जवळ माझ्या पूर्वीच्या इंग्लंडमधे राहात असतानाच्या मित्र कुटुंबाकडे आम्ही आठ-दहा दिवस राहून युरोपमधल्या व्हीसाची कामं केली.

शिवाय इंग्लंडमधे आम्हाला सगळ्या– चारही दिशांना हिंडायचं होतं. ज्या ब्रिटिश कुटुंबात मी पूर्वी राह्यचो त्यांच्याकडे चक्कर, माझ्या पूर्वीच्या ऑफिसमधे एक चक्कर, लंडनमधली प्रेक्षणीय स्थळं शोभाला दाखवायची होती.

मग आम्ही इंग्लंडची ट्रिप संपवून बोटीनी गाडीसकट युरोपमधे गेलो. फ्रान्सपासून सुरुवात केली. प्रथम उत्तर युरोपात बेलजियम, नेदरलँड्स्, जर्मनी, बर्लिन, डेनमार्क, नॉर्वे, स्वीडन, मग पोलंड, झेकोस्लोव्हाकिया, ऑस्ट्रिया, स्वित्झर्लंड, मग पुन्हा फ्रान्समधे शिरून स्पेन. पोर्तुगालमधे जायला भारतीयांना परवानगी नसल्यामुळे तिथे नाही जाऊ शकलो. मग पुन्हा फ्रान्स, इटली, मोनॅको, युगोस्लाव्हिया, बल्गेरिया, टर्की आणि शेवटी ग्रीसमधे आम्ही गाडीचा प्रवास थांबवला आणि गाडी विकली. याचं कारण भारत-पाकिस्तान युद्ध चालू होतं. नाहीतर आम्ही गाडी चालवत पाकिस्तानातून भारतात आलोही असतो. ती व्होक्सवॅगनची गाडी एवढी छान होती की एवढ्या आठ महिन्यांच्या आणि 50,000 किलोमीटर्सच्या प्रवासात एकदाही पंक्चरदेखील झालं नाही. इंजिनच्या दुरुस्तीचा तर प्रश्नच नव्हता.

या आठ महिन्यांच्या मोठ्या प्रवासात शोभानी आणि मी दोघांनी आळीपाळीनी गाडी चालवली. प्रवासात हवामानाचा त्रास थोडा झाला. जर्मनी, स्वित्झर्लंड, ऑस्ट्रिया या देशांच्यात त्या वर्षीचा हिवाळा लवकर चालू झाला आणि तो खूप कडक होता. आम्ही गाडीत रात्री झोपायचो तेव्हा होते ते सगळे कपडे एकावर एक चढवून झोपायचो. सकाळी उठून बघावं तर आमच्या श्वासोच्छ्वासाचं गाडीच्या काचांवर आतून बर्फ झालेलं. जर्मनीतल्या प्रवासात आम्ही एका कलोनजवळच्या कॅम्पसाइटवर राह्यलो होतो. त्या दोन-तीन दिवसांत इतकं दाट धुकं पडलं की, चालण्याच्या वेगानीच गाडीचा प्रवास शक्य होता. त्यामुळे गाडी कँपसाइटवरून आम्हाला बाहेरच काढता येत नव्हती.

भाषेचे प्रश्न खूप यायचे. आमच्याकडे प्रत्येक भाषेतल्या महत्त्वाच्या काही वाक्यांची भाषांतरं असलेली पुस्तकं होती. शिवाय मला थोडं जर्मन यायचं. तरीदेखील कधीकधी पंचाईत व्हायचीच. मोठ्या शहरांच्यात इंग्लिश येणारं

कोणीतरी भेटायचं, पण छोट्या गावांच्यात त्यांनी बघितलेले पहिले भारतीय आम्ही असायचो. त्या काळात म्हणजे साधारण 40 वर्षांपूर्वी भारतीय लोक जगात इकडे-तिकडे फारसे हिंडायचे नाहीत आणि स्वतःच्या गाडीनी तर नाहीच नाही. सगळ्या युरोपियनांना आमचं कौतुकच वाटायचं.

एवढ्या प्रवासात आम्हाला कधीच वाईट अनुभव आले नाहीत असं नाही, पण क्वचित. एका इटालियन बॉर्डरवर आम्हाला गाडीतलं सगळं सामान काढायला लावलं. असेल त्यांना कसलीतरी खबर. जर्मनीमधे एकदा आमच्या गाडीची नंबरप्लेट चोरीला गेली. जर्मन पोलीस, जबानी, नवीन नंबरच्या नवीन प्लेटस् सगळं प्रकरण खूप त्रासदायक होतं. पुरुषांच्या असभ्यपणाचा मात्र शोभाला एकदाही त्रास झाला नाही.

या सगळ्या प्रवासाचे आमच्याजवळ खूप फोटो होते, स्लाइडस् होत्या. भारतात परतल्यावर मी व्यवसाय चालू केला होता, पण काम कमीच होतं. माझे आणि शोभाचे स्लाइड शोचे, प्रवासवर्णनाचे खूप कार्यक्रम झाले, टी.व्ही.वर कार्यक्रम, नियतकालिकांच्यातून लेख असं बऱ्याच प्रमाणात झालं.

त्यानंतर मुलांची बालपणं अनुभवण्यात आणि व्यवसायात दहा वर्षं गेली. मुलं जरा मोठी झाल्यावर शोभा नोकरी करायला लागली. तिच्या शिक्षणक्षेत्रातल्या कामासाठी ती तीन आठवडे ब्राझीलला जाऊन आली. त्यानंतर मुलं आणखी जरा मोठी झाल्यावर आम्ही मुलांसकट एकदा 15-20 दिवस दक्षिण भारत हिंडलो. मधेच कोकणात हिंडायला गेलो, असं थोडं थोडं चालू राहिलं. आमची दोन्ही मुलं प्रवासाच्या बाबतीत आमच्यासारखीच टणक, चिवट आणि निर्भीड आहेत हे बघून फार छान वाटलं.

मुलं आणखी जरा मोठी झाली. मी, शोभा आणखीन दोघं जणं यांनी एका संस्थेतर्फे नागालँडमधे शिक्षकांचं दोन आठवड्यांचं ‘ट्रेनिंग’ घ्यायचं ठरलं. मुलांना विचारलं. ती माझ्या आईकडे मुंबईला राहायला तयार होती. ईशान्य भारतातलं भारतविरोधी वातावरण ऐकून होतो. प्रथमच ते अनुभवायला मिळालं. जाताना-येताना कलकत्ता, गुवाहाटी, आसामचे इतर भाग, मेघालय यांची झलक बघायला मिळाली. खुद्द ट्रेनिंग छान झालं. मुलांबरोबर आळीपाळीनी माझी आई आणि शोभाची आई राहिल्यामुळे दोघं मजेत होती. खरं तर शोभाला आणि मलाच मुलांशिवाय करमलं नाही.

मुलं आणखीन जरा मोठी झाली. आम्ही आमच्या एका मित्र-कुटुंबाबरोबर

उत्तर भारताच्या ‘कंडक्टेड टूर’ला गेलो. आग्रा, चंडीगड, दिल्ली, सिमला, वैष्णवदेवी, जम्मू-काश्मीर अशी टूर होती. मजा आली. मुलं आणि आम्ही अजून त्याच्या आठवणी काढतो. त्यानंतर लगेचच काश्मीरमधे जाळपोळ, दंगे सगळं सुरू झालं.

त्यानंतर बरीच वर्षं फार कुठे जाणं झालं नाही. मी माझ्या व्यवसायात, बिल्डर बिझिनेसमधे पार गुंतलो. त्यात पैशाचे बरेच प्रश्न आल्यामुळे आणि मुलं पुरेशी मोठी असल्यामुळे मी दुबईला गेलो. माझी कामं दुबई, अबुधाबी, अल-आइन इथे असायची. अगदी थोड्या काळासाठी ओमानमधे मस्कतच्या जवळ अल-मोरान्ना इथे मी गेलो होतो. शोभा दुबईला मधूनमधून यायची, मी यायचो-जायचो, पण एकट्यानी राहण्याचा कंटाळाच यायचा. पैशाचे प्रश्न सुटल्यादिवशी मी कामं थांबवून परतीची तयारी केली आणि 4-5 दिवसांत परतलोदेखील. इथे व्यवसाय जोरात चालू झाल्यामुळे त्यानंतर मला माझं दुबईत राहिलेलं सामान, घरगुती सामान, पुस्तकं, फर्निचर आणायला जमलंच नाही.

1997 ला परतल्याबरोबर जीवनसाथ विवाह अभ्यास मंडळ आणि माझी कन्सल्टन्सी जोरात चालू झाली. फक्त सल्लामसलतीचा व्यवसाय निव्वळ पुण्यातला पुरला नसता त्यामुळे बाहेरगावची कामं मान्य केली. गमतीत जे म्हणतात की, एखाद्याच्या पायाला चक्रं बसवलेली असतात तसं माझं झालं. महाराष्ट्रभर अनेक ठिकाणी, छत्तीसगड, झारखंड, गुजराथ अशा अनेक ठिकाणी मला ‘कन्सल्टन्सी’साठी जावं लागायचं. सगळ्या सोयी असायच्या, पैसे मिळायचे हे सगळं खरं पण कुटुंबापासून दूर. शोनील इंग्लंडमधे, आभा यू.एस.ए.मधे, शोभा घरी एकटी आणि मी असा हिंडतोय. हे काही चांगलं नव्हतं. सात वर्षांपूर्वी मी कन्सल्टन्सीचं शेवटचं काम पुरं केलं आणि थांबलो.

गेल्या काही वर्षांत शोभा आणि मी पालक-शिक्षण आणि विवाह अभ्यास या दोन कामांसाठी महाराष्ट्रभर अनेक ठिकाणी गेलो, गोव्यात गेलो. इंग्लंडमधे, अमेरिकेत विवाह-अभ्यास आणि पालक शिक्षणाच्या कार्यशाळा घेतल्या.

खूप हिंडणाऱ्या माणसाच्या पायाला चक्र लागलं असं जे म्हणतात, तो काही प्रमाणात आनुवंशिक गुण असावा असं वाटतं. ‘जीन्स’ मधून नाविन्याची आवड, कष्टाची तयारी, निर्भीडपणा हे गुण येत असावेत.

आमचा मुलगा डॉ. शोनील त्याच्या पर्यावरणाच्या अभ्यासासाठी भारतभर भरपूर भटकला. अनेक खेड्यांच्यात, वस्त्यांच्यात, जंगलांच्यात तो मुक्कामाला असायचा.

भारताच्या जवळजवळ सगळ्या राज्यांच्यात तो हिंडला. पुढे ऑक्सफर्डमधे 'एन्व्हायरनमेंट डिपार्टमेंट'चा डीन आणि अनेक पीएच.डी.च्या विद्यार्थ्यांचा मार्गदर्शक म्हणून तो अनेक देशांच्यात हिंडतो. सेमिनार्ससाठी जातो. इंग्लंडला शोनील असल्यामुळे तिथेही आमचं अनेकदा जाणं होतं. आमची सून ग्रीक असल्यामुळे आम्ही तिच्याबरोबर मागे ग्रीसलाही महिनाभर तिच्या माहेरी राह्यला गेलो होतो.

मुलगी आभा काही देशांच्यात लग्नापूर्वी हिंडलेली आहे. यू. एस्. ए. मधे अनेक वर्षं निरनिराळ्या स्टेटस्‌मधे श्रेयसची म्हणजे आमच्या जावयाची 'प्रॉजेक्टस्' होती. त्याच्याबरोबरही ती जायची नि शिवाय तिच्या स्वतःच्या शिक्षणासाठीही ती हिंडायची. फ्रान्स, जपान, थायलंड इथे तर ते बरीच वर्षं होते. एकूण तिच्याही पायाला चक्र लागलेलंच आहे.

एवढं हिंडूनही शोभाला– मला दोन-तीन ठिकाणी आम्हाला जाता आलं नाही याची किंचित रूखरूख वाटते, सिंगापूर, जपान आणि इस्त्रायल. खरं म्हणजे यापुढे ते जमेल असंही वाटत नाही.

आभा पुण्यात राह्यला आली कारण तिची मुलं शाळेत जायला लागली. पण त्याआधी आभा, तिचा नवरा श्रेयस यू.एस.ए.मधे असल्यामुळे आमच्या अमेरिकेत खूप ट्रिप्स झाल्या.

सध्या आभा पुण्यात पौड रोडला जिथे राहते, ती तिची कितवी जागा असा एकदा गमतीत विषय निघाला. तिनी आठवून यादी केली. हे तिचं सत्तावीसावं घर आहे.

आता आपल्या सुरुवातीच्या प्रश्नाचं उत्तर देतो. हिंडण्यामुळे, देशाटनामुळे मला वाटतं ज्याला पांडित्य म्हणतात ती गोष्ट अशी आहे– आपल्याला किती कमी माहिती हे माहिती होतं किंवा आपल्याला किती कमी कळतं हे नीट कळतं. थोडक्यात पाय जमिनीवर राहतात हेच ते पांडित्य.

इतकं हिंडल्यावर कशाचाही कोसळून जाण्याइतका किंवा हुरळून जाण्याइतका धक्का बसत नाही. माणूस कायम स्वस्थचित्त आणि स्थितप्रज्ञ प्रवृत्तीचा होतो हेच ते पांडित्य.

आता माझं वय 72 आणि शोभाचं 69. परगावी जायचं झालं तर आमच्या शरीरांची गरज आरामशीर प्रवासाची असते. उकाडा सहन होत नाही. राहण्याच्या जागी कमोडची व्यवस्था असावीच लागते. हे झाले आमचे शरीराचे

वयपरत्वे झालेले हट्ट. पण मनानी आम्हाला काहीही चालतं. आम्ही ईश्वर, धर्म, जात अशा विकारांच्यातून पूर्ण मुक्त असल्यामुळे आम्हाला कुठच्याही दिवशी कुठचाही शाकाहारी, मांसाहारी खाद्यपदार्थ चालतो. मधुमेहाची शारीरिक अडचण असल्यानी गोड पदार्थ खाण्यापिण्यावर बंधनं आहेत, पण आमचा मानसिक, बौद्धिक अड्डा काहीच नाही.

या स्वभावातल्या वागणुकीच्या साधेपणाचा मला देशाटनाशी खूप संबंध आहे असं वाटतं.

जर देशाटनानी येणाऱ्या पांडित्यावर भरंवसा असला, तशी इच्छा असली तर त्याची मानसिक तयारी मात्र लहानपणापासून केली तर जास्त चांगली. पालकत्वातली एक गोष्ट सांगून इथे थांबणार आहे. 'मुलाची वाढ नेहमी घराबाहेर होते.'

इथे घराबाहेर म्हणजे आसपासच्या अथांग जगात, घरापासून लांब. पालकांपासून दूर. स्वतःच्या सामर्थ्यावर. पालकांनी ही आखणी मात्र टप्प्याटप्प्यांनी ठरवून मुद्दामून केली पाहिजे.



# 6) भाषा

सुसंस्कृत माणूस त्याच्या भाषेवरून ओळखण्याची सर्वमान्य पद्धत आहे. पण तिला फारच मर्यादा आहेत. दुसऱ्याविषयीचा विचार माणूस किती करतो, कसा करतो आणि कशा पद्धतीनी व्यक्त करतो त्यावरून त्याचे संस्कार कळतात.

भाषेचा आणि स्वभावाचा जवळचा संबंध मानसशास्त्रानी मान्य केलेला आहे. विचार व्यक्त करायला भाषा आवश्यकच असते. पण त्यातले जे विचार व्यक्त केलेले आहेत त्या विचारांचं काही लोकांना जास्त महत्त्व वाटतं. काहींना त्यामागच्या विचारापेक्षा वापरलेल्या भाषेतल्या अलंकारांचं जास्त महत्त्व वाटतं. वाक्यात अमुक अक्षर वारंवार आलं, याचं त्यांना जास्त आकर्षण वाटतं.

एक उदाहरण सांगतो. आमच्याकडे राहायला आलेला एक पाहुणा रात्री नेसण्यासाठी लुंगी आहे का विचारत होता. मी लुंगी वापरत नसल्यामुळे आमच्याकडे लुंगी नव्हती. त्यामुळे मी त्याला पायजमा चालेल का, विचारलं. त्याच्या आणि माझ्या उंचीत, कंबरेच्या घेरात खूप फरक होता. त्यानं उत्तर दिलं, 'चालेल की. पाय जमा झाल्याशी कारण.' त्याला त्या स्वतः केलेल्या शाब्दिक कोटीचं फार कौतुक वाटल्यामुळे तो स्वतःवर खूष होता. प्रत्यक्षात माझा पायजमा इलॅस्टिकचा असल्यामुळे मला एक नाडीही शोधावी लागली आणि कसाबसा प्रश्न मिटला. पण त्याला आपल्या स्वतःच्या कोटीचंच महत्त्व वाटल्यामुळे तो ते पुनःपुन्हा म्हणत होता. माझ्या खटपटीचं त्याला काही महत्त्व नव्हतं. या माणसाच्या स्वभावाची कल्पना येणं काही कठीण नव्हतं.

काही भावना भाषेशिवाय ओळखता येतात. खाऊपिऊ घालणं ही एक भाषाच आहे. परंपरेत तर खायला घालण्याच्या भाषेचाच वापर केला जायचा. कधीकधी त्रास होईपर्यंत खाद्यपदार्थांचा आग्रह करण्याचाही अतिरेक चालतो. बोलीभाषेच्या मर्यादांबद्दलचा मुद्दा असा आहे की, भाषा ठिकाणाप्रमाणे निराळ्या पद्धतीनी बोलली जाते. लोक समजतात की, पुण्याचं मराठी म्हणजे शुद्ध आणि लंडनमधलं इंग्लिश म्हणजे शुद्ध इंग्लिश. प्रत्यक्षात हे अजिबात खरं नाही. खुद्द मी पुणेकर आहे, पूर्वी लंडनकर होतो, पण मला हे तत्त्व म्हणून पटत नाही. प्रत्येक भाषेमधे इतर अनेक भाषांमधले शब्द मिसळलेले असतात. भाषेचे अनेक

ढंग असतात आणि ते सगळे योग्य आणि चांगले असतात.

भाषेच्या इतिहासात एका भाषेतले शब्द दुसऱ्या भाषेत उचलण्याचे प्रकार इतके आहेत की, शुद्ध भाषा असं काही नसतंच. मराठीमधे फारसी, उर्दू शब्द इतके आहेत की, त्याची आपल्याला रोज बोलताना कल्पनाच नसते.

आणि तरी मला वाटतं की मिश्रभाषेत बोलू नये. मराठीत इंग्लिश शब्द घुसडण्यापेक्षा चांगला मराठी शब्द शोधलेला, वापरलेला मला जास्त आवडतो. याबाबतीत निर्णय देऊ शकणारी कोणीही एक अधिकारी व्यक्ती नसते. भाषाशास्त्र ऊर्फ लिंग्विस्टिक्सचा अभ्यास केलेले लोकही असंच सांगतात. एकाकडून दुसऱ्या व्यक्तीकडे शक्य तेवढे अचूक विचार आणि भावना पोचणं यालाच ते जास्त महत्त्वाचं समजतात. एक इच्छा मात्र इथे व्यक्त करतो. प्रत्येकाचं कुठल्या तरी एका भाषेवर चांगलं प्रभुत्व असावं, जसं माझं मराठीबद्दल आहे.

इतर कितीही भाषा येवोत, कुटुंबभाषा तरी उत्तम आलीच पाहिजे. मराठीमधे मी व्यक्त करू शकत नाही असं काहीच नसतं याचा मला आत्मविश्वासासाठी फायदा होतो. मी जी तरुण पिढी बघतोय त्या पिढीचं मराठी, इंग्लिश, हिंदी कुठच्याच भाषेवर प्रभुत्त्व नसतं. त्याचा न्यूनगंडही तयार झालेला असतो आणि स्वतःचं 'मार्केटिंग' करण्याचा समाजाचा रेटाही असतो. शब्दशः कात्रीमधे सापडलेली पिढी वाटते मला ही. जीवनसाथच्या कार्यशाळेत आपण काय म्हणतो आहोत ते जमलेल्यांना खात्रीपूर्वक कळण्यासाठी मराठी-इंग्लिश असं मिश्र भाषेत मधूनमधून बोलावं लागतं.

सर्वसाधारणपणी आपल्याला तीन भाषा येत असतात. मूळच्या परप्रांतातल्या पण महाराष्ट्रात स्थायिक झालेल्यांना चार भाषा येतात. महाराष्ट्रावर अवलंबून पण स्वतंत्र असलेल्या गोव्यात बऱ्याच लोकांना कोकणी, मराठी, हिंदी, इंग्लिश अशा चार भाषा येतात. युरोपातल्या आमच्या काही ओळखीच्या लोकांना सहा भाषा आरामात येतात. स्पॅनिश, इटॅलियन, फ्रेंच, जर्मन, इंग्लिश आणि ग्रीक येणारे युरोपात खूप लोक आहेत. आमच्या प्रत्यक्ष ओळखीत 18 भाषा येणारी एक व्यक्ती आहे. विनोबा भावेंना 22 भाषा येत असत.

भारत देशात भाषावार प्रांतरचना असा राजकीय पातळीवर निर्णय झाला. मुळात देशभरात वापरल्या जाणाऱ्या अनेक भाषा आणि शिवाय राष्ट्रभाषा हिंदी. इंग्रजांच्या दीडशे वर्षं चाललेल्या सत्तेमुळे प्रत्यक्ष वापरात असलेली कायदेशीर भाषा इंग्लिश आणि कष्टकरी वर्गाची बोलीभाषा हिंदी किंवा प्रादेशिक भाषा अशी

गुंतागुंतीची व्यवस्था झाली.

आपण एखाद्याला केलेला मोबाईल फोन नंबर लागला नाही तर मराठी, हिंदी आणि इंग्लिशमधे सूचना ऐकाव्या लागतात. ‘‘हा काय त्रास आहे? सरळ एंगेज्ड असं एका शब्दात सांगावं ना.’ असं मनात येतंच.

मुळात भारतीय लोकांच्यात वर्णभेद, रंगभेद, जातीभेद, वंशभेद, धर्मभेद, चालीरीतींमधले भेद, शाकाहारी-मांसाहारी, गरीब-श्रीमंत, कमी-जास्त शिकलेले असे अनेक भेद आहेत. त्यात भाषेनी खूपच गोंधळ करून ठेवलेले आहेत. भारत देश एकजुटीनी कधीही काहीही करणं अशक्य वाटतं.

भाषेवरचं प्रभुत्व आणि भाषेतला वागणुकीचा गोडवा या निराळ्या गोष्टी आहेत. आपलं राज्य सोडून परराज्यात स्थायिक झालेल्या माणसाची मानसिकता निराळी असते. महाराष्ट्रातले मराठी दुकानदार आणि राजस्थानी दुकानदार यांच्या बोलण्यातला फरक हे याचं ठळक उदाहरण आहे. घरच्या काळज्या प्रत्येकालाच असतात. राजस्थानी दुकानदार गिऱ्हाइकाशी गोड बोलताना दिसतात. त्यांना काय घरच्या काळज्या नसतात का?

एखाद्या माणसाबद्दल आपलेपणा कशाकशामुळे वाटतो हे बघितलं तर त्यांत भाषा ही मुख्य गोष्ट असते. परदेशात दोन भारतीय भेटले, पण एक जण बंगाली आणि दुसरा मल्याळी बोलणारा असला तर त्यांना जेवढा आपलेपणा वाटेल त्यापेक्षा परदेशात दोन मराठी बोलणारी माणसं भेटली तर खूपच जास्त आपलेपणा वाटेल. इंग्रजीत त्याला ‘एथनिसिटी’ म्हणतात ती म्हणजे समताभाव. समान धर्म, समान जात यांचाही परिणाम होतो पण भाषेएवढा नाही.

जर्मनीमधे घडलेला एक किस्सा सांगतो. मी आणि शोभा फ्रॅंकफ्रुर्टमधे हिंडत असताना आम्हाला आमच्यासारखंच एक तरुण गुजराथी जोडपं भेटलं. आम्ही रस्त्यातून बोलत बोलत चाललो होतो. एका जर्मन माणसानी आम्हाला हटकलं आणि विचारलं, ‘तुम्ही चौघंही इंडियन असून इंग्लिश का बोलत आहात?’ आम्ही निरुत्तर झालो. आमचं चौघांचंही राष्ट्रभाषेच्या म्हणजे हिंदीच्या तुलनेत इंग्लिश भाषेवर जास्त प्रभुत्त्व होतं हे खरं पण लाज वाटण्याजोगंच होतं.

मी साधारण पस्तीस वर्षं धंदा केला. धोरण म्हणून कामाला मराठी भाषिक लोकंच ठेवले. अमराठी लोकांची कामं केली. अशा क्लायंटस्‌शी इंग्लिश बोलावं लागायचं. ते मात्र मी नेमलेल्या लोकांना जमायचं नाही. तेवढं सोडलं तर ऑफिसमधलं वातावरण ताणविरहित असायचं त्याचं कारण एक भाषा.

गेली अनेक वर्षं आणखी एक धोरण मी ठेवलं होतं. धंद्यातली आणि संसारातली सगळी खरेदी मराठी भाषिकांकडूनच करायचो. मराठी दुकानदार गिऱ्हाइकाशी वागण्यात खूप चुका करतात. त्यांना चार गोष्टी समजावून सांगण्याचा मी हळूहळू प्रयत्न करतो. मला मनापासून वाटतं की, मराठी माणसांनी चांगला धंदा कसा करायचा हे शिकावं.

एका विषयाबद्दल मी अनेक वर्षं विचार करत होतो. आपण देवनागरी लिपी मराठीसाठी वापरतो हे ठीकच आहे. पण आकड्यांच्या बाबतीत मला खूप गोंधळ जागोजागी होताना दिसायचे. एक आणि सात, एक, सहा आणि नऊ यात नेहमी घोटाळा व्हायचा. दुसरी गोष्ट सगळ्या बँका इंग्लिश आकडे वापरतात. मोबाइल्स, कॅलक्युलेटर्स, मोजटेप, वजनाचे काटे, रेल्वे-बसची तिकिटं, लिफ्टच्या मजल्यांचे आकडे, रस्त्यांवरच्या किलोमीटर्सच्या पाट्या सगळीकडे इंग्लिश आकडेच वापरतात त्यामुळे मी माझ्यापुरता निर्णय घेऊन टाकला. यापुढे भाषा इंग्लिश असो किंवा मराठी, आकडे इंग्लिशमधलेच वापरायचे.

आणखी एक गोष्ट माझ्या लक्षात आली. खूप लोकांचा इंग्लिश बोलणं हा मोठा प्रश्न आहे. इंग्लिश न आल्यामुळे अनेकांना पुरेसा आत्मविश्वास नसतो हे जाणवलं. मी अनेकांना इंग्लिश बोलायला शिकवायला लागलो. अनेक जण मराठी माध्यमाच्या शाळेत गेलेले असतात. इंग्लिशधे पेपर लिहून त्यांनी डिगऱ्या मिळवलेल्या असतात. त्यांना इंग्लिश येतं, पण इंग्लिश बोलता येत नाही.

या न्यूनगंडामुळे त्यांच्या घरात असा निर्णय होतो की, पुढच्या पिढीला आपल्यासारखा प्रश्न येऊ नये म्हणून इंग्लिश मीडियम शाळेत घालायचं. त्याचे पुढे खूप दुष्परिणाम होतात. मुख्य म्हणजे एका घरात दोन तट होतात. इंग्लिश बोलणारे आणि न बोलणारे. मुलं आपल्या आईवडलांशी, आजी-आजोबांशी तुच्छतेनी वागल्याचीही उदाहरणं आहेत. हे सगळे प्रश्न लक्षात घेऊन मी इंग्लिश संभाषण वर्ग सुरू केले. ज्याला इंग्रजी येतं, पण फक्त बोलण्याची अडचण आहे अशा माणसाला नियमित क्लासला जाऊन, गृहपाठ केला तर साधारण 6 महिन्यांत इंग्लिश बोलता येतं.

शाळांच्या माध्यमाबद्दल माझं असं मत बनलं आहे की, भारतातल्या सगळ्या शाळांमधे राज्यभाषा, राष्ट्रभाषा आणि जगभाषा अगदी पहिलीपासून टप्प्याटप्प्यानी शिकवावी. उदाहरणार्थ महाराष्ट्रातल्या प्रत्येक शाळेमधे मराठी,

हिंदी आणि इंग्लिश अगदी बालवाडीपासून गोडीत, मजेनी शिकवावं. अनेक प्रश्न आपोआप सुटतील.

जगात अनेक भाषा आहेत. भारतातही खूप भाषा आहेत. भारताच्या हिताच्या दृष्टीनी ही गोष्ट चांगली का वाईट हा प्रश्नच पडतो. निरनिराळ्या राज्यांच्यामधे जरूर तेवढं सौहार्दाचं वातावरण दिसत नाही. एखाद्या चांगल्या विचाराचा प्रचार, प्रसार भारतभर करायचा म्हटला तर कुठल्या भाषेत हा प्रश्नच असतो. राष्ट्रभाषा हिंदी बऱ्याच लोकांना येते याचं खरं श्रेय हिंदी सिनेमांना आहे. पण खेड्यांच्यात अजूनही तिथली राज्यभाषाच नीट समजते. हिंदी अगदी जेमतेमच समजतं. रस्त्यांवरच्या पाट्यादेखील राज्यभाषेत असल्या तर इतर राज्यांच्यातल्या लोकांना त्या वाचता येत नाहीत.

याउलट यू.एस.ए.मधे सगळीकडे इंग्लिश भाषा चालते त्यामुळे सगळं खूपच सोयीचं जातं. अगदी सुखच वाटतं.

सबंध जगाची भाषा म्हणून एस्पेरांटो नावाची भाषा शोधलेली आहे. ती कोणी बोलत नाही एवढी एकच अडचण आहे.



# 7) प्रसारमाध्यमं

माझ्या आईवडलांकडून त्यांच्या लहानपणाविषयी मी काही काही गोष्टी ऐकल्या होत्या. तेव्हा प्रसारमाध्यमांपैकी फक्त वर्तमानपत्रं आणि थोडीशी मासिकं, काही पुस्तकं असायची. लिहू-वाचू शकणारे लोक कमी होते. रेडिओचा शोध लागलेला होता. 'ड्राय सेल' वर चालणारे 'पोर्टेबल ट्रान्झिस्टर्स' लोकांना माहिती होते. पण या गोष्टी फक्त श्रीमंतांकडे आणि त्याही इंग्लंडमधे बनलेल्या असायच्या.

रस्त्यांवर दिवे कमी, उजेड कमी त्यामुळे दिवस संपला की सगळे घरातच बसायचे. करमणुकीसाठी कुटुंबातले सगळे एकमेकांवरच अवलंबून असायचे. खेळ, नाच, गाणी, पाढे, श्लोक, गोष्टी यांच्यात अंधार पडल्यावरचा वेळ घरीच जायचा.

आसपासच्या समाजात कशाविषयी काय चाललंय याबद्दल माहिती काढण्याची जरूर होती ती प्रत्यक्ष भेटीमधूनच पुरी व्हायची. पुरुष घराबाहेर पडून अनेक पुरुषांना कामानिमित्त भेटायचे. बायका घरातच शक्यतोवर थांबायच्या. त्यामुळे त्यांना समाजाविषयीची माहिती उशिरा मिळायची.

हळूहळू वर्तमानपत्रं, मासिकं, पुस्तकं यांची संख्या वाढत गेली. वितरण मोठ्या प्रमाणावर व्हायला लागलं. रेडिओ, ट्रान्झिस्टर्सनंतर सिनेमे आले, पण टी.व्ही. नव्हते. मी इंग्लंडमधे 1968 साली गेलो तेव्हा टी.व्ही. कसा असतो हे बघायला उत्सुक होतो. तिथे रंगीत टी.व्ही. नुकते बाजारात यायला लागले होते. भारतात टी.व्ही. येऊन 41 वर्षं झाली. हळूहळू आपण सगळेच समाजाविषयीच्या माहितीसाठी लोकांशी प्रत्यक्ष वागण्याबोलण्यापेक्षा वर्तमानपत्रं आणि टी.व्ही. यांच्यावर अवलंबून राह्यला लागलो. वर्तमानपत्रात छापून येईल ते खरं आणि टी.व्ही.वर सांगतील ते खरं असं मानायला लागलो.

त्यानंतर शहरात रेडिओचा वापर कमी झाला, पण वर्तमानपत्रं आणि टी.व्ही. बघण्याचं लोकांचं प्रमाण खूप वाढलं. शहराबाहेर अजूनही रेडिओचा बराच वापर होतो. सगळ्या प्रकारच्या उत्पादकांना हे कळलं की, विक्रेते घरोघरी पाठवण्यापेक्षा वर्तमानपत्रं आणि टी.व्ही. यांच्यामधे दिलेली जाहिरात स्वस्त,

सोयीची आणि जास्त परिणामकारक ठरते. तेव्हा संपूर्ण प्रसारमाध्यम विश्वाचा ढाचाच बदलला.

'जे योग्य ते खपवू'ऐवजी 'जे खपेल ते योग्य' चा जमाना चालू झाला. खरं ते शोधण्याची आणि सांगण्याची, लिहिण्याची बातमीदारी आणि पत्रकारिता संपली. अमुक एक गोष्ट खरी का खोटी हे ठरवणंच कठीण झालं. वर्तमानपत्रं, मासिकं, पुस्तकं, टी.व्ही., सिनेमे सगळीकडे 'लोकप्रिय ते योग्य' अशी परिस्थिती झाली.

प्रत्येक प्रसारमाध्यमाचं पैशाचं गणित सर्वांत महत्त्वाचं बनलं. देशभरात राजकारण हा मोठा उद्योगधंदा बनला आणि त्यांनी जवळजवळ सगळी प्रसारमाध्यमं ताब्यात घेतली. प्रत्येक वर्तमानपत्र, प्रत्येक टी.व्ही. चॅनेल कुठच्यातरी राजकीय पक्षाशी बांधलेलं असतंच. निःपक्षपातीपणाचा, खरेपणाचा देखावा मात्र सतत करावा लागतो. सध्याच्या तत्त्वहीनतेला प्रसारमाध्यमं खूप जबाबदार आहेत असं मला वाटतं.

पत्रकारांच्या नजरेखालून खूप साहित्य जातं, कोट्यवधी शब्द त्यांनी वाचलेले असतात पण त्यांतल्या फारच थोड्या शब्दांचं रूपांतर ज्ञानात होतं. एक गमतीची गोष्ट सांगतो. 'भलत्या वेळी झालेल्या हिमवृष्टीमुळे हाहाःकार' अशी बातमी होती. त्याखाली ज्या ठिकाणी सगळी नासधूस झाली, पिकांचं नुकसान झालं, त्या ठिकाणांची यादी दिली होती– 'अलास्का, फिनलँड, कॅनडाचा उत्तर पट्टा, ग्रीनलँड आणि सौदी अरेबिया.' त्या पत्रकाराला बिचाऱ्याला सैबेरिया काय, आणि सौदी अरेबिया काय, सारखंच की!

ज्या कोणाला वाटतं की, प्रसारमाध्यमांनी अमुक अमुक सांगितलं आहे, पण स्वतःची त्याबद्दल खात्री नसल्यामुळे त्याचा खरा अर्थ शोधू अशा माणसाला फार खटपट करावी लागते. पण काही मोजकीच लोकं सतत खरं शोधण्याच्या मागे असतात. समोर दिसणाऱ्या गोष्टीचं मूलतत्त्व शोधण्याच्या मागे लागतात. जीवनसाथमधे आपण करतो आहोत तो प्रयत्न याच प्रकारचा आहे.

जीवनसाथमधे चालतो तसा आयुष्यात येणाऱ्या प्रश्नांचा अभ्यास आणि त्यांवरचे उपाय शोधण्याचं काम टेलिव्हिजनवर दिसणं अशक्य वाटतं. काही वर्तमानपत्रांत शब्दमर्यादा सांभाळून ते अजून तरी शक्य आहे. इतर काही वर्तमानपत्रांत तेही शक्य नाही. लोकांच्या दृष्टीनी खरं उपयोगी काम त्यांना आवडत नाही.

जनमानस ट्रस्टतर्फे जीवनसाथ आणि पालक विद्यापीठ ही दोन कामं चालतात हे आपलं बोलणं झालेलंच आहे. जनमानसचं एक वार्तापत्रदेखील मी चालवायचो. खरं शोधून काढून ते लोकांपर्यंत पोचवायचं असा उद्देश डोक्यात होता, पण त्या वार्तापत्राचं पैशाचं गणित खूप कठीण होतं. इतर कोणाला ते कदाचित जमलं असतं पण माझ्याच्यानी ते नाही साधलं खरं.

जनमानसच्या वार्तापत्रातर्फे मी जीवनसाथचं काम अनेक ठिकाणी चालू व्हावं आणि वाढावं असा प्रयत्न करत होतो, पण वार्तापत्र प्रकरण फसल्यामुळे जीवनसाथच्या माझ्या मूळ कल्पनेचा प्रसारही फसला. मला माझं स्वतःचं मंडळ वाढवायचं नव्हतं. अनेक ठिकाणी विवाह अभ्यास मंडळं निघावीत अशी इच्छा होती.

प्रसारमाध्यमांपैकी वर्तमानपत्र याच्याविषयीचं माझं निरीक्षण आणि मत इथे सांगतो. मला आठवतंय, पूर्वी वर्तमानपत्रामधे मुख्यतः बातम्या आणि अगदी कमी प्रमाणात लेख आणि जाहिराती असायच्या. सध्या वर्तमानपत्रांमधे जाहिराती हा मुख्य भाग असतो. निव्वळ जाहिराती छापण्याची लाज वाटल्यामुळे आणि बातम्या पुरवणं हा मुळातला उद्देश एकेकाळी असल्यामुळे त्यात बातम्या आणि लेख असतात.

मी आणि शोभा फिलाडेल्फियात असताना रोज तिथलं वर्तमानपत्र घ्यायचो नाही. तिथल्या बातम्यांच्यात आम्हाला काही रस नव्हता. तिथे आम्ही उपरे म्हणजे 'इमिग्रंट' असल्यामुळे मन भारतात, महाराष्ट्राच्या, मुंबई-पुण्याच्या बातम्यांच्यात गुंतलेलं असायचं. आम्ही काही मराठी कुटुंबं मिळून रविवार महाराष्ट्र टाइम्स घ्यायचो. तो एकाकडून दुसऱ्याकडे फिरायचा. आमच्याकडे तो पोचायला 15 दिवस लागायचे. त्यामुळे ताजी बातमी आमच्यापर्यंत पोचायचीच नाही.

अमेरिकन समाजात आसपास काय चाललंय त्यात रस नाही आणि भारताबद्दल वेळेवर काही कळायचं नाही. यामुळे काहीतरी उणीव सतत जाणवायची. त्या काळात तिथल्या अमेरिकन वर्तमानपत्राशी आमचा क्वचित संबंध यायचा पण तेव्हाही जाणवायचं की जाहिराती हाच वर्तमानपत्रांचा प्राण आहे. एखाद्या रविवारी आम्ही 'फिलाडेल्फिया इनक्वायरर' किंवा 'न्यूयॉर्क टाइम्स' घ्यायचो. साधारण 72 पानी तो असायचा. त्यांतली 65 पानं जाहिराती असायच्या. हे वाचल्यावर भारतीय वाचकाच्या डोळ्यासमोर अमेरिकन माणसांना रद्दी विकून खूप पैसे मिळत असल्याचं दृश्य येईल, पण ते खरं नाही. अमेरिकेत

रद्दी कोणी विकत घेत नाही. कचऱ्यात फेकूनच द्यावी लागते.

गेल्या काही वर्षांत महाराष्ट्रातल्या वर्तमानपत्रांचं स्वरूप बरंच बदललंय. जाहिराती वाढल्या आणि पुरवण्याही वाढल्या. मराठी वर्तमानपत्रांमधे महाराष्ट्रात तरी दोन वर्ग झाले. खूप विक्री असलेली आणि अगदी छोटी वर्तमानपत्रं.

सगळ्या पुरवण्यांच्यातून सामाजिक परिवर्तनाचा प्रयत्न करणारी काही वर्तमानपत्रं आहेत, पण कमी. टी.व्ही.चा वापर वाढला, वर्तमानपत्रांचं वाचन कमी झालं.

टी.व्ही.चं स्वरूप 1972 ला भारतात टी.व्ही. आल्यापासून सततच बदलत आलं आहे. सुरुवातीला दिवसातले 2-4 तास, फक्त दूरदर्शन, मग काही खाजगी चॅनेल्सची वाढ, असं करत आता 24 तास आणि 100-150 चॅनेल्स अशी परिस्थिती आहे. जाहिरातींचं प्रमाण प्रचंड आहे. एखादी अर्ध्या तासाची सीरियल असली तर त्यातली 10 मिनिटं जाहिराती असतात.

एकदा हा शुद्ध धंदा आहे आणि तो धंदेवाईक पद्धतीनीच करणार असं ठरवून टाकलं की निर्णय सोपे होतात. कशाचीही जाहिरात करायला मागेपुढे पाहायचं काही कारणच उरत नाही. प्रसाधनं, साबण, साड्या काय, दागिने काय आणि कंडोम काय, जाहिरात करणाऱ्याला सगळं सारखंच.

टी.व्ही.वर दिसणारे श्रीमंतांचे नखरे, महागड्या वस्तू, महालासारखी घरं, शोभिवंत कपडे बघून भारतीय गरीब सुरुवाती सुरुवातीला अचंबित होतो, हरखून जातो, त्याला मजा वाटते. ही दृश्यं पाहावीशी वाटतात. हळूहळू त्याचा मत्सर जागा व्हायला लागतो. 'आहे रे – नाही रे' मधे खूप मोठी दरी आहेच, त्यात भावनिक विषमता वाढते. भावनांचं अतिशयोक्त स्वरूप समोर येतं. लैंगिक अस्वस्थता वाढते. माहितीपर कार्यक्रम थोडे, प्रबोधनपर फारच क्वचित आणि करमणूक भरभरून अशी परिस्थिती आहे.

आता तर स्मार्टफोनवर देखील हे सगळं उपलब्ध आहे. मधल्या एका काळात काही वर्षं ट्रान्झिस्टर रेडिओ शहरातही वापरला जायचा तो केवळ 'पोर्टेबल' असायचा म्हणून. स्मार्टफोनमधे रेडिओचीही सोय असल्यामुळे ट्रान्झिस्टर बादच झाले.

वर्तमानपत्रं काय, टी.व्ही. काय, त्यांना तात्पुरत्या सनसनाटी बातमीमधे फक्त रस असतो. त्यामुळे खप वाढतो, टी.आर.पी. वाढतो. कशाच्याही खोलात त्यांना शिरायचं नसतं. त्यामुळे शेवटी असं दिसतं की प्रसारमाध्यमं म्हणजे उथळपणा.

थिएटरमधे बघितलेल्या सिनेमा-नाटकांच्यात जाहिराती नसतात ही गोष्ट फार चांगली आहे. सिनेमा नाटकांचे निर्माते, दिग्दर्शक यांना कायम मोठा जुगार मात्र खेळावा लागतो. स्वतःच्या ऊर्मीसाठी ते धोका पत्करायला तयार असतात. काही वेळा सामाजिक प्रश्न मांडायचे प्रयत्न चालतात, त्याचं कौतुक वाटतं.

आपल्या शरीराच्या आणि मनाच्या 3 गरजा मानल्या जातात. ग्रहण म्हणजे अन्न खाणं किंवा ज्ञान घेणं. पचन म्हणजे समजणं किंवा चिंतन आणि उत्सर्जन म्हणजे मलमूत्र किंवा अभिव्यक्ती. टी.व्ही.चा करमणुकीचा इतका धबधबा असतो की फक्त ग्रहण होतं. ज्ञानाचं चिंतन, अभिव्यक्ती शक्यच होत नाही, हा त्याचा मोठा दोष आहे.

प्रसारमाध्यमांच्या एवढ्या ताकदीमुळे एक गोष्ट मात्र होते की, जी गोष्ट एकानी दुसऱ्याला, त्यानी तिसऱ्याला सांगून होणार नाही, ते ज्ञान एकाच वेळेला लाखो लोकांपर्यंत पोचतं. प्रसारमाध्यमांना इंग्लिशमधे मीडिया पॉवर असंच म्हणतात.

आपल्या भारतीय समाजाचे खरे प्रश्न काय आहेत ते आपल्याला माहिती आहेत. 1) लोकसंख्या 2) आरोग्य 3) शिक्षण 4) निवारा 5) महागाई. या पाच प्रश्नांना मात्र कुठचंच प्रसारमाध्यम हात घालायला अजिबात तयार नाही. खऱ्याचा आभास समाजाला चालतो, खरं चालत नाही.



# 8) खरं आणि न्याय्य

तत्त्वज्ञानाच्या अभ्यासात एका महत्त्वाच्या विषयाचा समावेश असतो. 'प्रामाणिक आणि निर्लज्ज यांतला फरक सांगा.' याच्या अभ्यासासाठी जीवनसाथमधे एक विषय चर्चेला असतो. 'मी केलेल्या चुका' या पुस्तकात त्याविषयी स्वतंत्र लिखाण असल्यामुळे इथे इतकंच सांगतो, प्रामाणिक माणूस आपली चूक खजीलपणे कबूल करतो, आणि पुन्हा ती चूक होऊ देत नाही. निर्लज्ज माणूस अभिमानानी चूक सांगतो आणि ती चूक पुन्हा करण्याचं आश्वासनही देतो, प्रत्यक्ष ती चूक पुन्हा पुन्हा करतो.

साधं माणूस म्हणून जगण्यातला आनंद या विषयावर 'जीवनसाथ' मधे मधून मधून कार्यशाळा चालते. खूप काहीतरी साध्य करण्यातला आनंद, त्यासाठी घेतलेले कष्ट, त्या प्रवासातला आनंद यांत एक तत्त्व नक्की असतं. ध्येयपूर्तीच्या आनंदापेक्षा ध्येयाच्या दिशेनी केलेले प्रयास जास्त आनंददायक असतात. हे न कळल्यामुळे माणसं उगीचच एकमेकांचे पाय ओढतात, पुढे जाण्याचा प्रयत्न करतात, प्रसिद्धीच्या मागे लागतात. त्यासाठी संस्थासंस्थांच्यात राजकारणं चालतात. प्रत्यक्षात तत्त्वज्ञान, मानसशास्त्र सांगतं की, 'परफेक्ट' होण्याची धडपड त्रासदायक असते. सध्यापेक्षा स्वतःच्या क्षमता वाढवण्यासाठी प्रयत्न जरूर करावेत पण दुसऱ्याचे पाय ओढून मिळवलेल्या यशात तेवढं समाधानही न मिळाल्यामुळे शेवटी दुःख पदरी येतं.

मला मागे एक संस्थात्मक राजकारण करणारी व्यक्ती भेटली होती. खूप महत्त्वाकांक्षी आणि संधिसाधू असल्यामुळे प्रसिद्धीसाठीची त्या व्यक्तीची धडपड, डावपेच सगळे मी बघत होतो, पण अशा शर्यतीत मला रस नसल्यामुळे मी त्यातून अंग काढून घेतलं. माझं काम मी मनापासून करतो, सातत्यानी करतो, त्यातून जेवढी लोकप्रियता आपोआप मिळेल त्यात मी समाधानी आहे. सध्याच्या पिढीला हे कोणी शिकवलं कोण जाणे, पण बघावं तो प्रत्येक जण स्वतःचं 'मार्केटिंग' करण्यात गुंतलेला आहे. माझ्या नशिबात जी राजकारणी व्यक्ती आली तिचा मला थोडासा राग आला, पण कीव जास्त आली. त्या व्यक्तीची संपूर्ण कौटुंबिक परिस्थिती माहीत असल्यामुळे असेल पण अजूनही मला दया

येते, करुणा वाटते.

‘जमिनीवर काहीतरी अंथरुन अनवाणी चालण्यापेक्षा आपण चपला वापराव्यात.’ तत्त्वज्ञानातला हा संदेश प्रत्येकानी सतत लक्षात ठेवण्याजोगा आहे. जमिनीवर काहीतरी अंथरणं याचा अर्थ त्रास देणाऱ्या इतर बाह्य घटनांना बदलण्याचा, झाकण्याचा प्रयत्न करणं. बाह्य घटना, दुसरी कुठची व्यक्ती, अगदी जोडीदारालाही बदलायचा प्रयत्न करणं ही मोठी चूक ठरते. आपण चपला वापरणं म्हणजे दुसऱ्याच्या चुकीच्या वागण्यापासून आपला बचाव करणं. जरूरीप्रमाणे जोडीदाराला समजून घेणं, त्याच्या वागणुकीचा त्रास करून न घेणं.

आपल्या स्वतःच्या वागण्यात, बोलण्यात चूक झाली तर ती माफी मागून, त्यानंतर योग्य तसं वागून किंवा बोलूनच दुरुस्त करता येते. नुसती भेटवस्तू देऊन, जेवायला बोलावून चुकीची दुरुस्ती होत नाही.

मी आणि शोभा पुण्यात गेली 35-40 वर्षं अनेक कामांमधे सहभागी आहोत. अनेक संस्था आतून-बाहेरून आम्ही बघितल्यायत. खरं वागण्याचा आव सगळ्यांना आणता येतो. पण लोक त्यांना काही काळानी ओळखतात, ओळखून असतात. अशा सगळ्या लोकांना अर्धसत्य प्रिय असतं. अस्सल खऱ्या वागण्याची, खऱ्या माणसाची, एकूणच खऱ्याची त्यांना भीती वाटते.

खरं, न्याय्य, योग्य, पद्धतशीर अशा शब्दांचं आणि आपल्या समाजाचं पार वाकडं आहे. अशा पद्धतीनी वागणारा किंवा अशी भाषा बोलणारा माणूस म्हणजे बऱ्याच जणांच्या दुकानदारांच्या दृष्टीनी कटकट्या माणूस. सरकारी ऑफिसेस्‌मधे देखील अशा माणसाला बघितलं की सरकारी नोकरांच्या कपाळावर आठी असते.

मुलांना आयुष्याबद्दलचं सत्य सांगायचं का नाही हा पालक-शिक्षणातला नेहमीचा प्रश्न असतो. याचं उत्तर अगदी साध्या पद्धतीनी तत्त्वज्ञानात दिलेलं आहे. ‘कायम खरं सांगावं, स्पष्ट सांगावं पण ऐकणाऱ्याला समजेल तेवढंच सांगावं’ माणूस सज्ञान झाला, म्हणजे 18 वर्षांच्या वरच्या वयाचा झाला, की त्याला कुठचीही गोष्ट अगदी स्पष्टपणी सांगावी. मग ते लैंगिक शिक्षण असो नाहीतर वैद्यक, स्थापत्य असो किंवा परग्रहाबद्दलचं संशोधन असो. त्याच्यामधले आधीचे टप्पे वयाप्रमाणे, बुद्धिमत्तेप्रमाणे, आवडीप्रमाणे, अनुभवसंदर्भाप्रमाणे विचार करून ठरवावे लागतात.

मुलं जरा मोठी झाली की नैसर्गिक स्त्री-पुरुष आकर्षण मुलामुलींच्या मनात

तीव्रपणी जागं होतं. भावी नवरा, भावी बायको, लग्न करणं योग्य का नाही असे अनेक विचार सुरू होतात. त्याची योग्य हाताळणी कशी करायची हे शिकवण्याचं काम 'पालक विद्यापीठ' मधे चालतं.

मुलं आणखी मोठी झाली की वधू-वर संशोधन सुरूच होतं. त्याबद्दलच्या आणि त्यानंतरच्या संपूर्ण वैवाहिक आणि रोजच्या आयुष्याच्या आकलनासाठी तर जीवनसाथ आहे. त्यामधे परिचयोत्तर विवाह हा मार्ग नेमका कसा असावा याबद्दलही काम चालतं.

त्याचं मुख्य सूत्र आहे खरा, अस्सल विचार. प्रत्यक्षात आपण जसजसे वयानी वाढतो तसतसे जास्त जास्त 'मॅच्युअर' ऊर्फ खोटं वागायला लागतो. लहान मुलं फक्त खरंच वागतात, बोलतात. मुलांचा सहवास आपल्याला आवडतो, कारण ती डावपेच करत नाहीत. मग आपण आपलं पालकत्त्वाचं सगळं कसब वापरून त्यांना 'मोठं' करतो. आपल्याकडून आणि शाळा-कॉलेज, मित्रमंडळी यांच्याकडून धक्के खाऊन खाऊन मुलं 'तयार' होतात. आपण 'तयार' असतोच. शेवटी सगळे मिळून एकजुटीनी खोटं वागायला लागतो आणि त्याला 'मॅच्युरिटी' म्हणतो. व्यावहारिक जगात तर आसपासचे अनेक लोक आपल्याला फसवायला टपलेलेच आहेत. दुसऱ्याला न फसवण्याचा निर्णय आपण घ्यायचा असल्यामुळे हे सहज शक्य आहे; पण न फसणं हे फार कठीण आहे, हे आपल्याला कळायला लागतं. मग आपण 'डावाला प्रतिडाव' शिकत जातो.

लग्न या विषयात तरी हा खोटेपणा आपण सोडावा की नाही! पण इतकी पक्की लागलेली आपली सवय जाता जात नाही. चांगली नोकरी मिळवताना आपले गुण रंगवून रंगवून सांगण्याची जरूर भासते, तसं स्थळ बघताना आपले आणि कुटुंबाचे नसलेले 'गुण' सुद्धा रंगवून सांगण्याकडे आपला कल होतो.

स्थळ बघण्यापूर्वी घर रंगवून घ्यायचं ठरतं. दिवाणखान्यात दाखवण्यासाठी फर्निचर बसतं. जुनी का होईना, चार चाकी गाडी घेतली जाते. बहुतेक मुलांना नोकरी असलेली मुलगी आवडते, त्यासाठी तात्पुरता कुठचातरी कोर्स करून नोकरी मिळू शकेल असं वातावरण तरी तयार केलं जातं. काही ठिकाणी नकार घेतले, की सुरुवातीला खरेपणाची थोडीशी असलेली इच्छा आणि कल्पनाही सोडून दिली जाते.

अशा करामती केल्यामुळे 'श्रीमंत आणि सुंदर' स्थळ मिळण्याच्या आशेवर सगळं नाटक चालू असतं. हळूहळू या बाह्यरूपाचं महत्त्व वाढत जाऊन

'अंतर्गुण' पूर्णपणी विसरले जातात. सध्याच्या 'स्थळ बघून' लग्नाच्या पद्धतीतला मुख्य दोष म्हणजे त्यात 'खरं बोलायचं नसतं'!

एक महत्त्वाचं तत्त्व सांगतो. 'जो नियम दुसऱ्याला, तोच नियम स्वतःला लागू.' योग्य वागणुकीचं हे तर त्रिकालाबाधित मर्म आहे. 2500 वर्षांपूर्वी तत्त्वज्ञानाचा जन्म झाला तेव्हाही ते लागू होतं आणि आजही आहे. थोडक्यात, मी जेव्हा या विषयाचा अभ्यास करायला लागलो, तेव्हा माझी 'सत्यशोधक वृत्ती' हा खरा 'ड्रायव्हिंग फोर्स' होता आणि आजपर्यंत आपण बोललो, विचार केला त्यापेक्षा 'अधिक खरं' स्वतःशीच बोलणं हेच या सगळ्या धडपडीचं मुख्य सूत्र आहे, हा साक्षात्कार मला झाला.

शंभर टक्के खरं मीही बोलतो, वागतो असं मी म्हणू शकत नाही; पण भोवतालच्या लाखो लोकांपेक्षा जास्त खरं, साधारण अठ्ठ्याण्णव टक्के खरं बोलतो आणि वागतो. असं अठ्याण्णव टक्के खरं बोलूनही व्यवस्थित चरितार्थ चालवता येतो, बायको, मुलं, नातेवाईक यांच्याशी जास्त चांगले संबंध होतात, त्याविषयी सविस्तर चर्चा अभ्यास-मंडळात चालते.

प्रामाणिकपणाचा एक अर्थ बऱ्याच लोकांना समजतो. पैशाच्या व्यवहाराचा प्रामाणिकपणा. तो पाळण्याचा शक्यतोवर प्रयत्न करणारे बरेच आहेत. कळत नाही तो बौद्धिक प्रामाणिकपणा. खरं तेच बोलणं, स्वतःची चूक मान्य करणं याबाबतींत लोक कमी पडतात.

दोन प्रकारच्या प्रवृत्तीही नेहमी आढळतात. एका प्रवृत्तीची माणसं योग्य काय त्याचा विचार करतात. ते फायद्याचं का तोट्याचं याबद्दल त्यांचं काही म्हणणं नसतं. अशी लोकं योग्य तीच गोष्ट आचरणात आणण्याची धडपड करतात. दुसऱ्या प्रवृत्तीची माणसं योग्य का अयोग्य यापेक्षा फायद्याचं का तोट्याचं हे बघतात. अशी लोकं फक्त फायद्याच्याच गोष्टी करतात.

स्वतःची खरं बोलण्याची टक्केवारी ज्यानी-त्यानी ठरवावी, पण सध्यापेक्षा 'अधिक खरा' विचार आणि आचार असावा अशी अपेक्षा आहे. कित्येक बाबतींत लग्नाच्या वयाच्या मुलामुलींनाही स्वतःला खरोखर काय वाटतं ते ठरवता येत नाही, ही अडचण आहे.

आपल्याला माहीत आहे की, एखाद्या प्रश्नाचं खरं उत्तर आपण दिलं तर प्रश्न विचारणाऱ्यावर फार मेहेरबानी होते. आम्ही व्यवसायातली मंडळी 'पोस्ट

डेटेड चेक'ला फार घाबरतो, कारण ते पैसे दिलेले असतात आणि नसतातही. तसा विचाराचा 'पोस्ट डेटेड चेक' समोरच्याला द्यायला लागू नये, यासाठी मदत करायला अभ्यास-मंडळ आहे.

आणखी एका गोष्टीचं फार वाईट वाटतं. खरं बोलणाऱ्यावर आपल्या समाजात सर्व पातळ्यांवर अन्यायच होत असतो. या लग्नाच्या, स्थळाच्या बाबतीत मुलींवर खूप अन्याय होतो तो बघवत नाही. मुलगी फार गुणी असली तर तिला योग्य स्थळ मिळण्याची चिंता निर्माण होते. त्यामुळे असामान्य मुलीला 'चारचौघींसारखी वाग,' असं पालक सांगू लागतात. त्याचबरोबर खूप चांगल्या, विशेष गुण असलेल्या मुलालासुद्धा योग्य मुलगी सापडणं कठीण जातं. म्हणजे गुण हा दुर्गुण ठरतो, याची मला आणि अभ्यास-मंडळाला फार खंत वाटते. त्या न्यायबुद्धीनी मला स्वस्थ बसू दिलं नाही आणि पहिलं विवाह अभ्यास मंडळ चालू झालं.

खरं आणि न्याय्य या संदर्भात भारतातल्या न्यायव्यवस्थेबद्दलचं माझं मत अतिशय वाईट आहे. जिथे राजकारण असत्यानी, अन्यायानी भरलेलं आहे तिथे लोकांच्या वागणुकीत खरं आणि न्याय्य या गोष्टी कुठून दिसणार?



# 9) 'दुष्टाशी गाठ'

तत्त्वज्ञानातला आणखी एक महत्त्वाचा विषय म्हणजे 'दुष्ठाशी गाठ'. सगळ्यांशी कायम सहृदयतेनी वागावं यात काही शंका नाही. कोणाचाही अपमान करण्याचा अधिकार कोणालाही नाही हे खरंच. कोणाशी वाईट वागू नये, दुष्टावा मनात ठेवू नये, रागावू नये, मारू नये हे सगळं सगळं खरंच आहे.

तरीही एक महत्त्वाची गोष्ट अनेकांच्या हातून राहून जाते. लोक हेतुपूर्वक वाईट वागतात हे जसं खरं आहे तसं अनेकांना वागायचं समजत नाही, वागणुकीत त्यांच्या हातून चूक होते, त्यांना एखादी चूक सुधारण्याची संधी दिली पाहिजे हेही खरं आहे. दुसऱ्याला माफ करणं, करता येणं हेही एक महत्त्वाचं मूल्य आहे. त्याबद्दल तत्त्वज्ञान सांगतं की, दुसऱ्याला माफ करता यायला हवं आणि स्वतःला सहज माफ नाही करता कामा. स्वतःशी कठोर हे एक महत्त्वाचं मूल्य आहे. ते पाळता आलं तरच आग्रही राहता येतं नि हातून मोठी कामं होऊ शकतात.

याबाबतीत माणसाचं वय वाढतं तशी त्याची वृत्ती बदलत जाते. तरुण असताना ज्येष्ठांविषयी अनुदारपणी वागणारी खूप तरुण माणसं माझ्या पाहण्यात आहेत. ज्येष्ठ नागरिकांना बरेच प्रश्न असतात. ऐकण्यात, दिसण्यात, लक्षात राहण्यात, आकलन होण्यात, सुचण्यात खूप शिथिलता येते. स्वच्छतेमधे बदल होतो. ज्येष्ठांना सन्मानानी वागवलं जात नाही, अशी खूप उदाहरणं आहेत. काळजी घेणारं कोणी नाही त्यामुळे वृद्धांचे प्रश्न सरकारी पातळीवर सुद्धा हाताळावेच लागतात. या पुस्तकसंचात 'ज्येष्ठ नागरिकांशी संवाद' हा स्वतंत्र लेख आहे. त्यामुळे इथे यापेक्षा जास्त काही सांगत नाही, पण ज्येष्ठांनी तरुणांना आणि तरुणांनी ज्येष्ठांना माफ करण्याची जरूर आहे एवढंच सांगतो. माझ्या लहानपणची एक गंमत सांगतो नि पुढच्या मुद्द्याकडे वळतो. 'माफिया' हा शब्द मी प्रथम ऐकला तेव्हा मला वाटायचं, माफ करणाऱ्यांची संघटना असते, त्याचं हे नाव आहे.

समोरचा अनीतीनी वागला तर आपली भूमिका काय असावी या विषयावर तर सबंध गीता आहे. कृष्णशिटाई, कृष्णनीती या शब्दांना विशिष्ट अर्थ आहे.

राज्यकारभार करण्यासंबंधीची चाणक्य नीतीही सर्वश्रुत आहे. इतिहासात अकबराचा राज्यकारभारही वाखाणण्याजोगा होता. या सगळ्या लोकांनी सतत दुष्टांशी सामना केला. महायुद्धाच्या काळात दुष्टपणी वागणारा हिटलर आणि त्याचा सामना करणारे चर्चिलसारखे मुत्सद्दी नेते यांचीही ठळक उदाहरणं आपल्यासमोर आहेत. ही सगळी असामान्य लोकं होती. आपण सामान्य माणूस आहोत. आपले प्रश्न निराळे आहेत. पण सगळ्याच्या मागचं तत्त्व एकच आहे– 'दुसऱ्यावर अन्याय करणं चुकीचं आणि अन्याय सहन करणंही चूक.'

चुकीला माफ करण्याच्या कल्पनेच्या बरोबर उलट तत्त्व म्हणजे प्रत्येक चुकीला शासन मिळालंच पाहिजे. ही कल्पना मात्र जास्त लोकप्रिय आहे. पालक मुलांशी वागताना प्रथम शासनाचा वापर सुरू करतात. शाळेत शिक्षा करणं चालूच असतं. तरुणपणी, कॉलेजमधे शासनाचं स्वरूप निराळं असतं पण शिक्षा असतातच. पुढे नोकरी, व्यवसाय, धंद्यात त्याची अनेक स्वरूपं बघायला मिळतात. पण शिक्षा असतेच. कायदा तर त्यासाठीच बनवलेला असतो.

कित्येक वेळा एखादा माणूस आपला गैरफायदा घेण्याचा प्रयत्न करतो. पण तो प्रयत्न सफल झाला नाही तर त्याला राग येतो. आपला गुन्हा अशा वेळी फक्त एकच असतो तो म्हणजे अन्याय सहन न करणं. इतर आपण काहीच केलेलं नसतं. तरी असे लोक आपल्यावर राग धरून बसतात. अन्याय सहन केला नाही याबद्दल झालेली खूप भांडणं मी स्वतः बघितलेली आहेत, मी भोगलेलीही आहेत.

आपण सरळमार्गी असलो तरी आपल्या नशिबानी आपली दुष्टाशी गाठ पडू शकते. तेव्हा त्याच्याशी कसं वागायचं याचा मात्र अभ्यास चुकत नाही. आपल्याला वेडंवाकडं बोलणारा माणूस भेटू शकतो. शक्यतोवर त्याच्याकडे लक्ष देऊ नये. आपण रागावत नाही म्हटल्यावर बहुतेक वेळा त्याचा निंदा करण्यातला रसच संपतो नि तो दुसरीकडे जातो. कदाचित तिथेच थांबतो पण नीट वागायला लागतो. आपल्याला शक्य असलं तर आपण दुसरीकडे बघावं किंवा स्वतः दुसरीकडे निघून जावं. बहुतेक वेळा एवढ्यावर भागतं.

कधी कधी प्रश्न लहान मुलाचा असतो. स्वतःच्या लहान मुलावर देखील 24 तास पहारा अशक्य असतो. ज्याला आपल्या मुलाला त्रास देण्याची दुष्ट इच्छा असते तो माणूस त्रास देण्यासाठी केव्हाही, कसाही वेळ काढू शकतो, वेळ गाठू शकतो. प्रश्न आपल्या मुलाचा असतो. अशा प्रसंगी मुलाच्या मनावर

वाईट परिणाम होण्याचा धोका जास्त मोठा आहे. आपल्याला पडतं घ्यावं लागलं तरी चालेल, पण उगाच तत्त्वाचा प्रश्न करून ठेवून मुलाला त्रास होईल असं काही करू नये.

जो माणूस आपल्याला पैशाच्या व्यवहारात फसवायला बघत असेल त्यासाठी मात्र 'आर्थिक व्यक्तिमत्त्व' याचा अभ्यास करावा लागतो. फसवणारे, फसणारे आणि यापैकी काही न करता समतोल वागण्यासाठी चांगलंच कसब लागतं. माहिती काढणं, बाजार तपासणं, त्यासाठी थोडा वेळ मागून घेणं असं सगळं करावं लागतं. असा स्वतंत्र लेख या पुस्तकसंचात आहे, शिवाय 'विवाह, आयुष्य आणि व्यवस्थापनशास्त्र' या लेखातही यासाठी उपाय सांगितलेले आहेत.

त्याखेरीज एक गोष्ट आहे. आपल्याला जसं फसवलं तसं तो माणूस अनेकांना फसवत असेल तर संघटित होणं, निषेधसभा घेणं, अनेकांनी मिळून त्याला पत्र पाठवणं, त्या पत्राच्या प्रती संबंधित सरकारी खात्यांना पाठवणं हे सगळं करावं लागतं. ते कोणी करायचं याबद्दलच सगळा प्रश्न असतो. दुसऱ्यानी कोणी केलं तर फार बरं असं प्रत्येकाला वाटतं. काही घाबरट लोकं निषेधपत्रावर सही करायलाही नाही म्हणतात. अशा प्रश्नाला उत्तर एकच असतं, ते काम स्वतः करायचं. अशा लोकशाही मार्गानी जाण्याची वाट कठीण असते, वेळखाऊ असते, पण 50% वेळा परिणामकारक असते. त्याखेरीज पी.आय.एल. (पब्लिक इंटरेस्ट लिटिगेशन) हा पर्याय कायद्यात ठेवलेला आहेच.

काही प्रकार पैशाच्या फसवणुकीचे असतात. आणि एक व्यक्ती नाही, तर खूप मोठा जनसमुदाय जनतेला फसवतो. छोट्या खाद्यपदार्थांच्या दुकानात, भाजीबाजारात छोटी छोटी फसवणूक चालूच असते. एक किलो कांद्यांच्या खरेदीत एखादा खराब कांदा घुसवणं, ही फसवेगिरीच झाली पण त्याचं प्रमाण छोटं असतं.

खूप मोठ्या प्रमाणावर फसवणूक चालते ती आंब्यांच्या सीझनमधे. मला स्वतःला, मुलांना हापूस आंबे खूप आवडतात. आम्ही भारतात परत आलो त्या काळात जरा नीट लक्ष दिलं, थोडा संयम ठेवला की चांगले खात्रीशीर हापूस जातीचे आंबे मिळायचे. हळूहळू त्यात बदल व्हायला लागला. भाव वाढले हा त्यातला निव्वळ खर्चाचा भाग झाला. खात्रीचे म्हणून आणलेल्या आंब्यात एखादा आंबा भलत्या जातीचा यायला लागला. अशी भेसळ करणाऱ्यांचं प्रमाण वाढत गेलं. सध्याच्या परिस्थितीत अजिबात फसवाफसवी झाली नाही असा हापूस

आंब्याचा व्यवहार अशक्य झालेला आहे.

आपण ज्याच्याकडून प्रत्यक्ष आंबे खरेदी करतो तो एक माणूस. तो ज्याच्याकडून आंबे मागवतो तो होलसेलर. तो जिथून आंबे मागवतो ते कोकणातलं ठिकाण, त्याचा मालक. कित्येक वेळा मालक आणि होलसेलर यांच्यामधे आणखी एक बोली बोलणारा घाऊक व्यापारी असतो. या चौघांपैकी प्रत्यक्ष आंब्याच्या दर्जाची कोणी खात्री देऊ शकत नाही. कोणीही काहीही करा, खरा खात्रीशीर हापूस आंबा गिऱ्हाइकाला मिळत नाही. 'आम्ही काय आंब्याच्या आत शिरून बघतो का?' असली उत्तरं वर मिळतात. याला एकच इलाज आहे. एकजुटीनी सगळ्यांनी मिळून हापूस आंब्याची खरेदी बंद करणं.

एक गोष्ट अगदी नक्की आहे. अन्याय सहन करणं ही चूकच आहे. स्वतःवरचा अन्याय सहन नाही करायचा आणि दुसऱ्यावर होतानाही सहन नाही करायचा हे सोपं नाही मात्र. संघटित लोकांच्यात जास्त ताकद असते, एकटा माणूस कदाचित अपयश पदरी घेतो. माझ्या लहानपणी मी दोघांच्या भांडणात मधे पडल्याबद्दल मारही खाल्लेला आहे. रस्त्यात अपघात झाला तर भानगडीत न पडण्याची वृत्ती वाढतेय. त्याला पोलीस यंत्रणा बऱ्याच प्रमाणात जबाबदार आहे. अपघातात सापडलेला माणूस आपला स्नेही नाही ना, एवढी किमान खात्री करण्यापुरतं लोकांनी थांबायला पाहिजे. जखमी माणसाला हॉस्पिटलमधे पोहोचवणं, पोलीस चौकीत तक्रार नोंदवणं, इतपत मी तर करतो. साधारणपणी माणूस बघून पोलीस वागतात. सभ्य माणसाला ते वाईट वागवत नाहीत सहसा. क्वचित पोलिसांचा वाईट अनुभव येतो हे मात्र कबूल करावंच लागतं.

भारत देशात, महाराष्ट्र देशात मुळातली अडचण अशी आहे की, छोट्या-मोठ्या पद्धतीनी कायदा मोडणाऱ्यांची संख्या खूप जास्त आहे. जे लोक मोठे गुन्हे करतात ते पैसे बाळगून असतात. भ्रष्टाचारी देशात असे मोठे गुन्हेगार सुटतात. छोटा गुन्हा करणारी छोटी माणसं सापडतात. एकूण गुन्हा करणाऱ्यांची संख्या इतकी प्रचंड आहे की, त्यांच्यावर नियंत्रण ठेवायला जेवढे पोलीस लागतील तेवढे पोलीस नेमणं सरकारला परवडूच शकत नाही.

कमी बुद्धीचा माणूस गुन्हेगार बनूच शकत नाही. सगळ्याच गुन्हेगारांना पोलिसांच्या प्रमाणाची ही परिस्थिती व्यवस्थित माहिती असते. या सगळ्याचा मतितार्थ एवढाच की, दुष्टांशी सामना करण्याच्या बाबतीत केवळ पोलीस यंत्रणेवर विसंबून राहणाऱ्याच्या पदरी निराशा येते. त्याच्या बाबतीत जे करायचं

ते स्वतः, हा निर्णय घ्यावाच लागतो.

दुष्ट माणसं आसपास असणारच. काही लोकं फक्त स्वतःभोवती कुंपण घालण्याच्या प्रवृत्तीची असतात. अशी लोकं एकट्यानी बाहेर जाणं टाळतील, जागेची कुलपं वाढवतील, रखवालदार नेमतील, थोडक्यात आपल्यावर हल्ला होऊ नये याकडे जास्त लक्ष देतील. दुसऱ्या प्रवृत्तीची लोकं हल्ला झाला तर सामना कसा करायचा याचा जास्त विचार करतील. पिस्तुलाचा परवाना मिळवतील, व्यायाम करून चपळपणा, ताकद कमवण्याची तयारी करतील. माझं व्यक्तिगत मत असं की, प्रत्येक कुटुंबानी दोन्ही करायला हवं. कुंपणही घालावं आणि शस्त्रांना धारही लावून ठेवावी, स्वतःची तयारी वाढवावी.

दुष्टांचा आणखी एक प्रकार सर्वांत अडचणीचा आहे. तो म्हणजे हिंसाचारी दुष्ट. मला याबाबतीत व्यक्तिशः अनुभव अगदी थोडा आहे. अनुभव नसला तर अशा प्रसंगी स्वतःमधे किती धारिष्ट्य आहे हे स्वतःलाही माहीत नसतं. थोड्या प्रसंगांत मी नक्की सांगू शकतो की मी पुरेसा निर्भीड आहे. प्रत्यक्ष मारामारीत मी भाग घेतलेला नाही, पण मारामारी होऊ शकली असती अशा अनेक ठिकाणी बिनधास्त गेलो होतो.

खुद्द माझ्यावर एवढ्या वर्षांच्यात दोन-तीन प्रसंग असे आले होते की, माझ्या निर्भीडपणाची ती परीक्षा होती. एके ठिकाणी आसपास गुंड माणसं आहेत हे माहिती असताना बांधकाम करायचं होतं. दुसऱ्या ठिकाणी माझ्यावरचा अन्याय दूर करण्यासाठी कुलपं फोडून घरं ताब्यात घ्यायला हवी होती. ही दोन्ही कामं मी पार पाडली. तेवढं धारिष्ट्य आहे म्हणून तर मी अडचणीचा काळ असूनही त्यातून सहीसलामत मार्ग काढून बाहेर पडू शकलो.

आपल्याला एखादा रट्टा बसू शकेल या तयारीत असलं तर बहुतेक वेळा समोरचा दुष्ट माणूसही आपल्याला घाबरतो, हे लक्षात ठेवलं पाहिजे. हे सगळं एका मर्यादेपर्यंत खरं असतं. त्यापेक्षा मोठे गुंड आपल्या नशिबात असले तर आपल्यालाही मोठ्या गुंडांचा आसरा घ्यावा लागतो. ते एक दुधारी शस्त्र असतं आणि दुष्टचक्रच असतं. अजूनतरी महाराष्ट्रात, एकूणच भारतात 'ऑर्गनाइझ्ड क्राइम' बेतात आहे. फार मोठ्या रकमांच्यात वावरणाऱ्या तीन क्षेत्रांचा म्हणजे मोठे बिल्डर्स, राजकारणी आणि फिल्म यांचं काय चालतं हे आपल्याला ऐकून माहीत असतं, वर्तमानपत्रात वाचायला मिळतं. आपण मध्यममार्गी, मध्यमवर्गीय, बेताच्या रुपयाच्या आकड्यांमधे असलो तर आपल्या वाट्याला या गोष्टी

क्वचितच येतात.

सगळ्या चांगल्या-वाईट संबंधांत आणखीन एक गोष्ट लक्षात ठेवावीच लागते. ती फारच गुंतागुंतीची असते. एखादी व्यक्ती आपली मित्र असते. पण ती शत्रूचीही मित्र असली तर नाइलाजानी शंका घ्यावीच लागते कारण 'शत्रूचा मित्र तोही शत्रूच' आणि 'मित्राचा शत्रू तो आपलाही शत्रूच.' अशी नाती सांभाळायचं काम फार कसबाचं असतं.

सबंध पृथ्वीतलावरची बहुसंख्य माणसं, मग ती कुठच्याही देशातली असोत, कुठचीही भाषा बोलणारी असोत, सज्जनच असतात. पण अगदी थोडी का होईना, लबाड, मत्सरी, दुष्ट असतातच.



## 10) सामाजिक संघटनांमागचं तत्त्वज्ञान

एकेकाळी नुसती माणसं होती, त्यांचे कळप होते, गट होते, टोळक्यांचे मुख्य होते, पण सरकार ही कल्पना नव्हती. मग सरकार कशासाठी याच्या खोलात शिरलं तर कुठच्यातरी बलवानानी दुर्बलावर अन्याय करू नये म्हणून त्यात हस्तक्षेप करण्यासाठी सरकार असं दिसतं. एकदा ही मूळ कल्पना पक्की झाली की एवढे विषय एकत्र करून त्या सगळ्यांविषयी आपण एकत्रपणी का बोलतोय हे लक्षात येईल.

या यादीतल्या सगळ्या गोष्टींचा आपला खूप जवळचा रोजचा संबंध आहे पण आपल्या हातात त्यातली एकही नाही. आपली पंचाईत अशी आहे की, राजकारणात स्वतः भाग घेणंही अडचणीचं आहे आणि न घेणंही त्रासदायक आहे. मी स्वतः सरकार, लोकशाही, बहुमत, राजकारण यांपैकी कशाचाच अधिकृत अभ्यासक नाही. पण त्यामुळे मला त्याबद्दल काय वाटतं हे बोलण्याचा माझा अधिकार नाहीसा होत नाही. मी सामान्य माणसाचा प्रतिनिधी तर आहे! या यादीतल्या कुठच्याही गोष्टींच्याबद्दलच्या प्रश्नांना माझ्याकडे उत्तरं नाहीत. पण व्यवस्थापनशास्त्रातलं एक तत्त्व मला माहिती आहे की, जेव्हा उत्तर माहिती नसतं तेव्हा प्रश्न सविस्तर मांडायला सुरुवात करायची. प्रश्न सांगताना प्रश्नातच दडलेलं उत्तर केव्हातरी सापडतं. त्याशिवाय प्रश्नच मांडला नाही तर उत्तर कधीच सापडणार नाही. आत्ता एकेक करून या यादीतल्या प्रत्येकाविषयी प्रश्न सांगतो.

सामाजिक संघटना चालवणाऱ्या बहुतेक संस्थांच्या मागे रजिस्टर्ड ट्रस्ट असतो. सरकारकडे तो ट्रस्ट रजिस्टर्ड असतो याचं कारण सरकारचं त्याच्यावर नियंत्रण असायला हवं.

पूर्वी असे ट्रस्ट फार कमी असायचे, पण जसे लोकांना त्याचे फायदे कळायला लागले तशी ट्रस्टची संख्या वाढायला लागली. त्यांतले काही ट्रस्ट खरोखर काम करण्यासाठी असतात तर काही केवळ दाखवण्यासाठी असतात. निम्म्याच्या आसपास ट्रस्ट खरे लोकशाही तत्त्वानी चाललेले असतात. अशा ट्रस्टमधे काही चुकीच्या, स्वार्थी, जनतेच्या अन्यायाच्या गोष्टी घडू नयेत म्हणून

‘चॅरिटी कमिशनर’चं ऑफिस असतं.

अशा सामाजिक संघटनांचे अध्यक्ष, खजिनदार, सचिव, कार्यकारी मंडळ असे सभासदांनी निवडलेले कार्यकर्ते असतात. अशा निवडलेल्या पदाधिकाऱ्यांच्या काही क्षमता गृहीत धरलेल्या असतात, त्यात मात्र खूप अडचणी असतात. अशा सभासदांचं वय 21 च्या पुढे असलं की बाकीच्या गोष्टींबद्दल कायदा काही म्हणत नाही.

माझ्या आणि शोभाच्या अगदी जवळच्या ओळखीत अशी काही लोकं आहेत. काही शाळांच्या कार्यकारिणीवर, काही कॉलेजच्या, काही ग्रंथालयांच्या, काही रुग्णालयांच्या कार्यकारिणीवर आहेत.

खरी गोष्ट अशी आहे की, त्या सगळ्यांना त्या विशिष्ट क्षेत्रातलं कळायलाच हवं. पैशाच्या नफ्यातोट्यातलं, हिशेबातलं कळायला हवं. त्या क्षेत्रातल्या कायद्यांविषयी माहिती हवी आणि मुख्य म्हणजे व्यवस्थापनातली तत्त्वं माहिती पाहिजेत. या गोष्टींचं पूर्ण ज्ञान स्वतःला नसलं तरी चालेल, पण योग्य जाणकारांची नेमणूक करण्याइतकं ज्ञान आवश्यक आहे.

यातला कसलाच अनुभव, ज्ञान, समज नसली तरी अशा संघटनांच्यात लोक अध्यक्ष, सचिव होऊ शकतात. खरी करण्याजोगी गोष्ट माहिती नसली की अशी माणसं नुसता गुरगुराट करतात. प्रत्येक बाबतीत नुसतं नाही म्हणण्याचं धोरण वापरतात. झारीतले शुक्राचार्य बनतात.

या सगळ्याचा परिणाम एकच असतो. अंदाधुंदी. त्यामुळे शेवटी कामाचा दर्जा घसरतो याचं वाईट वाटतं. अशा संघटना म्हणजे कमी अधिकारांचं छोटं सरकारच असतं.



# 5

# सरकार

मी स्वतः पुणे शहराच्या एका भागात राहणारा सर्वसामान्य मध्यमवर्गीय माणूस आहे. केंद्र सरकारचा आणि माझा संबंध वर्तमानपत्रातल्या बातम्यांच्यातून काही गोष्टी कळतात तितकाच आहे. मी माझ्या वैयक्तिक व्यावसायिक कामांसाठी दिल्लीचं तोंड बघितलेलं आहे, नाहीतर महाराष्ट्रात राहणाऱ्याचा दिल्लीशी फारसा संबंधच येत नाही. राज्य सरकारचं जवळजवळ तसंच आहे, फक्त भाषा मराठी असल्यामुळे मनानी राज्य सरकार जवळचं वाटतं. शिवाय मंत्रालय मुंबईत आहे. त्यामुळे अंतरही कमी आहे. प्रत्यक्षात मुंबईत राहणाऱ्या सामान्य माणसाचाही राज्य सरकारशी काही संबंध येत नाही.

किल्लारीच्या भूकंपाच्या वेळच्या कामात मी थोड्या प्रमाणात भाग घेतला होता हे पूर्वी मी सांगितलंय. त्या काळात त्या भूकंपाच्याबद्दल जगभर बातम्या, लेख येत होते. एका लेखातल एक वाक्य मला महत्त्वाचं वाटलं ते असं.

‘भूकंपात किती माणसं मरतात ते त्या देशाच्या, राज्याच्या व्यवस्थेवर म्हणजेच राजकारणाच्या पद्धतीवर अवलंबून असतं.’ हे तर थेट भारत सरकारविषयी केलेलंच विधान आहे.

मोठ्या जनसमूहाचा सगळ्या अंगांनी एकत्रितपणी हितकर विचार करणारी काही माणसांची संघटना म्हणजे सरकार. मोठा जनसमूह हे राज्य, देश असू शकतं, पण ‘सगळ्या अंगांनी एकत्रितपणी हितकर विचार’ ही जबाबदारी असतेच. त्यांचं तेच काम असतं.

एक व्यक्ती, एका ठिकाणचा काही व्यक्तींचा गट, एक कुठचीतरी संस्था, एक उद्योजक, एवढा व्यापक विचार करत नाही, करू शकत नाही. त्यांनी स्वतःच्या हितासाठी झटावं हेच अपेक्षित आहे आणि सरकारचे प्रतिनिधी मात्र

सगळ्या संबंधित घटकांचा विचार करणार आणि स्वतःचा वैयक्तिक स्वार्थ बाजूला ठेवणार असं गृहीत आहे. ते मात्र भारतात स्वातंत्र्यानंतरच्या पहिल्या दिवसापासून कधी झालं नाही. त्या काळातल्या राजकीय नेत्यांच्या हेतूबद्दल शंका नाही पण मार्ग चुकला, निर्णय चुकले त्यामुळे परिणाम वाईट झाले.

भारताबद्दल असं म्हणतात की, लोकसंख्या हा देशासमोरचा सर्वांत मोठा प्रश्न आहे. त्यामुळे भारतात गरिबी आहे. प्रत्यक्षात गरिबीमुळे लोकसंख्यावाढ झालेली आहे. जास्त मुलं जन्माला घातली की खाणारी तोंडं वाढतात, पण काम करणारे हात वाढतात, हे जास्त महत्त्वाचं ठरतं. गरीब कुटुंबं असा विचार करतात हे आपल्याला निश्चित माहिती आहे. सरकार, लोकशाही, निवडणूक, याविषयावर मी व्यक्तिगत पातळीवर काहींशी बोललो आहे, पण मला खरा विचार विनोबाजी भावेंच्या लिखाणातून मिळाला.

स्वातंत्र्य मिळाल्यानंतर भारतात 'कल्याणकारी राज्या'ची म्हणजे 'वेलफेअर स्टेट'ची खास योजना बनली. त्या प्रकारच्या कल्याणकारी राज्याहून भयानक दुसरं राज्य असू शकत नाही, ही गोष्ट समजून घ्यायला हवी. वरवर बघितलं तर कल्याणकारी हा विचार मोठा मोहक वाटतो. असं म्हणतात की, पूर्वीचं राज्य केवळ पोलिस-राज्य होतं, ते फक्त प्रजेच्या रक्षणाचीच चिंता करायचं, दुसरं काही नाही; बाकी सगळी कामं लोकंच करायची. आता नवं राज्य आलं म्हणून समाजाच्या कल्याणाची काळजी त्यांनी वहायची ठरली. पूर्ण देशातल्या लाखो खेड्यांसाठी दिल्लीत योजना बनवायच्या ठरल्या. जीवनाशी संबंधित असलेल्या सगळ्या बाबतीत दिल्ली निर्णय घेणार. समाजात कशा सुधारणा व्हाव्यात, विवाह कशा प्रकारे व्हावेत, अस्पृश्यता कशी नष्ट व्हावी, देशात कोणती चिकित्सा-पद्धती लागू व्हावी, कोणती भाषा प्रचलित व्हावी, चित्रपट कसे असावेत, इत्यादी सगळ्या विषयांबाबत आता दिल्लीत योजना तयार होणार. एवढी प्रचंड सत्ता जेव्हा केंद्राकडे सोपविली जाते तेव्हा सगळा जनसमुदाय पराधीन होतो. म्हणून दिल्लीची सत्ता कमी व्हायला हवी होती हेच त्याचं उत्तर होतं.

इंग्रज गेल्यानंतर भारतामधे स्वराज्य असणार अशी सगळ्यांची कल्पना होती. प्रत्यक्षात स्वराज्य म्हणजे प्रत्येकाचं आपलं राज्य. 'हे माझं राज्य आहे' असं प्रत्येकाला वाटणं म्हणजेच सर्वांचं राज्य. जिथे प्रत्येकाला वाटतं की, ही माझी सत्ता आहे, तिथे सर्वांची सत्ता ही एक अगदी वेगळी गोष्ट आहे. लोकनीती ती हीच. स्वराज्याचं शास्त्र सतत विकसित होतं, त्याची पद्धत जरुरीप्रमाणे बदलत

राहते, तरीही त्याची मूलतत्त्वं कायमची तीच असतात.

स्वराज्य म्हणजे आत्मशासन. जेव्हा सगळ्या लोकांमधे आत्मशासनाची, स्वतःवर नियंत्रण ठेवण्याची शक्ती येईल आणि आपल्या कर्तव्याची जाणीव होईल, तेव्हा 'स्वराज्य' येईल. ते येत नाही तोपर्यंत 'राज्य'च चालणार. दिल्लीहून जे चालतं ते राज्य, मग ते आपले भारतीय लोकच का चालवीत असेनात. मुंबईहून चालतं तेही राज्यच. गावोगावी प्रत्येक मनुष्य स्वतःवर चालवतो ते स्वराज्य.

जगातल्या दुसऱ्या कोणाचीही सत्ता आपल्यावर चालू न देणं हे स्वराज्याचं एक लक्षण आहे आणि दुसऱ्या कोणावर आपली सत्ता न गाजवणं हे स्वराज्याचं दुसरं लक्षण आहे. कोणाची सत्ता आपल्यावर चालू नये आणि आपण कोणावर सत्ता चालवू नये या दोन गोष्टी मिळून स्वराज्य होतं.

आज वेल्फेअर स्टेट (कल्याणकारी राज्य)च्या नावाखाली फार मोठी सत्ता केंद्राच्या हाती असते. त्यापासून जनतेला कदाचित थोडंफार सुख मिळतही असेल, पण त्याला वेल्फेअर न म्हणता इल्फेअरच म्हणावं लागेल. मूठभर लोकांच्या हातात सत्ता असणं म्हणजे काही वेल्फेअर नव्हे. राज्य लोकांचं कल्याण करू शकलं तर ते वेल्फेअर स्टेट आणि कल्याण करू शकलं नाही तर ते इल्फेअर स्टेट आहे. कोणत्याही परिस्थितीत ते कल्याणकारी राज्य तर होऊच शकत नाही. आपलं स्वतःचं कल्याण करण्याची शक्ती जनतेच्याच हाती असली पाहिजे. नाहीतर शासक अकबर असो की औरंगजेब; जनता सारख्याच प्रमाणात गुलाम राहते.

काही लोकांना वाटतं की, भारतातल्या अडाणी लोकांना यामुळे लोकशाहीचं शिक्षण मिळत आहे. प्रत्यक्षात अगदी उलट आहे. भारतात जे शहाणपण आहे, जो अनुभव आहे, तो जगात इतर ठिकाणी नाही. भारतात अनेक भाषा बोलणारे लोक एकत्र राहतात. युरोपचा नकाशा तुम्हाला पहायचा असेल तर बिलोरी काच खाली पाडा. मग तुम्हाला युरोपचा नकाशा पहायला मिळेल. तिथे एकेका भाषेचं एक-एक वेगळं राष्ट्र मानलं गेलं आहे. तेव्हा राज्यशास्त्र, समाजशास्त्र यांच्या संबंधात युरोपला भारतापासून अद्याप खूप शिकण्यासारखं होतं.

आपल्या देशात स्वराज्य आलं. पण आलं कोणाच्या हातामधे? लंडनहून सत्ता दिल्लीला आली, एवढाच काय तो फरक झाला. एखाद्याला तहान लागली आहे. वीस हजार किलोमीटर दूर लंडनला जे पाणी होतं ते मोठ्या प्रयत्नानी

बाराशे किलोमीटर दूरच्या दिल्लीत आलं. परंतु ज्याला तहान लागली आहे, त्याच्या घशातून पाणी जोपर्यंत त्याच्या पोटात जात नाही, तोपर्यंत त्याचं समाधान कसं होणार? त्याचप्रमाणे सत्ता लंडनहून दिल्लीला आली एवढ्यानी समाधान कसं होणार?

नंतर सर्वांनी ठरवलं की, सत्ता राज्या-राज्यात वाटली जावी. पाणी चारशे किलोमीटरवर आलं. पण लोकांची तहान तर कायमच राहिली. मग लक्षात आलं की, सत्ता जिल्ह्या-जिल्ह्यात वाटावी. पाणी पन्नास किलोमीटरवर आलं. तरीही समाधान नाहीच. पाणी शेवटी पोटात गेलं पाहिजे ना! म्हणून ठरवण्यात आलं की ग्रामपंचायती बनवाव्यात. अशा प्रकारे सत्ता वरून खाली उतरत ग्रामपंचायतीपर्यंत आली. अर्थपूर्ण सत्ता आली का, हा प्रश्न मात्र शिल्लक राहिला.

कधी कधी वाटतं, 15 ऑगस्ट 1947 हा आपला स्वातंत्र्यदिन आहे की पारतंत्र्य-दिन? त्यापूर्वी आपण काही ना काही हात-पाय हालवीत होतो. पण आज भूकंप झाला, पूर आला तर कोणी एकमेकांना मदत करत नाही. 'सरकार मदत करील' असं म्हणत स्वस्थ बसतात. किल्लारीच्या भूकंपामधे तिथे हाहाकार झाला होता आणि 25 कि.मी. अंतरावरच्या लातूरमधे सिनेमा थिएटरमधे 'प्यार की कहानी' सिनेमा जोरात चालू होता. तिकिटांसाठी रांगा लागत होत्या.

इतकी निष्ठुरता का? कारण स्पष्ट आहे. 'सरकार सगळं काही करेल, आपल्याला काय देणं-घेणं आहे?' असा विचार लोकांच्या डोक्यात घर करून बसला आहे. पण, प्रत्येक बाबतीत सरकारवर अवलंबून राहणं, हे स्वातंत्र्याचं लक्षण नाही. ते गुलामगिरीचं लक्षण आहे. शेकडो वर्षं एवढ्या संतांनी, महात्म्यांनी सांगितलं की, स्वावलंबन हे अतिउच्च मूल्य आहे. त्या शिकवणुकीचं काय झालं?

आपल्याला लोकांना केवळ सुशासनासाठी नव्हे, तर स्वशासनासाठी तयार करायचं आहे. विकेंद्रित सत्ता हा स्वशासनाचा एक पैलू आहे. अर्थात, सत्ता गावागावात वाटली गेली पाहिजे आणि गाववाल्यांनी आपला कारभार स्वतःच चालवला पाहिजे. राज्यसत्ता दिल्लीत केंद्रित होणं चुकीचं आहे.

जनतेच्या मनातली गुलामगिरी हा भारत देशाला झालेला मोठा रोग आहे. त्यात बेपर्वाईचा रोग वाढला. गरिबी साथीला आहेच. एका बाजूनी भारत देशाच्या शरीरावर दहशतवादानी घाला घातला. जागतिकीकरणाच्या रेट्यामुळे देश मनोरुग्णही बनला. विचार करताना खरी अडचण तीच वाटते. भारत देश या रुग्णाला इतके

रोग आहेत की औषध कसं शोधायचं?

आपला खरा संबंध येतो आपापल्या ठिकाणातल्या ग्रामपंचायतीशी, मामलेदार कचेरीशी, नगरपालिकेशी किंवा महानगरपालिकेशी. मी स्वतः पुणे महानगरपालिकेशी आर्किटेक्ट, बिल्डर या नात्यानी एके काळी खूपच संबंधित होतो. त्यातली माझी निरीक्षणं मी आता सांगतो.

महानगरपालिकेतले सर्वोच्च अधिकारी म्हणजे सरकारतर्फे संचालन करणारे आयुक्त किंवा कमिशनर. अशा या आयुक्त मंडळींना एक गोष्ट नीट माहिती असते ते म्हणजे समोरच्याचं तोंड बंद करण्याची युक्ती. या आय.ए.एस. लोकांना फार कामं असतात, खरोखरच वेळ नसतो हे सगळं मान्य आहे. पण आय.ए.एस. परीक्षा देताना जे चातुर्य अपेक्षित असतं ते या वेळेच्या मॅनेजमेंटच्या वेळी कुठं जातं? काम घेऊन भेटायला आलेल्या माणसाला नामोहरम, निरुत्तर करणारं हजरजबाबी चातुर्य काय कामाचं?

मूळ विषय, गाभा समजून घेऊन सभ्यपणी, सौम्यपणी समोरच्या माणसाशी बोलू शकणारा तो खरा हुशार. अधिकाराचा वापर करून दुसऱ्यावर कुरघोडी करणं हे एवढ्या मोठ्या अधिकाऱ्याचं काम नाही. आलेला बॉल दुसऱ्याच्या कोर्टात टाकण्यात यांचा सबंध दिवस जातो. ठरलेली वेळ अशा मोठ्या लोकांनी पाळण्याची उदाहरणं फार कमी. कामाचा तपशील समजावून घेऊन सारांश सांगण्यासाठी आयुक्तांना एका चांगल्या अधिकाऱ्याची नियुक्ती करायला काय हरकत आहे? त्यामधे त्यांचाच वेळ वाचेल.

पुणे महानगरपालिकेची 2 रूपं असतात. महानगरपालिकेच्या जनरल बॉडी मीटिंग्जमधे नगरसेवक आयुक्तांना उलटेसुलटे प्रश्न विचारत असतात. आयुक्त गरिबासारखे सारखी माफी मागत, आश्वासनं देत, निरुत्तर होऊन बसून असतात. म.न.पा.नी नेमलेल्या काम करण्याची इच्छा आणि सवय दोन्ही नसलेल्या लोकांकडून त्यांना कामं करून घ्यायची असतात. कामं अगदी क्वचितच नीट होतात. त्यामुळे नगरसेवकांचा गुरगुराट त्यांना सहन करावा लागतो. सरकारनी आयुक्तांचे हात-पाय बांधून टाकलेले असतात नि 'आता धावा' सांगून त्यांना पाठवलेलं असतं. खरोखर जनतेच्या हिताची कामं करणारा आयुक्त क्वचित आलाच तर तो फार दिवस त्या जागेवर टिकत नाही. मंत्रालयात बदल्या करण्याचा खेळ जसा रंगेल त्याप्रमाणे त्यांच्या बदल्या होतात.

नगरसेवकांकडून एवढं ऐकून घेऊन आयुक्त स्वतःच्या ऑफिसमधे आले

की हाताखालच्या लोकांवर, भेटायला येणाऱ्या नागरिकांवर, व्यावसायिकांवर सगळा राग काढतात. मी आयुक्तांची शेळी आणि गुरगुरणारा वाघ ही दोन्ही रूपं स्वतः बघितलेली आहेत. खरं म्हणजे त्यांची दयाच येते. आय.ए.एस. हा कुठच्या पूर्ण शब्दाचा संक्षेप आहे? 'इंडियन ॲडमिनिस्ट्रेटिव्ह सर्व्हिसेस' हे मला माहिती आहे, पण लोक काय म्हणतात माहिती आहे? 'आय ॲम सॉरी' हे एक रूप आणि 'आय ॲम ए स्वाईन' हे दुसरं रूप.

महानगरपालिकेच्या आयुक्तांना अनेक निरनिराळ्या क्षेत्रांतली माहिती, शिक्षण व्यवस्थित दिलेलं असतं. ते स्वतः इलेक्ट्रिकल किंवा सिव्हिल इंजिनियरिंग औपचारिक पदवीसाठी नाही, पण सामान्य ज्ञानाच्या पातळीवर शिकलेले असतात. त्याच प्रकारे त्यांना पाणी, ड्रेनेज, कचरा व्यवस्थापन असे विषय शिकवलेले असतात. दुरुस्तीसाठी पाणी बंद, वीज बंद हा सगळा वेडेपणा आहे हे त्यांना समजत असतं, हे मला माहिती आहे. चुकून हे शिक्षण त्यांना मिळत नसलं तर त्याची व्यवस्था व्हायला हवी. परदेशात हे प्रश्न कसे सोडवतात, हे त्यांनी बघायला, शिकायला हवं. शेवटी हा वेडेपणा थांबायला हवा.

महापालिकेच्या प्रत्येक नगरसेवकाच्या अधिकाराखाली सरकारी निधीमधला खूप मोठा भाग असतो. कुठचा नगरसेवक त्याच्या विभागात कशावर खर्च करणार, यात खूप निरनिराळे प्रकार आढळतात. काही अपवाद सोडले तर बाकी सगळ्यांचा दृष्टिकोन एकदम सरळ असतो. अशी कामं करायची की जी जनतेच्या दृष्टीला ठळकपणी दिसली पाहिजेत, आणि त्यातून स्वतःला पैशाची कमाई झाली पाहिजे. जेव्हा तुम्हाला गल्लोगल्ली रस्त्याची कामं महिनोन्महिने चालू असलेली दिसतील तेव्हा असं समजायचं की, तुमच्या भागाच्या नगरसेवकाला त्याच्या पसंतीचं काम सापडलं आणि जनतेची सेवा करण्याची संधी मिळाली. राज्यभर चालू असलेल्या फ्लायओव्हर्सची कहाणी यापेक्षा निराळी नाही. तोच कारभार राज्यपातळीवर चालतो, इतकाच फरक.

ज्या महागाई नावाच्या भुताला आपण सगळे लोक घाबरतो आहोत, ती काही नुसती अन्न आणि वस्त्रापुरती मर्यादित नाहीय. घरांचा प्रश्न बिकट आहे. 'रोटी, कपडा' यांचा प्रश्न आणि 'मकान'चा भयानक प्रश्न यांची तुलनादेखील होऊ शकत नाही. शासनाचं याकडे लक्ष नाही. आपल्याला, आपल्यातल्या पुढारी लोकांना हे माहीत नाही असं आपण म्हणू शकत नाही. या प्रश्नामागच्या राजकारणाची जाणीव आपल्याला आहेच. पण तरीही तांत्रिक पातळीवर हा प्रश्न

सुटण्याची काही शक्यता असेल तर ती 'सिस्टिम बिल्डिंग' या पद्धतीनीच. तयार खोल्या आणि पॅनेल्स यांच्या स्वस्तातल्या उत्पादनानीच. सिस्टिम बिल्डिंगची कल्पना प्रत्यक्षात आणायची असली तर त्यात सरकारनीच हात घालायला पाहिजे. हे म्हणताना थोडी धाकधूकच वाटते. मूळ कल्पना सुंदर असूनही सरकार त्याचं 'अर्बन लँड सीलिंग' कशावरून करणार नाही?

महानगरपालिकेत भ्रष्टाचार या पिशाच्चानी धुमाकूळ घातलेला असतो. महापालिकेतल्या ऑफिसर्सर्समधे एकूण चार जाती आम्ही बांधकाम क्षेत्रातले लोक मानतो. एक म्हणजे सरळ पैसे खाऊन काम करून देणारे. असे सर्वात जास्त. दुसरे पैसे न घेता कामं करणारे. असे फारच कमी असतात. काही पैसे नाकारतात आणि कामंही करत नाहीत. आणि चौथी जात म्हणजे पैसे खाऊनही काम न करणारे. ही जात सर्वात वाईट, पण असेही नग असतात.

मी पुणे म.न.पा.मधे पूर्वी जात असताना एका या शेवटच्या जातीच्या माणसाबद्दल गप्पांच्यात बोलणं चालायचं की, याच्या मागून जाऊन तोंडावर कांबळं टाकून त्याला पोत्यात घालून ठोकून काढलं पाहिजे. काही दिवसांनी कळलं की तो रजेवर आहे. आजारी होता म्हणे. मग कळलं की त्याची बदली झाली. बोलण्याबोलण्यातून असं कळलं की, त्याला खरोखरच 'ट्रीटमेंट' दिली काही लोकांनी मिळून.

महानगरपालिकेतला भ्रष्टाचार ही एक मोठी कीड आहे. टेबला-टेबलावर पैसे चारावे लागतात. पैसे घेत नाही, भ्रष्टाचारात सामील नाही असा साधारण 1000 मधे एक माणूस एवढं प्रमाण असतं.

मी पूर्वी आर्किटेक्ट म्हणून प्रॅक्टिस करायचो हे आपलं बोलणं झालंय. मी आर्किटेक्ट्स असोसिएशनच्या कमिटीमधेही होतो. भ्रष्टाचार थांबवण्यासाठी काय करता येईल, यावर चर्चा व्हायच्या. एका मार्गाबद्दल माझ्या पुढाकारानी चर्चा झाली होती, तो मार्ग असा. सगळ्या आर्किटेक्ट्सनी आपापल्या क्लायंट्सना परिस्थिती आणि इलाज समजावून सांगायचा. सगळ्यांनी मिळून एक महिना पुणे म.न.पा.मधल्या लोकांना पैसे चारणं पूर्ण थांबवायचं. त्यांना म.न.पा.च्या नियमाप्रमाणे एक महिन्यात काम पुरं करावंच लागतं किंवा न करण्याचं कारण लेखी कळवावंच लागतं. सगळा काळ्या पैशाचा व्यवहार या पद्धतीनी थांबला तर भ्रष्टाचार संपेल अशी ती सूचना होती. प्रत्यक्षात ही कल्पना मान्य झाली नाही, कारण आर्किटेक्ट लोकं एकजुटीनी असं करायलाच तयार नव्हते.

पुणे म.न.पा., कलेक्टर ऑफिस, इतर अनेक सरकारी ऑफिसेस यांच्या 'लाएझन'च्या कामासाठी माझा स्वभाव, व्यक्तिमत्त्व, सगळं चुकीचंच होतं. सरळ व्यवहार, रोखठोक मुद्याला धरून बोलणं, कामाची, वेळेची शिस्त, शब्द पाळण्याचं महत्त्व यातला कुठचाच गुण तिथल्या वातावरणाशी जुळत नव्हता. मला ती कामं आवडायची नाहीत आणि बहुतेक त्यांनाही मी कधीच पसंत पडलो नव्हतो. माझ्या व्यवसायात काही वर्षांनी जेव्हा संधी मिळाली तेव्हा मी ते काम माझ्या भागीदारावर, स्टाफवर सोपवलं आणि त्यातून मोकळा झालो.

भ्रष्टाचारी सरकारी कचेऱ्या म्हणजे थेट दहशतवादीच आहेत. ते सामान्य माणसाला इतकं जेरीला आणतात की, त्याला शेवटी पैसे चारावेच लागतात. क्वचित केव्हातरी जनता खूप संतापली, कुठच्यातरी सरकारी अधिकाऱ्याला घेराव घातला, तोंडाला डांबर फासलं, कपडे फाडले अशा बातम्या मी वाचतो. मला अनेकदा वाटतं, असं जागोजागी होणं हाच त्यावर इलाज तर नसेल?

अशा बातम्या वाचून त्या कल्पनेचा विस्तार प्रत्येकाच्या मनात येणं स्वाभाविक आहे. एका गटानी मला सांगितलं की, भ्रष्टाचाऱ्यांविरुद्ध कायदा हातात घेऊन वागणाऱ्यांचा एक गट ते तयार करतात. ते कुठच्याही राजकीय पक्षाचे नाहीत. ते गुंड नाहीत. फक्त जागरूक कृतिशील नागरिक आहेत. त्यांनी केलेलं वर्णन असं. गटातल्या सगळ्यांनी चेहरे झाकायचे, बदलायचे, दाढी-मिशा, टोप असे मेक-अप करून गुप्ततेनी तयारी करायची. भ्रष्टाचारी माणसावर पाळत ठेवायची. त्याला एकटं गाठून त्याला पळवून नेऊन त्याला शहराबाहेर न्यायचं. त्याचे सगळे कपडे काढून घ्यायचे. वस्तू, फोन, कपडे सगळं जप्त करायचं. जवळ शस्त्रं ठेवायची नाहीत, त्या व्यक्तीला इजा करायची नाही. फक्त पैसे खाल्ले तर असं पुन्हा पुन्हा करू, अशी धमकी देऊन निघून जायचं.

असं म्हणतात की, त्या त्या ऑफिसमधल्या मोठ्या साहेबाला आणखी 'वरून' दर महिन्याला किती पैसे जमले पाहिजेत हा आकडा सांगितलेला असतो. त्याप्रमाणे अगदी खालच्या 'लेव्हलच्या' लोकांनी पैसे लोकांकडून गोळा करायचे असतात. त्या सगळ्या सूचना-साखळीत गडबड झालेली चालत नाही.

अशा इतक्या टोकाच्या भ्रष्टाचारानी बरबटलेल्या वातावरणाचं दुसरं रूप देवभक्तीचं असणं, ही गोष्ट स्वाभाविकच आहे. ईश्वर ही वैयक्तिक कल्पना असल्यामुळे कुठच्याही व्यक्तीनी खाजगीत स्वतःच्या घरी कितीही देवभक्ती केली तरी विवेकनिष्ठ विचाराचं आणि त्याचं वाकडं नाही. पण शासकीय पूजा

या कल्पनेला संपूर्ण आक्षेप आहे. शासकीय याचा अर्थ सरकारी पैशांनी म्हणजेच जनतेकडून गोळा केलेल्या पैशांनी पूजा चालते. याबद्दल माझा वैयक्तिकही तीव्र विरोध आहे.

काही लोक फायली गहाळ करण्याचाही खेळ करतात. फायली हरवणं ही एक सर्वश्रुत युक्ती आहे. एखाद्या प्रकरणाचा इतिहास नको तसा रंगला असला की शिपायाला पैसे देऊन फायली, त्यातले कागद नाहीसे होऊ शकतात. मुळात कागदपत्रं ठेवण्याची पद्धत इतकी गैरव्यवस्थेची असते की, असिस्टंट मंडळींचा बराचसा वेळ केस शोधण्यामधेच जातो. प्रकरणाला क्रम नसतो, विशिष्ट जागा नसते, टेबलावर ढिगावर ढीग, टेबल पूर्ण भरलेलं, येणारा माणूसही त्या ढिगावर आपले कागद पसरणार, बॅग ठेवणार. अशा परिस्थितीत हा गलथानपणा सरळ लोकांना फार मनस्तापजनक ठरतो. तसाच ज्यांना फायली किंवा कागद 'लंपास' करायचे आहेत त्यांना अतिशय हितकारक ठरतो. अशा कागदपत्रांच्या कपाटांना काही पद्धत नाही तशी कुलपाचीही व्यवस्था नाही.

म.न.पा.च्या रेकॉर्डरूमची तर गंमतच आहे. ती कुठे आहे हे शोधायचं असलं तर सोपी युक्ती आहे. प्रत्येक खोलीत डोकावून बघायचं. जिथे आपली खात्री पटेल की इथे काहीही सापडणं शक्य नाही, ती रेकॉर्डरूम समजावी.

मापांच्या दोन पद्धती हा आमच्या बांधकामाच्या धंद्यातला आणखी एक शाप आहे. मेट्रिक पद्धत फूट इंचाच्या ब्रिटिश पद्धतीपेक्षा सरस यात वादच नाही. पण या अशिक्षितांच्या देशात नि चालू सरकारी यंत्रणेत मापाची पद्धत बदलणं हे भयानक कठीण काम आहे. एकोणीसशे छप्पन्न साली म्हणजे एकोणसाठ वर्षांपूर्वी मेट्रिक पद्धत आपल्या देशानी स्वीकारली, पण अजून दुकानदार 'आठ आणे-पावशेर' वस्तू विकतातच ना! इमारतीसंबंधीचे महानगरपालिकेचे नियम मेट्रिकमधे असतात. पण वीट नऊ इंच लांब आणि तीन इंच जाड बनते. प्लायवूड आठ फूट बाय चार फूट मिळतं. दोन मीटर बाय एक मीटर मिळत नाही. दुसऱ्या बाजूला राज्य–केंद्र सरकारकडे जाणारा प्रत्येक कागद मात्र मेट्रिकमधे लिहिलेला लागतो. कॉलेजमधे विद्यार्थी मेट्रिकमधे शिकणार आणि व्यवहारात कामगारांशी, कॉन्ट्रॅक्टरशी फुटात वागणार. घरात मराठीतून वागायचं आणि 'कॉन्व्हेंट' शाळेत इंग्रजीतून विषय शिकले की जसा 'बुद्धि-भेद' होतो तसा 'भेद' या सबंध प्रकरणात होतो.

एक असा विचार कित्येकांच्या मनात येत असेल, माझ्या मनात कित्येकदा

येतो. जिथे सरकार नाही अशा जागी जाऊन स्थायिक व्हायला पाहिजे. पण घोटाळा असा आहे की, बाकीच्या सुविधांची आपल्याला इतकी सवय झालेली आहे की शहरी सुविधा पाहिजे तर सरकार अटळ आहे. आणि जंगलात, डोंगरावर जाऊन राहायची तयारी असेल तर 'सरकार-मुक्त' आयुष्य अवश्य जगता येईल.

सरकार म्हणजे जणू काही एखादी अदृश्य दैवी शक्ती असते. खऱ्या उपयोगी विषयात त्याचं अस्तित्व जाणवत नाही, पण अनिष्ट, त्रासदायक विषयांच्यात पदोपदी जाणवतं.

सरकारवर अवलंबून न राहता आपणच आपल्या स्वास्थ्यासाठी काय करू शकू याच नेमक्या विषयावर काम करणारी पुण्यात एक संस्था आहे. इतरही ठिकाणी असतील. जनमानस ट्रस्टतर्फे जीवनसाथ आणि पालक विद्यापीठ या दोन संस्थांचं काम साधारण त्याच कल्पनेवर आधारलेलं आहे. अगदी थोडक्यात, सरकारची मदतही नको त्याचबरोबर सरकारला मधे येऊ द्यायचं नाही. हे जमलं तर हातून काहीतरी काम होईल.

खरी गोष्ट अशी आहे की, सरकारनी केलेल्या कुठच्याही कामाबद्दल जनतेला भरंवसा वाटत नाही. खुद्द मलाही वाटत नाही. 'इंडियन गव्हर्नमेंट एन्टरप्राइझ' शब्दाला सगळे एका बाजूनी घाबरतात. कारण कार्यक्षमतेच्या नावानी पार बोंब असणार याची खात्री असते. दुसऱ्या बाजूनी पैशाच्या गुंतवणुकीबद्दल असं दिसतं की, सरकारी खात्यात ठेवलेले पैसे कधीही बुडत नाहीत, त्यामुळे पूर्णपणी सुरक्षित असतात. आता आपण म्हणालो तशा संस्थांनी या बाबतीत काही संशोधन केलं तर फार चांगलं होईल.

या संस्थेच्या आणि अशा संस्थांना माझा पूर्ण पाठिंबा आहे. मला पूर्वी जनमानसचं काम जमलं नसलं तरी त्याबद्दल मी अजूनही विचार करत असतो. सत्याग्रह, असहकार, मूक मोर्चा, काळ्या फिती लावून वावरणं, जाहीर उपोषण या अहिंसक मार्गांपैकीच पुढची पायरी म्हणजे संप. लाक्षणिक संप, बेमुदत संप अशा अनेक यंत्रणा काहीतरी मागण्यांसाठी करताना दिसतात. पण सरकारी भ्रष्टाचारी राक्षसाला सरळ करण्यासाठी संपूर्ण जनतेनी केलेला संप ऐकिवात नाही. असा संप कुठच्या पद्धतीनी करता येईल याबद्दल मी काही कल्पना मांडतो.

वर्तमानपत्रातून लाक्षणिक संपाचं सरळसरळ आवाहन करायचं. एक दिवस जाहीर करायचा. जनता ज्या ज्या गोष्टी रोज करते ती प्रत्येक गोष्ट न करणं ही

कल्पना असेल. त्याची आदल्या दिवशी सगळ्यांनी योजना करून तयारी करायची. खाण्याचे पदार्थ, दूध, किराणा आणून ठेवणं. कामाच्या ठिकाणी रजा घेण्यासाठी त्याचा अर्ज आधी देणं. कितीतरी गोष्टींची सोय आधी करावी लागेल. ती करायची. या सगळ्याला अपवाद फक्त वैद्यकीय गरज, सुविधा यांचा मान्य करायचा.

या सगळ्या प्रकरणात सरकारी नोकरांनीही सामील व्हावं, असं आवाहन करायचं. माझ्या माहितीप्रमाणे सबंध भारत देशात 30% लोक सरकारी, निम सरकारी नोकरी करतात. त्यातले काही खूप भ्रष्टाचारी आणि वृत्तीनी लुटारू असतात. मुळात पापभीरू प्रवृत्तीचे पण भ्रष्टाचाराच्या मोठ्या साखळीत गुंतले गेलेले संख्येनी खूप आहेत. उघडपणी काही न बोलता ती लोकंपण मोठ्या संख्येनी रजा टाकण्याची शक्यता आहे.

अशा लाक्षणिक संपाच्या दिवशी सबंध शहरात, राज्यात, देशात सामसूम दिसू दे. दुकानं, बसेस, रेल्वे, रस्ते ओस दिसू देत. सबंध देशभर सगळ्या राजकर्त्यांना कळू दे की, हे चालू आहे तसं पुढे चालणार नाही. जनतेकडून घेतलेल्या पैशाचा जनतेसाठीच उपयोग केला पाहिजे.

असा एक दिवसाचा लाक्षणिक संप ही पहिली पायरी असावी. त्यानंतर सलग दोन दिवस संपाची लोकांनी तयारी करावी. दिवस वाढवत न्यावेत.

त्याचं पुढचं टोक काय, हा प्रश्न साहजिकच कोणीही विचारणारच. खरं म्हणजे त्याबद्दल पुरेसा विचार माझा झालेला नाही. असा संप महिनाभर केला तरी ती फार मोठी पायरी असेल. मागे अण्णा हजारेंनी लावून धरलेला ‘माहिती-अधिकारा’चा मुद्दा आपल्याला माहिती आहे. त्याची कूर्म गतीनी प्रगती होते आहे. ‘लोकपाल विधेयक’ हेही प्रकरण आपल्याला माहिती आहे.

भारतातली लोकशाही अतिशय वाईट अवस्थेत आहे. निवडणुकीची पद्धत बुद्धीला पटण्याजोगी नाही. अशा त्रासदायक मुद्यांचा अभ्यास, सर्वेक्षण, योग्य उपायांचा शोध आणि शेवटी अंमलबजावणीचा आग्रह, हे त्याचं टोक असू शकेल.



# 6

# राजकीय लोकशाही

कुठच्याही मूलतत्त्वाप्रमाणे मोठ्या प्रमाणावर जेव्हा अनेक लोकांशी, गटांशी, अधिकारी व्यक्तीला वागायचं असतं तेव्हा त्याला सोशल सिस्टिमचा शोध घ्यावा लागतो. पूर्वी उल्लेख केलेला समाज राजाच्या आणि राजघराण्याच्या आधिपत्याखाली होता. आधी सरंजामशाही आणि पुढे त्याला हुकूमशाही असं नाव पडलं. तत्त्वज्ञानाच्या इतिहासातल्या ज्या काळाबद्दल आपण बोलतो आहोत त्या काळातल्या ग्रीक समाजात गुलामगिरी होती, पण वेठबिगारी नव्हती. गुलाम ही जणू काही एक जात होती. गुलामांची मुलं गुलाम व्हायची. त्या काळात गुलाम श्रीमंतसुद्धा असायचे. हुकूमशाही ही एकच समाज यंत्रणा तेव्हा अस्तित्वात होती. समाजकारण आणि राजकारण करण्याच्या नंतरच्या पद्धतींमधे साम्राज्यवाद (कॅपिटॅलिझम) साम्यवाद (कम्युनिझम) आणि लोकशाही (डेमॉक्रेसी) अशा पद्धती निरनिराळ्या भागात लोक वापरायला लागले. मुळात ही सगळी तत्त्वज्ञानाची देणगी आहे.

चीन आणि रशिया यांनी साम्यवाद स्वीकारलेला होता. मी रशियामधे कधी गेलेलो नाही किंवा चीनमधेही गेलेलो नाही. पण ‘आयर्न कर्टन’ मधल्या पूर्व बर्लिनची झलक प्रत्यक्ष अनुभवलेली आहे. या साम्यवादी देशांबद्दल बरंच ऐकलं-वाचलं मात्र आहे. त्या देशातली खरी परिस्थिती त्यांना कोणाला कळूच द्यायची नसते. तिथे जायची परवानगी मिळते, पण ठराविक ठिकाणीच जाता येतं. साम्यवादाच्या मूळ कल्पनेचं काय झालं कोण जाणे! जनतेला कशाचंही स्वातंत्र्य नाही. जगभराचा बाजार चीननी काबीज केला तो स्वस्तात काम करणाऱ्या मजुरांच्या जिवावर. अशी उत्पादनं करणाऱ्या कारखान्यांना ‘स्वेट शॉप’ म्हणतात. त्यातली कामगारांची परिस्थिती अमानुष असते म्हणतात. याउलट काही चिनी

लोक जगातल्या सर्वात जास्त श्रीमंत लोकांच्या यादीत देखील असतात.

साम्यवादातली मूळ कल्पना संसाधनांचं, सोयीचं समान वाटप अशी आहे. हे दोन्ही देश जगातल्या इतर देशांशी कायम फटकून वागले. स्वतःच्या देशाबद्दल त्यांनी इतकी गुप्तता पाळली की रशियाला 'आर्यन कर्टन' आणि चीनला 'ड्रॅगन पॉवर' अशी नावं मिळाली.

जगात सरकारच्या राज्यकारभारासाठी काही देशांनी साम्राज्यवादाचा म्हणजे कॅपिटॅलिझमचा मार्ग स्वीकारला. त्यातलं सर्वात ढळढळीत उदाहरण म्हणजे युनायटेड स्टेट्स ऑफ अमेरिका. सबंध जगावर आर्थिक सत्ता मिळवण्याची यू.एस.ए.ची धोरणं आणि प्रयत्न आपल्याला सगळ्यांना माहिती आहेत. त्याचे परिणामही आपल्यासमोर आहेत. जगात अनेक ठिकाणी अनेक वेळा लोकशाही या कल्पनेचा वापर कसा करावा याच्याविषयी तपशिलात चर्चा झाली. लोकशाहीत व्यक्तिस्वातंत्र्य हे मुख्य मूल्य मानलेलं असतं.

व्यक्तिस्वातंत्र्य हे तत्त्व एकदा मान्य केलं की, अनेक लोकं निरनिराळ्या प्रकारे वागतील, हे गृहीत धरूनच राज्य चालवावं लागतं. आणि तरी त्यांच्यात सामंजस्य निर्माण करणं हेच काम असतं. हे सगळं समजून भारतानी लोकशाही स्वीकारली. भारतात प्रत्येक सज्ञान व्यक्तीला एक मत हे मूलतत्त्व आहे. भारताचं या मार्गानी भलं झाल्याचं दिसत तरी नाही. लोकशाहीमधल्या इतर तपशिलांविषयी अधिक चर्चा करणं ही आज कल्पना आहे. या कार्यशाळेच्या मुद्यांसाठी मी विनोबा भावेंच्या पुस्तकांचा आधार घेतला. मला ते विचार फार महत्त्वाचे वाटले.

स्वातंत्र्य मिळाल्यानंतर आपण आपल्या देशात राज्यतंत्र चालविण्यासाठी लोकशाहीचा विचार पाश्चिमात्यांकडून उधार घेतला होता, हे प्रथम समजायला हवं. आतापर्यंत शोधलेल्या पद्धतींमधे ही पद्धती सर्वश्रेष्ठ आहे यात शंका नाही. ही पद्धती मुळात वाईट नाही, पण तिच्या काही मर्यादा आहेत. म्हणून ही पद्धत भारतातल्या परिस्थितीला साजेशी व्हावी यासाठी कितीतरी सुधारणांची आवश्यकता आहे. आपण मात्र तिथल्या लोकशाहीचा नमुना जसाच्या तसा स्वीकारला. यामुळेच आज आपल्या देशात अराजकाची स्थिती निर्माण झाली आहे. भारताची परिस्थिती अगदी वेगळी आहे, हे समजून घ्यायला हवं. इथे कुठलाही विदेशी सिद्धांत जसाच्या तसा लागू होऊ शकत नाही. मार्क्सचा नाही किंवा समाजवादाचाही नाही. येथे भाषा, जाती, प्रांत वगैरे अनेक भेद आहेत. स्त्रिया, हरिजन इत्यादींचे अनेक प्रश्न आहेत. शिवाय, हा देश सर्वात गरीब आहे. म्हणून, स्वतंत्रपणी

विचार करूनच भारताची आर्थिक आणि सामाजिक रचना निश्चित करावी लागेल. सांसदीय लोकशाहीचा समूळ विनाश व्हावा अशी इथे कल्पना नाही. तिच्यात सुधारणा व्हावी आणि भारताच्या परिस्थितीला ती अनुकूल बनावी हीच इच्छा आहे. भारतीय विचार लक्षात घेऊन लोकशाही पद्धतीचं भारतीयीकरण करायला हवं आहे, बरेच बदल करायला हवे आहेत.

लोकशाही विषयातल्या माणशी एक मत या मूलतत्त्वाबद्दल अनेकांना अनेकदा शंका आलेली आहे. फक्त काही मार्ग न सापडल्यामुळे गाडी अडली. माणसाच्या क्षमतेनुसार, शिक्षणानुसार एकाच्या ऐवजी त्या व्यक्तीला अधिक मतं यावर अनेक वर्षं चर्चा चालू आहे, पण क्षमता ठरण्याच्या निकषापाशी सगळं थबकलं. म्हाताऱ्यांना, अशिक्षितांना, मंदबुद्धी लोकांना प्रत्येकी एक मत असावं का नसावं, यावर देखील चर्चा झडल्या. याबद्दल देशाच्या घटनेपासूनच सगळे बदल करण्याची पद्धत बघितली तर ही गोष्ट जवळ जवळ अशक्य आहे असं लक्षात आलं.

प्रत्येक माणसानी स्वस्थ, शांत, सुदृढ आयुष्य जगावं ही आपली इच्छा आहे. त्यासाठी भक्तिमार्ग आणि ज्ञानमार्ग हे दोन मुख्य मार्ग मानलेले आहेत. आपल्या देशातले जास्तीतजास्त लोक भक्तिमार्गानी जाण्याची इच्छा करतात, कारण त्यात कष्ट नाहीत. ज्ञानमार्गात कष्ट आहेत. पण भक्तिमार्ग परावलंबित्वाचा असल्यामुळे तो चुकीचा आहे, हे जनतेला समजावून सांगायचं कसं? देशात लोकशाही असल्यामुळे लोकांनी बहुमतानी भक्तिमार्ग निवडला. नेत्यांना हे फार सोयीचं असल्यामुळे त्यांनी कधी ज्ञानमार्गाचा उल्लेख देखील केला नाही. ज्ञानमार्गानी जाणाऱ्या लोकांकडून निवडणुकीत मतं मिळण्याची काहीच खात्री नाही, हे त्याचं कारण होतं.

भारतात सध्या आहे तिचं नाव फक्त लोकशाही आहे. प्रत्यक्षात ती अनेक वर्षं सरंजामशाहीच होती. त्यानंतर कुटुंबशाही होती. गेल्या काही वर्षांतल्या राज्यकारभाराला त्यातल्या त्यात योग्य नाव म्हणजे 'बेबंदशाही'. कधीकधी ती 'ठोकशाही'चं ही स्वरूप घेते.

भारतभर दर वर्षी 26 जानेवारीला प्रजासत्ताक दिन साजरा होतो. त्याला लोकशाही दिन असंही नाव आहे. पण नेमकं काय साजरं करायचं? प्रत्यक्षात नीट विचार केला तर कुठची कसली प्रजा सत्ता? शब्दात काहीतरी गफलत झालेली दिसते. तो शब्द 'प्रजा-थट्टा' असला पाहिजे. निवडणूकीची, त्यातल्या

अनिश्चिततेची परिस्थिती बघितली तर त्याला 'प्रजा-सट्टा' ही म्हणता येईल. शब्द कुठचा, हे घटकाभर विसरलं तरी या सगळ्याचा अर्थ नक्की आहे. प्रजेकडे सत्ता नाहीय, उलट प्रजा गुलाम आहे.

लोकशाहीचा मूलभूत विचारच असा आहे की, जनतेचं प्रतिनिधित्व अधिकात अधिक सुलभ, प्रत्यक्ष आणि उपयुक्त असावं. त्याच्या ऐवजी जेव्हा माणूस असा विचार करतो की, मी किंवा माझी पार्टी कुठून आणि कोणत्या वेळी निवडणुकीत उभे राहिलो तर यशस्वीपणी निवडून येऊ शकू, याचा अर्थ, घड्याळाचा लंबक लोक-प्रतिनिधित्वाकडून सत्ताप्राप्तीच्या बाजूला झुकलेला आहे. पक्षातर्फे उमेदवार उभे करणाऱ्या लोकशाहीत हा फार गंभीर दोष आहे. प्रत्येक पक्ष किंवा उमेदवार आपल्या सत्तेचं क्षेत्र निवडतो. संपत्तीप्रमाणे सत्तेच्या क्षेत्रातही स्पर्धा नसावी ही गोष्ट लोकसत्तेच्या दृष्टीनी अत्यंत जरुरीची आहे. आर्थिक स्पर्धा लोकांचे संबंध बिघडविते त्याचप्रमाणे सत्तेची स्पर्धाही हे संबंध बिघडविते. आर्थिक स्पर्धा अनर्थकारी असली, तर लोकतंत्रातली सत्तेची स्पर्धा भयानक आहे. थोड्या लोकांच्या हातात संपत्तीचं आणि सत्तेचं केंद्रीकरण हे ज्याप्रमाणे समाजाच्या विकासाच्या दृष्टीनी हानिकारक आहे, त्याचप्रमाणे थोड्या लोकांच्या हातात राज्यशक्ती आणि दंड-शक्तीचं केंद्रीकरण हेही समाजाच्या स्वातंत्र्याला बाधक आहे.

एका गोष्टीबद्दल माझी खात्री झालेली आहे. अहिंसा या मूलतत्त्वाला काही पर्याय नाही. अहिंसेचा विचार पसरायचा असेल तर सत्तेचं वाटप गावा-गावात झालेलं हवं, म्हणजेच विकेंद्रीकरण व्हायला हवं. यासाठी गावांना कोणते अधिकार दिले जावेत, असं विचारलं जातं. परंतु अधिकार कधी देऊन मिळत नसतात, ते घ्यावे लागतात. जेव्हा गावकऱ्यांमधे आपल्या गावाचा कारभार चालवण्याची क्षमता येईल तेव्हाच त्यांच्या हाती अधिकार येतील. हे स्वातंत्र्यासारखं असतं. स्वातंत्र्य कोणी द्यायचं नसतं. ते असतंच. ही गोष्ट समजण्याचा फक्त प्रश्न असतो.

सरकारनी दवाखाने काढणं, शाळा उघडणं, यांचा कोणीच निषेध करू नये. पण त्यामुळे देशाची शक्ती वाढत नाही. देशाची शक्तीतर देशातल्या लोकांच्या चारित्र्यावर अवलंबून असते. सैन्य बलवान झाल्यानी देशाची शक्ती वाढत नाही. देशात गुणविकास किती झाला, यावर ती अवलंबून असते. देशात दवाखाने, कॉलेजं खुशाल उघडावीत, पण कारुण्याची जागा दवाखाने घेऊ

शकत नाहीत आणि शिकण्याच्या गोडीची जागा शाळा-कॉलेजं घेऊ शकत नाहीत. देशात गुणविकास झाला तरच देशाची उन्नती होईल. सरकार जितकी उत्तम योजना बनवत असेल तितका परावलंबित्वाचा धोका अधिक असतो. प्रत्येक नागरिकामधे जबाबदारीची जाणीव यावी, त्याचा गुणविकास होत रहावा. असं झालं तरच ती खरी लोकशाही म्हणता येईल. लोकांना शहाणं आणि स्वावलंबी करण्याच्या मागे सरकारनी असायला हवं. मतं, सत्ता आपोआप मिळेल.

लोक ज्या वेळी आपला कारभार आपण स्वतः करून घेतात त्या वेळी त्याला लोकशाही किंवा सार्वजनिक व्यवस्था असं म्हणतात. सार्वजनिक व्यवस्थेसाठी सामान्यतः तीन शब्द रूढ आहेत. लोकसत्ता, लोकतंत्र आणि लोकनीती. ज्या व्यवस्थेत नागरिकाला प्रतिष्ठा मिळते, त्याची योग्यता समाजातल्या कोणाही व्यक्तीच्या बरोबरची मानली जाते त्या व्यवस्थेला 'लोकसत्ता' म्हणतात. सत्तेचा मूळ अर्थ अधिकार असा नसून प्रतिष्ठेचं जीवन हा आहे. ज्या पद्धतीत नागरिकाला प्रतिष्ठा प्राप्त होते, ती कायम राहते, त्या पद्धतीला लोक-तंत्र म्हणतात. नागरिकांची परस्परांविषयी ज्या वेळी प्रतिष्ठा-भावना असते, आपल्या सुखसोयींच्या आधी किंवा त्याच्याच बरोबरीनी जेव्हा ते दुसऱ्याच्या सुखसोयींचा विचार करतात तेव्हा त्याला 'लोकनीती' म्हणतात. सारांश असा की, लोकनीतीखेरीज लोकतंत्र टिकू शकत नाही आणि लोकसत्ता प्रत्यक्षात अमलात येत नाही. नागरिक-चारित्र्याचा आधार लोक-नीती आहे.

लोकशाहीमधे एखाद्या व्यक्तीकडे लोकांनी निर्णयाचे अधिकार दिलेले असले तर निर्णय घेऊन त्या व्यक्तीनी जनतेला त्याची कारणं सविस्तर समजावून सांगितली पाहिजेत. त्या निर्णयाची काही महिने चाचणी घेऊन पुन्हा जनमत घेऊन मग तो निर्णय कायम केला पाहिजे. लोकांनी ज्या निर्णयाचे अधिकार दिलेले नाहीत त्याविषयी जनमत घेऊनच निर्णय घ्यायला पाहिजे. त्यासाठी जनमत चाचणीची योग्य यंत्रणा 365 दिवस सज्ज असायला हवी.

चांगल्या लोकांना निवडून देऊन सरकारात पाठवावं, इथपर्यंतच जगातल्या मोठमोठ्या पुढाऱ्यांचं चिंतन पोहोचलं आहे. याचा अर्थ, लोक अजाण, अनाथ बालकांप्रमाणेच रहावेत, प्रतिनिधींच्या द्वारेच त्यांनी विचार करावा असा होतो. आजची लोकशाही डेअरीच्या दुधासारखी आहे. ती फार चांगली नाही आणि फार खराबही नाही. डेअरीचं दूध अनेक गाईंच्या दुधाचं मिश्रण असतं. वेगवेगळ्या प्रकारच्या दुधाचं मिश्रण असल्यामुळे त्याची गुणवत्ता साधारण असते. राजांच्या

जमान्यात चांगला राजा असला, तर प्रजा सुखी असायची. वाईट राजा असला तर लोक दुःखी असायचे. लोकशाहीत असं होत नाही. ती साधारण असते. जे लोक निवडून येतात, ते सर्वोत्तम नसतात आणि अगदी वाईटही नसतात. खरे बुद्धिमान आणि प्रतिभावंत राजकारणाच्या दिशेलाच फिरकत नाहीत.

सामान्य बुद्धीच्या लोकांच्या हाती आपल्या जीवनाची सगळी जबाबदारी सोपवणं याहून अधिक भयानक गोष्ट कुठची? आजच्या निवडणुकीत ज्ञानेश्वर निवडून येऊ शकतील का? ज्या ज्ञानेश्वरांची महत्ता गेल्या सातशे वर्षांपासून महाराष्ट्रात सर्वमान्य आहे, ज्यांच्याहून योग्य मार्गदर्शक शोधून सापडायचा नाही, त्या ज्ञानेश्वरांचाही आजच्या निवडणुकीत पराभव होईल. पण अगदी अज्ञानेश्वरही निवडून येणार नाही. मिश्र बुद्धीचे लोक निवडून येतात आणि पूर्वी एखाद्या सम्राटाच्या हातीही नसेल एवढी सत्ता या लोकांच्या हातात सोपविली जाते. राज्यकर्तेच सामान्य बुद्धीचे असतील तर त्यांच्या हाताखालच्या अधिकाऱ्यांबद्दल काय बोलणार? राज्यतंत्राचं स्वरूपच असं असताना, पाच वर्षांनंतर अधिक चांगले लोक निवडून देऊ आणि मग सर्व सुरळीतपणी चालेल असं मानणं भोळेपणाचंच ठरेल.

मतदानातही आज काय होतं? समजा, 100 मतदार आहेत. त्यातले 60 जण मत देतात, 40 जण देत नाहीत. या साठातली 30 मतं ज्या पक्षाला मिळतात, तो राज्य चालवतो. म्हणजेच 30 लोकांची सत्ता 100 लोकांवर चालते. एखादं बिल जर असेम्ब्लीत आणायचं असलं, तर या 30 लोकांची प्रथम पार्टीमीटिंग होते आणि त्या बिलावर मत घेतलं जातं. या मीटिंगमधे 15 जणांनी जरी बिलाला विरोध केला आणि पक्षानी ते बिल पास केलं तर मीटिंगमधे विरोध करणारे सदस्यही असेम्ब्लीत बिलाच्या बाजूनी मत देतात. म्हणजे 100 लोकांसाठी 15 जण बिल पास करतात. या 15 सदस्यांमधेही प्रमुख 1-2 जणंच असतात, बाकीचे त्याचं म्हणणं मानणारे असतात. अशा रीतीनी प्रत्यक्षात शंभर माणसांवर 2-3 जणांचं राज्य चालतं. ही हुकूमशाहीच नाही तर काय?

स्वराज्य-प्राप्तीच्या पूर्वी बकऱ्याला शेफील्डच्या ब्रिटिश सुरीनी कापायचे. आता त्याला सांगतात की, आता स्वराज्य मिळालं आहे, म्हणून तुझी मान शेफील्डच्या सुरीनी न कापता देशी सुरीनी कापू. बकऱ्याला हे ऐकून बरं वाटेल का? या सगळ्या शाह्यांमधे काय राम आहे? त्यांच्यामार्फत गरिबांसाठी थोडंफार

काही होतही असेल, परंतु गरिबांबद्दल सहानुभूती असेल तरच त्यांचं कल्याण होण्याची शक्यता आहे.

हे सगळं काय चाललं आहे? लोकांनी हे कसं सहन करायचं? समाजवाद चांगला की साम्यवाद, लोकशाही चांगली की अमुक एक पद्धती चांगली, यात लोकांना काही स्वारस्य नसतं. लोकांचा असा कोणताही आग्रह नसतो. ॲलोपॅथी चांगली की होमिओपॅथी, नॅचरोपॅथी चांगली की आयुर्वेद, याबाबतीत रोग्याचं आग्रही मत नसतं. कोणत्याही पद्धतीनी का होईना, आपला आजार बरा व्हावा, एवढाच त्याचा आग्रह असतो. पद्धतीवाल्यांचा मात्र पद्धतीबद्दल आग्रह असतो. अमुक पद्धतीनी सुखी केलंत तरच सुखी होऊ, असं लोकांचं म्हणणं नसतं. कोणत्याही पद्धतीनी का होईना, लोकांना सुखी व्हायचं असतं. पद्धत चांगली असली आणि शिवाय काम चांगलं होत असलं तर ठीकच. पण कोणत्याही प्रकारानी का होईना, काम व्हावं एवढीच लोकांची अपेक्षा असते.

देशावर संकट आलं तर मग पंतप्रधानांना सगळीच सत्ता असते. ते एक प्रकारचे हुकूमशहाच बनतात. खरी गोष्ट ही की, आज लोकशाहीचा स्वतःवर भरवसाच राहिलेला नाही. आपण हुकूमशाहीला वाईट मानतो, पण संकटाच्या वेळी तर पंतप्रधानांची हुकूमशाहीच चालते. या हुकूमशाहीचं पुढे लष्करी हुकूमशाहीत रूपांतर होतं.

सैनिक विजयी होऊन येतात, तेव्हा त्यांचा सन्मान केला जातो. परमवीर चक्रासारखे सन्मान दिले जातात. ते मग म्हणतात, ‘तुमचं हे चक्रच कशाला, शासनचक्रच आम्ही ताब्यात घेतो आणि मग सर्वांना तुरुंगात टाकून ते हुकूमशहा बनतात.’ आज आपल्या चारही बाजूला, पाकिस्तान, ब्रह्मदेश, इंडोनेशिया, इजिप्त, सगळीकडे असंच होत आहे. परकीय आक्रमणापासून संरक्षण करण्यासाठी सैन्य ठेवलं, पण सैन्यापासून आपलं रक्षण कोण करणार?

या दृष्टीनी पाहिलं तर हा सगळा मामला बोगस वाटतो. यातून लोकशक्ती दिसत नाही. उलट पूर्वीचे राजे जितके नुकसान करू शकत होते, त्यापेक्षा जास्त नुकसान आजचे राज्यकर्ते करू शकतात, कारण ते लोकमत आपल्या बाजूनी असल्याचा दावा करू शकतात. त्याचा त्यांना जास्त माज असतो.

पूर्वी राजे सरदारांमार्फत काम चालवायचे, आता मंत्रिमंडळ बनतं. पंतप्रधान आपले सहकारी निवडतात. असं केलं नाही तर ‘टीम’ बनणार नाही असं म्हणतात. एकूण, राज्यसत्तेची प्रतिक्रिया म्हणून निर्माण झालेल्या या लोकशाहीत

पूर्वीचे दोष राहतातच. जुनी राजसत्ता व आजची लोकशाही यात फरक एवढाच दिसतो की, पूर्वी दुसरे लोक माझ्या डोक्यावर शिळा ठेवत, आता ती मीच माझ्या हातानी माझ्या डोक्यावर ठेवतो! पूर्वी हा अधिकार मला नव्हता. पण कोणीही लादला तरी दगड हा दगडच!

लोकशाहीच्या तत्त्वांचा मतितार्थ तपासला तर मुख्य तत्त्व असं दिसतं की, 'कोणाचाही अपमान करण्याचा कोणालाही अधिकार नाही.' प्रत्यक्षात यावर सरकारी नियंत्रण अशक्य होतं. त्यामुळे घराघरात दुर्बलांवर अन्याय होत राहिले. अपमान होतच राहिले.

लोकशाहीचा दुसरा मतितार्थ शिक्षणात समानता असा आहे. त्याचा पार बोऱ्या वाजलेला आहे. शिक्षणक्षेत्रामधे साधारण समानता असते असं एक ठिकाण भारतात असतं, ते म्हणजे केंद्रीय विद्यालय. त्या शाळांमधे अधिकाऱ्यांची आणि कनिष्ठ नोकरवर्गाचीही मुलं एका वर्गात शेजारी बसून शिक्षण घेतात.

लोकशाहीचा तिसरा अर्थ लोकांना, प्रत्येकाला उपजीविकेचं साधन पुरवण्याची जबाबदारी. महात्मा गांधीनी चरख्याची महती लोकांना पटवण्याचा खूप प्रयत्न केला. पूर्वी भारतीय खेडी शेतीप्रधान असल्यामुळे पावसाळ्याच्या अलीकडे पलीकडे मिळून 6 महिने शेतकऱ्यांना काम असायचं. बाकीच्या मोकळ्या असलेल्या 6 महिन्यांत लोकांनी सूतकताई, हातमाग कापड उद्योग वाढवून खेडी समृद्ध करावीत अशी त्यांची योजना होती. त्याचं पुढे काय झालं, ते आपण बघतोच आहोत.

भारत देशाच्या घटनेनी प्रत्येक व्यक्तीला संभाषणस्वातंत्र्य, आचारस्वातंत्र्य, विचारस्वातंत्र्य दिलेलं आहे. अपवाद एकच. दुसऱ्यावर अन्याय करणं. त्याचं स्वातंत्र्य कोणालाही नाही. प्रत्यक्षात परिस्थिती निराळी आहे, हीच काय ती अडचण आहे आणि उपाय सापडत नाही.

एक निराळीच गोष्ट इथे मांडतो. सध्याच्या भारतीय पिढीला हुकूमशाही म्हणजे काय याची पुरेशी कल्पना नसल्यामुळे त्यांना भारतातल्या अर्धवट लोकशाहीत तुलनेनी किती सुख आहे, याची कल्पना नसते. मला खूप अनुभव आहे असं म्हणू शकत नाही. पण काही वर्षं मी यू.ए.ई. (युनायटेड अरब एमिरेट्स) मधे काढल्यामुळे मला साधारण कल्पना आहे. मी फार पूर्वीपासून निरीश्वरवादी आणि कर्मकांडविरोधी होतो. ते माझ्या तिथल्या मित्रांना माहीत असल्यामुळे मला त्यांनी पहिली गोष्ट सांगितली म्हणजे त्याविषयी तोंड बंद

ठेवायचं. सरळ सरळ जाहीर मुस्लीम राजवट असली की त्याबाबतीतले नियम कडक असतात. मुस्लीम नसूनही खूप बंधनं येतात. व्यक्तिस्वातंत्र्य नावाचा शब्दच कोणी वापरत नाही. देशाचा राजा आणि राजाचा कायदा हाच अंतिम निर्णय असतो. अपील नाही. मी सौदी अरेबियात गेलेलो नाही, पण ओळखीचे अनेक गेले. ते सांगतात, सौदीमधे जास्त टोकाची हुकूमशाही बघायला मिळते.

पूर्वी तत्त्वज्ञानाच्या विकासाच्या काळात साधारण काही वर्षांच्या प्रयत्नांनंतर सगळ्यांनी मिळून आपल्याला हुकूमशाही हवी का लोकशाही हा निर्णय घ्यायचा असतो, अशी कल्पना निघाली होती.

लोकशाही पद्धतीनी हा भारत देश चालवणं स्वातंत्र्य मिळाल्यापासून कोणालाच जमलेलं नाही. कुठचाही राजकीय पक्ष सत्तेवर आला तरी त्यात फरक पडलेला नाही. सर्वसामान्य माणसाला फक्त चरितार्थ चालवणं एवढीच आकांक्षा असते. पण महागाईचा दणका इतका जबरदस्त आहे की गरीब, कनिष्ठ मध्यमवर्गीय जनता पार कोसळण्याच्या अवस्थेत आहे. यावर उपाय नाहीत असं नाहीय. पण त्या उपायांसाठी सामान्य जनतेनी एकजुटीनी काही पावलं उचलायला हवी आहेत. ते मात्र शक्य होत नाही. कारण या विषयातले जाणकार लोक जे सांगतायत ते सत्ताधारी राजकारण्यांना सोयीचं नाही.

खरं म्हणजे विचार भिन्न-भिन्न असतात, म्हणून वेगवेगळे पक्ष असतात. परंतु आज पक्ष विचारांचा गोंधळ वाढवतातच. कुठल्याही पक्षाकडून कोणी निवडला गेला तरी त्याला स्वातंत्र्य असेल का? पक्षाच्या सभेत त्याच्यावर पक्षशिस्त लागू होईल. पक्षाच्या आदेशानुसार असेम्ब्लीत हात वर करावा लागतो; आपली अक्कल चालवायची नसते. पक्षशिस्त ही हुकूमशाहीसारखीच असते. विशेष बिल येणार असेल तरच उपस्थिती आवश्यक असते, नाहीतर असेम्ब्लीत या किंवा येऊ नका.

हे सगळं इतकं यांत्रिक झालं आहे की जनतेला त्यात तिळमात्रही रस राहिलेला नाही. कोणत्याही शाहीत कसलंही परिवर्तन होवो, कोऱ्या कागदावर निळी शाई असो की काळी शाई, प्रजेला त्यात काय रस वाटणार? ज्यात लोकांचं काही हित असेल अशा गोष्टीतच त्यांना रस वाटू शकतो. लोकशाही चालू आहे आणि आपण भरडले जातच आहोत. दुःख वाढतं आहे, शोषण वाढतं आहे. धन्य आहे ही लोकशाही! यात सभासद आपल्या स्वतंत्र मताधिकाराचा उपयोग करू शकत नाही. म्हणून ही प्रत्यक्ष लोकशाही नाही, ही अप्रत्यक्ष

लोकशाही आहे.

सांसदीय लोकशाहीत एक सत्ताधारी पक्ष आणि एक विरोधी पक्ष असणं आवश्यक मानलं गेलं आहे. अर्थात, एक पक्ष असतो अनुरोधी आणि दुसरा विरोधी. लोकशाहीत सत्ताधारी पक्षाच्या चुका दुरुस्त करण्यासाठी विरोधी पक्ष असणं आवश्यक मानलं जातं. विरोधी पक्ष नसला तर लोकशाही टिकत नाही. त्यामधे अनियंत्रितता शिरू लागते आणि शेवटी तिचं रूपांतर 'फॅसिझम'मधे होतं, असं म्हटलं जातं.

सरकारी पक्ष सत्ताधारी पक्ष असतो आणि विरोधी पक्ष असतो सत्ताभिलाषी. अर्थात, दोन्ही पक्ष सत्तेच्या केंद्रबिंदूभोवती फिरत असतात. सत्तेला केंद्रस्थानी ठेवून दोघं आट्यापाट्यांचा खेळ खेळत असतात. सत्ताभिलाषी पक्ष सत्ताधारी पक्षाचं प्रतिबिंबच असतो. उलटा ठसा उमटणाऱ्या कागदाप्रमाणे सत्ताभिलाषी पक्ष सत्ताधारी पक्षाचे दोष आपल्यावर उमटवून घेतो. यातून फक्त विरोधी पक्षाची निर्मिती होते; सत्ताधारी पक्षाची शुद्धी त्यामुळे होऊ शकत नाही. उदाहरणार्थ, विरोधी पक्षांनी जरी जातीपातीचा विचार न करण्याचा निश्चय केला असला तरी प्रतिपक्षानी जातीच्या आधारावर उमेदवार उभा केला तर हा पक्षही तो विचार करूनच आपला उमेदवार उभा करील.

विरोधी पक्ष अशा रीतीनी दोष-चुंबक बनतो. लोहचुंबक मातीतून लोह-कण जसे खेचून घेतो, तसेच विरोधी पक्ष सत्ताधारी पक्षाच्या कामातले दोष खेचून आपलेसे करतो. निवडणुकीत लोक जिंकण्यासाठीच उभे राहत असतात, हरण्यासाठी काही कोणी उभा राहत नाही. म्हणून सत्ताधारी पक्ष जिंकण्यासाठी जे काही करतो ते सगळं विरोधी पक्षाला कर्तव्य समजून करावं लागतं. अशा प्रकारचा विरोधी पक्ष लोकशाहीचं शुद्धीकरण करू शकत नाही. त्याचं तोंड सत्तेकडेच असतं, म्हणून तो करेक्टिव्ह म्हणजेच सुधारणारा बनू शकत नाही.

आपला देश अत्यंत विशाल आहे. तेव्हा मतभेद तर राहणारच. आणि राजकारणात मतभेद असणं स्वाभाविकही आहे. पण भारतात आज केवळ मतभेद नाही, तर मनभेद, बुद्धिभेद वाढत आहेत. सगळे पक्ष आतून तुटत आहेत. त्यात जागृत बुद्धी आणि नीती नाही. मी कोणत्याही पक्षाचा नाही. पण पक्ष असेलच तर ते मजबूत असावेत अशीच माझी इच्छा आहे. पण आज तर त्यांच्यात नीतीच राहिलेली नाही. राजनीती असो की लोकनीती. दोन्हींमधे नीती तर हवीच. नीतिविना ना राज्य चालू शकते, ना पक्ष टिकू शकतात, ना लोक-व्यवस्था चालू शकते.

सध्या सामाजिक जाणीव असलेले कार्यकर्ते तीन विभागांत वाटले गेले आहेत.

1) सत्तेत जाऊन काम करणारे.

2) सत्तेच्या बाहेर राहून सत्ताधाऱ्यांचा मत्सर करणारे.

3) सत्तेच्या बाहेर राहून आपल्या कामात मग्न असणारे.

या तिघांहून वेगळा असा वर्ग तयार झालेला नाही. आज तर जो विशिष्ट रस पिऊन सत्ताधारी पक्ष पुष्ट होतो, तोच रस पिऊन विरोधी पक्ष पुष्ट होतात. म्हणून सत्ताधारी पक्षाच्या चुका सुधारण्याचं सामर्थ्य त्यांच्याकडे नसतं.

सध्याच्या लोकशाहीमधे प्रत्येकाला एक मत या पद्धतीमुळे खऱ्या प्रश्नांना उत्तरं शोधण्याऐवजी भलत्याच गोष्टींना महत्त्व दिलं जातं. त्यामधे बदल पण शक्य नाही कारण तेही लोकशाही पद्धतीनी ठरवावं लागतं.

आतापर्यंत रूढ झालेल्या पद्धतींमधे लोकशाही ही जरी सर्वश्रेष्ठ पद्धती असली तरी तिच्यात काही दोष आहेत. लोकशाहीबद्दल काही आक्षेप असे आहेत.

1) इतर अनेक पद्धतींप्रमाणे ही पद्धतीही हिंसेवर आधारलेली आहे.

2) यात फक्त संख्या-गणतीला महत्त्व आहे. ही केवळ गणिती यांत्रिक गोष्ट आहे.

3) यात अनेक पक्ष असणं आवश्यक मानलं गेलं आहे. हे हानिकारक आहे.

4) आजच्या परिस्थितीत ही पद्धती संकुचित भावनांचं निराकरण करू शकलेली नाही. मुळात राष्ट्रवाद हीही एक संकुचित भावनाच आहे. त्याशिवाय का विवेकानंद परदेशी श्रोत्यांना बंधूभगिनी म्हणाले?

याखेरीज, या लोकशाहीत राजकीय आणि आर्थिक स्वातंत्र्याचा समावेश नाही, हाही एक आक्षेप आहे. पूर्वी राजेशाही प्रचंड सैन्यांमार्फत आपलं रक्षण करायची, त्याचप्रमाणे लोकशाहीला सुद्धा आपल्या रक्षणासाठी राज्याच्या हिंसक दंडशक्तीचा उपयोग करावा लागतो. विज्ञानाचा जसजसा विकास होत आहे, तसतसा अंतर्गत व्यवस्था आणि बाह्य रक्षणासाठी एखाद्या नैतिक साधनाचा, आचार संहितेचा शोध अपरिहार्य होत आहे, पण दिवसेन्‌दिवस ते अशक्य वाटायला लागलं आहे.

लोकशाहीमधे प्रत्येक निर्णय गणिती बहुमत पद्धतीनी व्हावा, अशी

कल्पना असते. प्रत्येक सामाजिक निर्णय या पद्धतीनी बऱ्याच वेळा होतो. पण कुटुंबात मात्र लोकशाहीचं तत्त्व धाब्यावर बसवलं जातं. त्याच्याबद्दलही खूप काम करण्याची गरज आहे. त्यातली वाईट गोष्ट अशी आहे की देशात, राज्यात जशी परिस्थिती असेल तशीच लोकशाही कुटुंबापर्यंत झिरपणार. तसेच संस्कार होणार.

जीवनसाथच्या मिश्रगट चर्चांच्यात कुटुंबातली लोकशाही असा विषय ठेवून चर्चेचे प्रयत्न नीट मनाजोगे जमले नाहीत. लोकांच्या डोक्यात राजकीय लोकशाही इतकी पक्की बसली आहे की कुटुंबातल्या लोकशाहीबद्दल विचार करणंही त्यांना कठीण जातंय.

शेवटी पुन्हा सांगतो, मी पॉलिटिक्स या विषयाचं अधिकृत शिक्षण घेतलेलं नाही. एक सर्वसामान्य नागरिक म्हणून मला वाटतं की, भारत देशात लोकशाहीच हवी, पण त्यात खूप सुधारणा करायला हव्यात. हा मजकूर वाचून कोणी लेखी सुधारणा सुचवल्या तर आपल्या सगळ्यांचा फायदा होईल. या लिखाणातले नुसते दोष काढण्यापेक्षा खरोखर अमलात आणण्याजोग्या गोष्टी कळवाव्यात अशी मात्र आग्रहाची विनंती आहे.



# 7

# बहुमत

तत्त्वज्ञानाच्या विकासाच्या टप्प्यात बहुमत या कल्पनेचा जन्म कसा झाला, ते जरा बघूया. 2500 वर्षापूर्वी ग्रीसमधे या विषयीचा अभ्यास चालायचा. एखादी गोष्ट काही लोकांच्या फायद्याची आणि काही लोकांच्या तोट्याची असली तर योग्य अयोग्य कसं ठरवायचं? हा पुढचा निर्णय व्हायला त्या काळी आणखीन काही महिने जायचे. अशा तऱ्हेनी सबंध दिवसभर हाच उद्योग करणारे आणि अनेक विषयांवर चर्चा करून मत पक्कं करणारे असे अनेक विद्वान सबंध आयुष्य त्यात घालवायचे. या प्रश्नाचं उत्तर त्यांनी असं शोधून काढलं की, मतांची संख्या मोजून जी गोष्ट जास्त लोकांच्या फायद्याची असेल ती योग्य किंवा चांगली.

यावरून लोकांचं आणि प्रतिनिधींचं मत घेतल्यामुळे सामाजिक निर्णय घेता येतात हे कळलं. या पद्धतीनी निर्णय घेतला की वैयक्तिक स्वरुपाचा वाद न होता शांततेनी काम होतं हे कळलं. त्याच्यावरून बहुमत ही कल्पना पक्की होत गेली. आजही विवाह या खेरीजचं बाकी आयुष्य, या संदर्भात विचार करताना कुठचाही संकेत, पद्धत कायदा किंवा या बाबतीत निर्णय घेण्यासाठी बहुमताचा वापर करावा लागतो. विवाह या संदर्भात विवेकवादी सत्यशोधक प्रवृत्तीनी हे जे मी लिखाण करतो आहे ते मला स्वतःला योग्य वाटतं, एवढाच दावा मी करू शकतो. आसपासच्या समाजाचा विचार केला तर बहुमतात ही कल्पना बसत नाही, याची जाणीव मला सतत ठेवावी लागते. या विषयातही आचार्य विनोबा भावे यांच्या लिखाणामुळे मला योग्य दिशा सापडली.

एकदा जमलेल्या लोकांच्यातल्या मतांचं गणित हाच निर्णयाचा निकष ठरला की त्यातून प्रश्नच प्रश्न निर्माण होतात. 100 जणांची बैठक अशी

कल्पना केली तर 51 लोकांची बुद्धी 49 लोकांच्या बुद्धीपेक्षा नेहमी जास्त किंवा तेज असते का? एकदा एकानी गमतीनी विचारलं, 'आपल्या देशात मूर्ख लोक जास्त आहेत की बुद्धिमान?' उत्तर मिळालं, मूर्खांचीच संख्या जास्त आहे. संख्येनी जास्त असलेल्यांचं राज्य म्हणजे मूर्खांचं राज्य. प्रत्यक्षात ज्यामुळे सर्वांचं समाधान होत असेल तेच करायला हवं, तरच ते योग्य होईल. पण तिथेच तर मेख आहे. बहुसंख्य लोकांचा स्वार्थ म्हणजे लोकमत नाही. समजा, एखाद्या क्षेत्रात शेकडा 95 सवर्ण व 5 लोक दलित आहेत, तर 95 सवर्णांचा स्वार्थवाद लोकमत होऊ शकेल?

याच्या उलट एखाद्या क्षेत्रात दलित बहुसंख्य असल्यामुळे अस्पृश्यांचं सरकार बनलं आणि समजा, परंपरागत समजुतीमुळे त्यांना आतापर्यंत जो त्रास भोगावा लागला, त्याचा सूड घेण्याचा विचार त्यांच्या मनात आला तर या सूड-वृत्तीला खरोखरीचं लोकमत मानता येईल का? आणखी एक उदाहरण घ्या. गोऱ्या लोकांची टोळी क्रोधानी उन्मत्त होऊन अमेरिकेत काळ्या लोकांच्या अंगाची सालडी काढू इच्छिते, तर जो सामूहिक उन्माद आहे, त्याला लोकमत म्हणता येईल का?

लोकतंत्रासमोर हे सर्व गहन प्रश्न आहेत. त्यावर तंत्राचं सर्वस्व अवलंबून आहे. अल्पसंख्य, दुर्बळ, व्याधिग्रस्त किंवा अपंग माणसाचं स्वातंत्र्य ज्या ठिकाणी अबाधित राहतं, त्यांच्या सुखसोयींची व्यवस्था जिथे होते, त्याला चांगला कारभार किंवा सुव्यवस्था म्हणता येईल. म्हणून लोकगर्दीची मनोवृत्ती किंवा सामूहिक आवेश ही लोकमत किंवा लोकनीती नाही.

प्रत्येक नागरिकाचं स्वातंत्र्य आणि अल्प संख्याकांची आणि दुर्बलांची सुरक्षितता अबाधित राहणं ही खऱ्या लोकतंत्राची कसोटी आहे. सामान्य नागरिक व्यक्ती किंवा अल्पसंख्य समुदाय यांच्या हातात दोन्ही प्रकारच्या शक्ती नसतात. त्यांच्याजवळ शस्त्रांची शक्ती नसते आणि मतांचीही शक्ती नसते. मग त्यांच्या हक्कांचं अधिष्ठान कोणतं असू शकेल? बहुसंख्याकांचं सौजन्य हीच गोष्ट त्यांच्या स्वातंत्र्याचा आधार असू शकतात. या दोन्ही गोष्टी सत्तानिरपेक्ष आहेत. यालाच लोकनीती म्हणतात.

दोन व्यक्तींच्या आपापसांमधल्या व्यवहारात जेव्हा कायदा येतो तेव्हा त्या ठिकाणी स्नेह किंवा विश्वास राहात नाही. परस्परांमधली सद्भावना कमी किंवा नाहीशी होते तेव्हाच त्यांच्या संबंधात सत्तेचा किंवा कायद्याचा प्रवेश होतो.

जगभरच्या सर्व सुधारकांची इच्छा अशी आहे की, माणसाच्या परस्पर व्यवहारांचा आधार कायदा नसावा. स्वतःच्या आईच्या, बापाच्या किंवा मुलांच्या संबंधात कायदा यावा असं कोणालाच वाटत नाही. कुटुंबाच्या खानदानीचं किंवा कुलीनतेचं लक्षणच हे आहे की, कौटुंबिक व्यवहारात कायद्याचं नामोनिशाणसुद्धा नसावं. नागरिकांचे आपापसातले व्यवहार प्रेमाच्या व सद्भावनेच्या आधारावर व्हावेत. त्यात आज कायदा दखल देत असला तर ती दखल हळूहळू कमी होऊन अगदी नाहीशी झाली पाहिजे. शासन-मुक्त समाजाचा अर्थ हाच आहे. शासन-मुक्त व्यवहार हा मूळचा नैसर्गिक व्यवहार आहे. जिथे स्वार्थास्वार्थात टक्कर होते, तिथेच कायद्याचा प्रवेश होतो. याचा उपायच हा की, व्यक्ती किंवा व्यक्ती-समुदाय यांच्या स्वार्थात ज्या कारणांनी टक्कर होते, ती कारणंच समाजात राहू नयेत. स्वार्थाच्या विरोधाचे प्रसंग कमी झाले तर दोन नागरिकांच्या व्यवहारात कायदा येण्याची गरजच राहणार नाही.

अशा ठिकाणी कौटुंबिक भावना स्थिर होते. यालाच 'शोषण-मुक्त' समाज म्हणतात. ज्या ठिकाणी शिस्तबाजी व कायदेबाजी नाहीशी होते तिथे कौटुंबिक संबंध प्रस्थापित होतात. याचंच नाव 'शासन-मुक्त' समाज.

विनोबाजींच्या या विचारांच्यात किंवा भावनेत चुकीचं काहीच नाही. प्रश्न एवढाच वाटतो की हे विचार ऐकून घेण्याचीही समाजाची अवस्था नाही. दुर्धर रोगामुळे आलेल्या ग्लानीमधे असताना अतिशय गुणकारी औषधाविषयी कोणी बोलायला लागलं तरी ते ऐकू कसं येणार? खरोखर डोक्यात शिरणार कसं?



# 8

# सहकारी संस्था

नागरी जीवनातलं मुख्य तत्त्व 'सहकार' आहे, हे खरं म्हणजे सगळ्यांना माहीत आहे. बंगल्यांची नाहीतर फ्लॅटची असो, असते ती 'सहकारी संस्था'. आपण लोकशाही भारतात राहतो म्हटल्यावर लोकशाही पद्धतीनी चाललेल्या सहकार या मूळ तत्त्वावर आधारलेल्या संस्थेचे आपण सभासद असतो. प्रत्यक्षात त्या तत्त्वाचं काय होतं? समाईक लिफ्ट, समाईक जिने, समाईक मोकळी जागा, समाईक पाणी, रस्ते, पार्किंग वगैरे ठिकाणी आपण हे तत्त्व लक्षात ठेवतो का? प्रत्यक्षातली परिस्थिती दारुण आहे. सोसायटी, त्याच्या मीटिंग्ज, निवडणुका, अध्यक्ष, सचिव, हे सगळं छोट्या प्रमाणावरचं लोकशाही सरकार आहे, हे लोक विसरतात.

सरकारला निरनिराळ्या प्रकारचे कर सगळ्यांनी भरल्याशिवाय सरकार चालणार नाही, तशी बहुमतानी ठरलेली नियमित वर्गणी चोखपणी सोसायटीला दिल्याखेरीज सोसायटी चालणार नाही. सोसायट्यांच्या पाहणीत असं दिसतं की, बहुतेक लोकांना हे तत्त्व समजतं, पण 5 ते 10% सभासद नासमज निघतात. 'आम्ही हे वापरत नाही, आम्हाला का याचा भुर्दंड?' अशासारखे त्यांचे बालिश प्रश्न असतात. लोकशाहीचं तत्त्व त्यांना समजलेलं नसतं हे उघड आहे. अशा कुटुंबातले नवरा-बायको, मुलं, इतर कुटुंबीय यांच्यातले कौटुंबिक, वैवाहिक संबंध कसे असतील, याची आपण कल्पना करू शकतो की!

को-ऑपरेटिव्ह सोसयटीमधले असे मेंबर्स वाद घालत बसतात, सोसायटीच्या मागणीप्रमाणे पैसे देत नाहीत आणि मग त्यांचं नाव 'डिफॉल्टर्स'च्या यादीमधे जातं. मधे काही महिने, काही वर्षं जातात. मग केव्हातरी त्या मेंबरचं कुठचंतरी काम अडलं की तो मेंबर सोसायटीकडे येतो. त्यावेळेला सोसायटीच्या मागणीप्रमाणे

दंडासकट मुकाट्यानी पैसे चुकते करतो.

अशा डिफॉल्टर मेंबरवर दबाव टाकण्यासाठीची सर्वात चांगली युक्ती म्हणजे सोसायटीच्या नोटिस बोर्डवर त्यांची नावं लावणं. अशा मेंबर्सना मनातून खूप राग येतो, वाईट वाटतं. पण त्या दबावतंत्राचा बहुतेक वेळा उपयोग होतो. अशा डिफॉल्टर मेंबरला काय शासन करता येतं, कुठचा दबाव टाकता येतो याबद्दल कायदा नाही, पण अधिसूचना आहेत. अशा मेंबरचं वीज, पाणी तोडण्याचा सोसायटीला अधिकार नाही. जाण्या-येण्याची वाट, लिफ्ट, जिन्याचा वापर रोखण्याचा अधिकार नाही. समाईक सिक्युरिटी असेल तर त्या मेंबरला ती सोय मिळत राहील. गाडीच्या पार्किंगला मात्र परवानगी नाकारता येते.

आजकाल काही मोठ्या स्कीम्समधे वीज, पाणी, सगळेच मीटर स्वतंत्र ठेवतात. काही कडक योजना करण्याची पाळी आली तर, 'वर्गातल्या सगळ्या मुलांना शिक्षा' करावी लागत नाही.

वीज, पाणी, ड्रेनेज, लिफ्ट यांचा रोज संबंध येतो. सिक्युरिटीची जातकुळी निराळी आहे. गरज 24 तास, पण आठवण क्वचित येते. सोसायटी मीटिंग्जमधे सुरक्षितता हा सर्वात महत्त्वाचा प्रश्न असूनही लोक त्याला महत्त्व देत नाहीत. वॉचमनसाठी करण्याच्या सोयींना त्यांचा नकार असतो. वॉचमनला ऊन, पाऊस यापासून संरक्षण देऊया, त्यांच्याशी माणुसकीनी वागूया म्हटलं की बहुमतानी त्याला नकार येतो.

वॉचमन हा सामाजिक प्रतिष्ठेच्या मोजमापात निम्न श्रेणीचा असतो. त्यामुळे संकेत मोडणारे मेंबर्स वॉचमनचं ऐकत नाहीत. गाड्या भलतीकडे पार्क करतात, वॉचमनना खाजगी कामं सांगतात, वेडवाकडं बोलतात, कसंही वागतात.

सरकारच्या सहकारी संस्था नियंत्रक विभागानी कचरा या प्रश्नाचा अभ्यास करावा, अशी माझी सूचना आहे. त्यांनी काही गोष्टी सक्तीच्या कराव्यात. प्रत्येक सोसायटीत ओला-कोरडा कचरा खड्ड्यात जाऊन त्याचं खत, त्याचा सोसायटीमधल्या बागेत वापर, रेनवॉटर हार्वेस्टिंगसाठीच्या टाक्या, या गोष्टी सक्तीच्या केल्या की महानगरपालिकांचा ताण कमी होईल.

माझं स्वतःचं असं मत बनलं आहे की, आयुष्यभर सरकारी नोकरी केलेल्या माणसापेक्षा खाजगी क्षेत्रात नोकरी करणाऱ्याला सगळ्या बाजूंनी विचार करण्याची क्षमता जास्त असते. स्वतःचा व्यवसाय करणाऱ्याला ती क्षमता त्याहून अधिक असते. अशा प्रत्येक गोष्टीला अपवाद अर्थातच असतात. म्हणण्याचा

उद्देश असा की, अशी योग्य क्षमता असणाऱ्यांनी शक्यतोवर सोसायटीचं चेअरमन/सेक्रेटरी बनावं. मी काही ठिकाणी अगदी नासमझ आणि अडेल चेअरमन बघितले आहेत.

मला नेहमी आश्चर्य वाटतं की, सोसायटीचं चेअरमन/सेक्रेटरी, एवढंच काय, नगरसेवक, आमदार, खासदार, राज्यमंत्री, केंद्रमंत्री अशा पदांसाठी लोक एवढ्या हौसेनी कसे उभे राहतात? या सगळ्या लोकांना करावी लागणारी कामं आणि त्याचा अधिकृत मोबदला याचं प्रमाण व्यस्त असतं. त्यामुळे मिळणारा पैसा, किंवा त्यामुळे मिळणारी सत्ता ही दोनच कारणं मला दिसतात. तात्त्विकदृष्ट्या समाजकार्याची आवड हे कारण असू शकतं, पण त्याची शक्यता फारच क्वचित असते.

लोक नीतीनी वागत नाहीत म्हणून जास्त बंधनं टाकणारे कायदे करावे लागतात. सहकारी संस्था विभागाची नवीन धोरणं अशा सोसायट्यांवर जास्त जास्त बंधनं टाकण्याची दिसतात. सरकारच्या एकूण हालचालींची दिशा मला तरी गोंधळात टाकणारी वाटते. हे सगळं नॅशनलायझेशनच्या दिशेनी चाललंय का प्रायव्हेटायझेशनच्या दिशेनी, कोण जाणे!



# ९

# राजकारण

माझं असं निरीक्षण आहे की, भारतातले सर्व पक्षांचे सर्व राजकारणी समाजकारणाचा निव्वळ अभिनय करतात. प्रत्यक्षात प्रथम सत्ता आणि त्या सत्तेच्या वापरानी मिळणारा पैसा एवढाच त्यांचा उद्देश असतो. याला अपवाद असणाऱ्या, समाजासाठी, लोकांच्या हितासाठी झटणाऱ्या लोकांची संख्या हाताच्या बोटावर मोजता येण्याजोगी आहे.

राजकारण म्हणजे सत्ता या मुख्य हेतूनी खेळलेले डावपेच. थोडक्यात, लबाडी. राजकारणात 'खरं आणि न्याय्य' हा विषय विसरायचा असतो. राजकारणातल्या टीमसाठी पैसा लागतो. पैसा असला तर सत्ता आणि सत्ता असली तरच पैसा येतो. यामुळे समाजकारण मागेच पडतं. बहुतेक वेळा राहूनच जातं.

राजकारण हा सरळसरळ धंदा आहे. त्यात राजकारणी माणूस पैसे कमावणारच. वाईट भाग एवढाच की, मिळणारे पांढरे पैसे पुरेसे नसतात. त्यामुळे जास्त प्रमाणात काळ्या पैशातच व्यवहार होतात. हे पैसे कोणाकडून घ्यायचे? सरळ आहे. जनतेकडून. सरळ मागणी करून जनतेकडून हे पैसे घेता येणार नाहीत. मग कसे मिळवायचे? त्याचंही उत्तर सरळ आहे. लुटून, अडवून, ठगवून, चोरून म्हणजेच फसवून. या वर्णनात न बसणाऱ्या अपवादात्मक राजकारण्यांनी समजून घ्यावं की, हे सर्वसाधारण राजकारणी माणसाचं वर्णन आहे. त्यांचं नाही.

सध्याच्या काळातले राज्यकर्ते राज्यसत्ता ही स्वतःची खाजगी मालमत्ता समजतात. त्याच प्रकारे ती सत्ता वापरतात. आपल्या स्वतःची तुंबडी भरण्यासाठी सत्तेचा वापर करतात. केंद्रातले राजकारणी आणि राज्यातले राजकारणी यांच्यात या बाबतीत काही फरक नसतो. सगळ्या हालचाली ते सनदी अधिकाऱ्यांमार्फत

करतात. त्यासाठीच जणू त्यांची नेमणूक असते. राजकारण हे सरळसरळ अर्थकारण झालं आहे. यशस्वी राजकारणी हा उत्तम अर्थव्यवस्था जाणकार असावाच लागतो.

हे मी म्हणतोय त्याचं कारण आहे. मला या लोकांना अधिकृतपणी मिळणारे दर महिना मोबदल्याचे आकडे माहिती आहेत. आणि त्याचा गुणाकार मला करता येतो ना! मी म्हणतोय तसे लुटून पैसे मिळविल्याशिवाय त्यांच्या मालकीच्या फ्लॅट्स, जमिनी, बंगले यांचं दुसरं स्पष्टीकरण असूच शकत नाही.

या जनतेकडून लुटलेल्या पैशाचं व्यवस्थित सर्वांना वाटप होतं. त्या वाटपात विरोधी पक्षाचे लोकही सामील असतात. जेव्हा आपल्याला दोन विरोधी पक्षाच्या नेत्यांचा एकत्र फोटो वर्तमानपत्रात दिसतो तेव्हा खाली टीप असते. 'आपापले मतभेद बाजूला ठेवून हास्यविनोदात रमले.' याचं कारण व्यवहार व्यवस्थित जमलेला असतो. त्यातली खरी गोष्ट अशी आहे की, तुम्ही कुठच्याही पक्षाचे असा, जनतेला लुटणं थांबत नाही, राजकारण्यांना मिळणारा गाळा चुकत नाही.

काहीतरी निमित्तांनी सारखे नेत्यांचे फोटो लोकांसमोर आले पाहिजेत अशी राजकारणाची गरजच बनते. फुलांचा हार घालतानाचा फोटो, हार घालून घेताना, कोणीतरी त्यांना पेढा भरवताना, नेते हातात झाडू घेऊन सफाई करताना. अशा 1 मिनिटांची 'पोझ' घेऊन फोटो काढून ते छापणं अशानी जनतेच्या हालअपेष्टांमधे काही बदल होणं शक्य आहे का? लोकं मनात अशा नेत्यांना हसत असतील. मला तर हसू येतं बाबा!

अशा तऱ्हेचे अनेक विनोद जगभरचे राजकीय नेते रोज करत असतात हे मला माहिती आहे. पण भारताच्या एखाद्या मोठ्या राजकीय नेत्यानी हातात झाडू घेऊन रस्ता झाडतानाचा फोटो हा प्रतिकात्मक वागणुकीचा आणि विनोदाचाही कळस आहे.

अशा राजकारण्यांकडे सामान्य माणसानी जाण्याचा प्रसंग आला तर त्याला ठिकाण आणि वेळ कळवली जाते. तिथे गेलं की कळतं की, इथे खूप मोठा दरबार भरलेला आहे. अनेक लोकं तिष्ठत बसली आहेत. अनेकांची ये-जा चालू आहे. मनात प्रश्न असतो की, एवढ्या माणसांच्या देखत कसं बोलणार? तसं विचारावं तर उत्तर मिळतं, 'त्याला काय झालं, सगळी आपलीच माणसं आहेत. ज्या कामासाठी तो माणूस भेटला असेल त्याबद्दल कसलं तरी

आश्वासन मिळतं, चहा मिळतो, पण पुढे काहीही होत नाही.

असा दरबार हा सर्वांच्या देखत निःसंकोचपणी बोलण्याचा देखावा असतो. त्या देखाव्याचा अर्थ इथे भ्रष्टाचार नाही असा काढायचा असतो. खरी बोलणी, खरे व्यवहार बंगल्यावर, फार्म-हाऊसवर, सर्किट-हाऊसवर व्हायचे असतात. कोणाला तिकडे बोलवायचं याबद्दलचे निर्णय दरबारात होतात. त्याबद्दलच्या सगळ्या सूचना पी.ए.ला मिळतात.

राजकारण्यांनी सुरू केलेली प्रत्येक गोष्ट पैसे कमावण्याचं साधन असतं, याच्या मागचं कारण आपण समजू शकतो. मतदारांच्यात 3 गट आहेत असं मानूया. श्रीमंत आणि मध्यमवर्गीय मतदारांची संख्या फार कमी आहे. बाकीचे सगळे म्हणजे साधारण 85% मतदार फक्त पैशामुळे वळतात. वस्तू वाटणं, पैसे वाटणं यामुळे शेवटी जनतेची मतं मिळत असतील तर याचा अर्थ पैसे हीच खरी ताकद आहे.

सामान्यपणी व्यवस्था स्थापण्याचे तीन स्वाभाविक प्रकार असतात – 1) एखाद्या समर्थ व्यक्तीनी सर्वांची व्यवस्था पहावी. 2) अशा अनेक व्यक्तींनी एकत्र होऊन सगळ्यांची व्यवस्था पहावी. 3) सर्वांनी मिळून समान जबाबदारीनी आपली व्यवस्था करून घ्यावी. यापैकी सर्वांनी मिळून सारखी जबाबदारी घेण्याची कल्पना सर्वोत्तम असली तरी जगात कुठेही अस्तित्वात नाही. इतर दोन पद्धतींचे तऱ्हेतऱ्हेचे प्रयोग जगभर चालू आहेत, पण कोणाला मनाजोगी पद्धत अजून सापडलेली नाही.

भारतीय लोकशाही राजकारणामधे अनेकांनी अनेक दुरुस्त्या नेहमीच सुचवलेल्या आहेत. त्यातली एक महत्त्वाची सूचना मला अर्थपूर्ण वाटते. राजकारणातल्या लोकांनी विशिष्ट वयानंतर पदमुक्त व्हावं. समतोल बुद्धी बाळगणारा ज्येष्ठ न्यायाधीशही पासष्टाव्या वर्षी निवृत्त होतो. पण पंतप्रधानासाठी कोणताच नियम नाही. मंत्र्याची बुद्धी न्यायाधीशाच्या बुद्धीपेक्षा अधिक कुशाग्र असते का? अमुक वयानंतर पदावर राहू नये, अशी कोणतीही तरतूद आपल्या संविधानात नाही. असं का, हे मला अजून कळलेलं नाही. फक्त राजकारणी लोकांनीच वय कितीही झालं तरी पदाला चिकटून माथेफोड का करत रहावी? खरं म्हणजे 60 वर्षांवरच्या कोणाही व्यक्तीनी निवडणुकीत उभं राहू नये. यामुळे 65 वर्षांचं होईपर्यंत सर्वजण आपोआप निवृत्त होतील.

असा कायदाच केला पाहिजे असं नाही, परंतु अशी प्रथा पडली पाहिजे,

अशी परंपरा निर्माण झाली पाहिजे. निवडणुकीत मत देण्याचा अधिकार 21 व्या वर्षापासून मृत्यूपर्यंत रहावा, परंतु उमेदवार म्हणून उभं राहण्याचा हक्क 60 वर्षांपर्यंतच असावा. एवढं झालं तरीही आजच्या राजकारणातल्या अनेक अडचणी दूर होतील.

सुशिक्षित मध्यमवर्गीय किंवा सधन माणसाला कष्टकऱ्यांची वागणूक बेपर्वाईची वाटते. त्याचं कारण शोधायला लागलं की, त्यांना जीव जगवण्याची मूलभूतच काळजी आहे हे समोर येतं. भारताच्या आर्थिक इतिहासात अशी व्यवस्था आढळते की, पैसेवाला अधिक श्रीमंत होत जातो आणि गरीब आणखी आणखी गरीब होत जातो.

राजकारणातल्या माणसाला जनतेचे खरे प्रश्न सोडवणं शक्य नसल्यामुळे प्रश्न सोडवत असल्याचा देखावा करण्याखेरीज दुसरा काय इलाज आहे? निरनिराळे दिवस, सप्ताह साजरे करणं हा त्यातला भाग आहे. सौजन्य सप्ताह, आरोग्य सप्ताह या शब्दामधला विनोद लोकांच्या लक्षात येईनासा झाला आहे. सौजन्य, आरोग्य या गोष्टी सतत वर्षभर करण्याच्या असतात. त्याचा सप्ताह म्हणजे मग बाकीचे 51 आठवडे उद्धटपणा, अनारोग्य यासाठी मोकळे समजायचे का?

भारताचा खरा मोठा प्रश्न प्रचंड लोकसंख्या हा आहे, हे खरं आहे. प्राप्तीमधली विषमता, गरीब लोक रोज आणखी गरीब आणि असहाय होत जाणं हे तेवढंच गंभीर आहे.

अनेक जाणकार म्हणतात की, भारतात केवळ पैसे हे एकच हत्यार उपयोगी पडतं. लोकसंख्या नियंत्रणासाठी पैशाचाच दंडुका वापरावा लागणार. भारतीय नागरिक असला की तो कुठच्याही धर्माचा असला तरी त्याला किती मुलं व्हावीत यावर अंकुश हवाच. अंकुश म्हणजे दंड. प्राप्ती कितीही असो, त्याला 2 च्या वर मुलं झाली की कर भरायला लागणार. या नियमातून जुळ्या मुलांच्या जन्माला फक्त सवलत असायला हवी. असं म्हणतात की, या प्रकारचे प्रयोग जगात झालेले आहेत. त्या देशांच्यात एकच ओरड होती की, ही व्यक्तिस्वातंत्र्यावर गदा आहे. ही तर थेट साम्यवादी 'कम्युनिझम'ची वाट आहे.

मगाशी उल्लेख केल्याप्रमाणे दुसरी अडचण म्हणजे 'आहे रे' आणि 'नाही रे' मधली दरी प्रचंड होत चालली आहे. या परिस्थितीचं सगळं मूळ राजकारणात आहे. काही विचारवंत म्हणतात की, यासाठी एकच उपाय आहे, राजकारणात

प्रत्यक्ष प्रवेश करणं. अनेक वर्षांपूर्वी मी आणि शोभा 'सुसंवाद' नावाचा अभ्यासगट चालवायचो. त्यामधे नेहमी लक्षात यायचं की, बहुतेकांचा कुठच्यातरी राजकीय पक्षाला पाठिंबा असतोच. आम्ही दोघंच त्याला अपवाद होतो. अजूनही आम्ही कुठच्याच राजकीय पक्षाचे नाही.

आजचे मुख्यमंत्री आणि पूर्वीचे राजे यात काय फरक आहे ते पाहूया. पहिला फरक हा की, पूर्वी राजे मृत्यूपर्यंत राज्य करीत, आताचे मुख्यमंत्री पाच वर्षंच राज्य करतात. पाच वर्षांनंतर त्याला लोकांनी पुन्हा निवडून दिलं तर तो आणखी पाच वर्षं राज्य चालवील. दुसरा फरक म्हणजे पूर्वी राजाचा मुलगा त्याच्या मागून गादीवर बसायचा. आता मुख्यमंत्र्याचा मुलगा तसं करू शकत नाही. बाकीच्या चौकटीत यापलीकडे काहीच फरक झालेला नाही.

नीट विचार केला तर कळतं की, आजच्या काळातली पाच वर्षं जुन्या काळच्या पन्नास वर्षांच्या बरोबरची आहेत. पूर्वीच्या काळी राजाचा हुकूम देशात सगळीकडे पोहोचायलाच दोन-चार वर्षं लागायची. दरम्यान परिस्थिती बदलली तर राजा दुसरा हुकूम सोडत असे. तो पोहोचायलाही तेवढा वेळ लागायचाच. त्यामुळे राजे केवळ नाममात्र राजे असत. प्रजेच्या जीवनाचं फार मोठ्या प्रमाणात ते नियमन करू शकायचे नाहीत. लोकांना बरंच स्वातंत्र्य होतं.

आजची परिस्थिती वेगळी आहे. आज दिल्लीहून हुकूम सुटल्यावर त्याच दिवशी तो पूर्ण देशात सर्वत्र पोहोचतो. रेडिओ, टीव्ही वगैरे साधनं आज असल्यामुळे हुकुमाच्या अंमलबजावणीची तयारी केवळ दोन तासात होऊ शकते. हीच स्थिती इतर देशांचीही आहे. म्हणून हल्लीचा राजा म्हणजेच मंत्री पाच वर्षांकरताच जरी असला तरी पूर्वीच्या राजाला पन्नास वर्षांत करता आलं नसतं एवढं काम तो पाच वर्षांतच करू शकतो. आज पाच वर्षं राज्य करणं म्हणजे पूर्वीच्या राजांनी मरेपर्यंत राज्य करण्यासारखं आहे. एवढी सत्ता हातात असल्यामुळे आजच्या राज्यकर्त्यांना प्रजेचं कल्याण करायचं असलं तर कल्याण करता येतं आणि वाटोळं करायचं असलं तर तेही करता येतं.

प्रजेच्या हातात आज काहीच नसतं. प्रजेचं मत घेण्याचं नुसतं नाटक केलं जातं. त्याचा परिणाम म्हणजे राज्य करणारे म्हणतात की, आम्ही जे काही करतो, ते प्रजेच्या संमतीनीच करतो. पूर्वीचे राजे असं म्हणू शकायचे नाहीत. सध्या सरकार गोळीबार करतं तेव्हाही म्हणतं की, तो प्रजेच्या संमतीनीच केला आहे. लोकांनी आम्हाला राज्य चालवण्याची आज्ञा दिली आहे, त्यासाठीच हे सगळं

करावं लागतं. पूर्वीच्या राजांचे सरदार असं म्हणू शकायचे नाहीत. म्हणून सगळ्या पाप-पुण्याची जबाबदारी राजावर येऊन पडत असे. राजाला ते ओझं उचलावं लागायचं. पण आजच्या राजाचं जे पाप-पुण्य असतं, त्याची जबाबदारी तुमच्यावर आहे, जनतेवर आहे.

क्रांती म्हणजे अस्सल नवा विचार. सत्तेच्या किंवा पक्षीय राजकारणाच्या मार्गानी क्रांती कधीच होऊ शकत नाही. क्रांती पक्षातीतच असली पाहिजे. यासाठी एकमेकांसमोर हृदय मोकळं केलं पाहिजे. पण आजकाल तर एका पक्षाचे लोक दुसऱ्या पक्षाचं वृत्तपत्रही वाचत नाहीत. वैष्णवपंथी लोकांना ज्याप्रमाणे शैवपंथीयांची कोणतीही गोष्ट पटत नाही, त्याप्रमाणे हे पक्ष सतत एकमेकांना विरोध करत असतात. आपल्या पक्षाची पुस्तकं हेच त्यांचं वेदवाक्य असतं. दुसऱ्यांचं साहित्य ते वाचतच नाहीत. त्यामुळे त्यांचे विचार संकुचित होतात. हृदयंही संकुचित होतात. ही गोष्ट तर जास्तच अनिष्ट आहे. अशा स्थितीत क्रांती होऊच शकत नाही.

हवा पसरण्यासाठी अवकाशाची गरज असते, हेच लोकांच्या लक्षात येत नाही. विचार-प्रचारासाठी हृदयं मोकळी असली पाहिजेत. पक्षांच्या सभांमधे विशिष्ट समुदायांचेच लोक येतात. ते क्रांतीला अडवून धरतात. अशा तऱ्हेनी सत्तेच्या मार्गानी, पक्षीय राजकारणानी क्रांती होत नाही. पक्षीय राजकारण अगदी निरर्थक आहे. पूर्वी राजे लोकांमधे थोडीफार ईर्षा, मत्सर असायचा. पक्षीय राजकारणानी तर देशव्यापी मत्सर आणि ईर्षा बळावते.

पक्षीय राजनीतीनी लोकांचं रक्षण होतं ही समजूत भ्रामक आहे. लोक आहेत तसे अनाथच राहतात. आपलं संरक्षण आपण करू शकतो अशी धमक त्यांच्यात येतच नाही. आपण आपलं संरक्षण करू शकत नाही, आपसातील विवादाचा निवाडा करू शकत नाही, आपण आपला कारभार करू शकत नाही, असंच लोक समजू लागतात. जे काही करायचं ते सगळं निवडलेले प्रतिनिधीच करणार. पण हे प्रतिनिधी आहेत कोणाचे? आपलेच. शेवटी कोणालाही कशाला जबाबदार धरता येत नाही. कोणीही कशाची जबाबदारी घेत नाही.

याचा अर्थ, आपण मालक, आपले प्रतिनिधी म्हणजे आपले नोकर. नोकरच सगळं काही करू शकतात, आपण स्वतः मात्र काही करू शकत नाही! मी मालक असलो तरी मला तहान लागली आणि नोकर जवळ नसला तर मी पंधरा मिनिटं थांबीन. तो येईल आणि पाणी देईल तेव्हाच पिईन. तो वारंवार उशीर करायला लागला तर त्याला काढून दुसरा नोकर ठेवीन. पण पाणी मात्र

नोकर देईल तेव्हाच पिईन. कारण मी मालक आहे ना! पाणी आपण होऊन काही मी पिऊ शकत नाही. मालकानी स्वतः पाणी घेऊन प्यावं अशी या रचनेत सोयच नाही.

सारांश, आपण नाममात्र मालक आहोत. खरं म्हणजे, आपण गुलामच आहोत. म्हणायचं मालक त्याचा अर्थ मात्र गुलाम. गरिबाच्या मुलीचं नाव लक्ष्मी असावं, निर्बुद्ध मुलीचं नाव सरस्वती असावं, तसंच हे लोकशाही नाव आहे. जनता मालक आहे आणि ती आपले नोकर निवडते. पण हातानी पाणी घेऊन पिण्याचा अधिकार तिला नाही. ही स्थिती केवळ आपलीच नाही, सगळ्या जगात साधारण अशीच स्थिती आहे. आमची तुमची, म्हणजे भारतीय जनतेची परिस्थिती नक्की अशी आहे.

आपण आपला कारभार चालवत नाही. तो चालवता येईल असा विश्वास आपल्यामधे नाही. या नोकरांवर आपला अधिकार चालत नाही. राजा मूर्ख आणि प्रधान चतुर असला तर मग राजाला शेंडी असो की दाढी, ती राहते प्रधानाच्याच हातात. राजा मग नावाचाच राजा असतो. भारतातल्या लोकशाहीची स्थिती अशा राजासारखी आहे. लोकशाहीच्या नावावर नोकरशाही चालू आहे. लोकशाहीचं नाव घेऊन आपण सत्ता मूठभर लोकांच्या हाती सोपवतो. लोकशाही हेच प्रत्यक्षात एकतंत्री राज्य बनतं. एकतंत्री राज्यात जुलूम करून सत्ता गाजवली जाते. या लोकशाहीत मतपेटी माध्यम बनते. सत्ता एक तर पैशानी खरीदली जाते किंवा शास्त्रज्ञाच्या मार्फत खरीदली जाते. शास्त्रज्ञ हाती आले याचा अर्थ अणुबाँब हाती आला. अणूबाँब हातात ठेवून ही लोकशाही साम्यवादाच्या नावावरही चालते. साम्यवादी लोक म्हणतात की, सत्ता शेवटी नष्ट होईलच, पण तोपर्यंत ती मजबूत असली पाहिजे.

सारांशात, राजकारणाचे सगळे प्रकार – लोकसत्ता, राजसत्ता, कल्याणकारी राज्य, साम्यवाद, हे सगळे आपली सत्ता जास्तीत जास्त मजबूत कशी होईल, याचाच विचार करत असतात.

लोकशाहीची प्रक्रिया अत्यंत क्लिष्ट आहे, म्हणून सरकारी नोकरांची संख्या प्रचंड वाढते. असं होऊ नये यासाठी विकेंद्रित लोकशाहीची आवश्यकता आहे. प्रतिनिधींच्या मार्फत समाजाचं कल्याण करण्यात येईल असा सध्याच्या लोकशाहीचा दावा आहे. पण तो खरा नाही.

आज लोकांचा सत्तेवर अंधविश्वास बसलेला आहे. भगवान बुद्धांच्या हातात

आधी सत्ता होती, तरीही ते सत्ता सोडून बाहेर पडले. सत्तेनी जर सामाजिक, धार्मिक, आर्थिक किंवा अध्यात्मिक क्रांती होऊ शकत असती, तर हातातली सत्ता सोडून ते बाहेर पडले असते का? सत्तेनी समाज परिवर्तन होत नाही, हे भगवान बुद्धांनी जाणलं होतं. आज जग त्यांना मूर्ख समजत नाही, उलट त्यांचे उपदेश आचरणात आणावेत असंच सर्वजण मानतात. पंडित नेहरू तर म्हणायचे की, भगवान बुद्ध भारताचे श्रेष्ठ नागरिक आणि सर्वाधिक बुद्धिमान पुरुष होते. कारण बुद्धांनी आपणहून सत्तेचा त्याग केला. सध्या राजकारणातल्या सर्वांच्या मनात सत्तेबद्दल इतका हव्यास आहे की ती त्यांना जणू जखडून ठेवत आहे.

पक्षीय राजकारण जिथे चालतं तिथे एका पक्षाच्या हातात सत्ता असते, दुसऱ्या पक्षाच्या हातात नसते. त्या पक्षाला सत्ता मिळवायची असते. म्हणून मग त्यांची भांडणं चालतात. दोन्ही पक्ष सत्तापूजक असतात. सत्तेच्या केंद्रबिंदूभोवतीच त्यांच्या लटपटी चालू असतात. सत्ताधारी पक्ष आपले गुण तिखट-मीठ लावून सांगत असतो, तर विरोधी पक्ष त्याचे दोष दाखवत असतात. सत्ताधार्जिणेपणामुळे दोघंही एकमेकांचे दोष काढण्यात आणि स्वतःचं गुणगान करण्यातच व्यग्र असतात. याचा परिणाम म्हणजे जनतेचे सेवक कोणीच राहात नाहीत. प्रत्येक जण म्हणतो की, आमच्या हातात सत्ता आली तर आम्ही तुम्हाला स्वर्गात घेऊन जाऊ आणि दुसऱ्या पक्षाच्या हाती सत्ता गेली तर ते तुम्हाला नरकात नेतील. स्वर्ग आणि नरक तुमच्याच हातात आहेत, तुम्हाला तिथे तुमच्याखेरीज कोणी नेऊ शकत नाही, हे मात्र कोणीच सांगत नाही.

जोपर्यंत अशा गोष्टी चालत राहतील, तोपर्यंत कोणतीही समस्या सुटणार नाही, व्यक्तिस्वातंत्र्य मिळणार नाही, शांततेचं वातावरण निर्माण होणार नाही. आज सगळीकडे भीती पसरलेली आहे. स्वराज्याचं एकही लक्षण सध्या दिसत नाही. लोक अगदी अनाथ दिसतात. राजकीय पक्षातले जाणकार लोक पक्षाचं काम सोडून दुसरं काही करत नाहीत. कोणत्याही कामासाठी एकत्र येऊन जनतेच्या भल्याचं काम करणं त्यांना माहीत नाही.

काही राजकीय व्यक्तींबद्दल आमचं चांगलं मत आहे, पण तेवढे अपवाद सोडले तर बाकी सगळे राजकारण नावाचा धंदा चालवतात. ज्यामधे नफा होईल ते करतात.

पूर्वी मी आणि शोभा मतदान केंद्रावर मत देण्याच्या हेतूनी जायचो. त्यातल्या त्यात लायक उमेदवाराला मत द्यायचो. पण खरोखर मनाजोगा

उमेदवारच सापडायचा नाही. त्याच्यापुढे नंतर आमचा पत्ता बदलला आणि आम्ही नव्या मतदारसंघात राहायला आलो. सरकारी अकार्यक्षमतेमुळे मतदार यादीमधून आमची नावं सापडेनाशी झाली. मत कोणाला द्यायचं हा प्रश्न आपोआप सुटला. काही वर्षांनंतर आता मतदार यादीत आमची नावं आहेत, पण कोणाला मत द्यावं याबद्दलचा संभ्रम अजूनही तसाच आहे.

अनेक निरनिराळ्या लेव्हल्सचे राजकारणी असतात. राज्यमंत्री आणि त्याच्या वरच्या सगळ्या लेव्हल्सना खूप सिक्युरिटी असते. त्यांच्या तैनातीला खूप पोलीस द्यावे लागतात. अनेक गाड्या पुढे, पाठीमागे असतात. सुरक्षित प्रवासाचा हा एक मार्ग आहे. पण मी असं ऐकलं की, सुरक्षित प्रवासासाठी इतरही अनेक मार्ग आहेत. त्या मार्गांचा अभ्यास करताना आपले पोलीस दिसत नाहीत. राजकीय पुढारी येणार म्हणून त्या विभागातले रस्ते अकस्मात बंद करणं हा जनतेवर अन्याय आहे. खुद्द मी सुद्धा अनेक वेळेला अशा कारणामुळे खोळंबलेलो आहे.

भारतामधले काही पक्ष आक्रमक असतात तर काही निष्क्रीय असतात. व्यक्तीविषयी विचार करताना जसा आग्रही माणूस चालतो, कारण त्याचा आग्रह स्वतःपुरता असतो, दुसऱ्याबद्दल नसतो. आक्रमक माणूस मात्र असह्य होतो, कारण तो दुसऱ्याच्या कृतीबद्दल आग्रही असतो. त्याच तऱ्हेनी आक्रमक पक्ष देखील मला स्वतःला योग्य वाटत नाहीत.

राजकारणाच्या पक्षीय वातावरणात आणखी एक चुकीची गोष्ट नेहमी घडते. सत्ताधारी पक्ष निवडणुकांमुळे बदलला तर आधीची पद्धत बदलणं त्या पक्षासाठी आवश्यक बनतं. जे आधी असेल त्याची मोडतोड, बदलाबदल केलीच पाहिजे असं पक्षातल्या अंतर्गत बैठकीत ठरतं.

एक सामाजिक कार्यकर्ता म्हणून मला एक गोष्ट फार चुकीची वाटते. प्रत्येक माणसाला कुठचंही काम नीट सक्षमपणी करण्यासाठी त्याचं प्रशिक्षण पाहिजे, असं माझं मत आहे. जीवनसाथ अभ्यास मंडळ चालवताना नेहमी एक विषय निघतो. इतर कुठचंही महत्त्वाचं काम करताना त्या विषयाचं शिक्षण घ्यावं लागतं. डॉक्टर्स, वकील, आर्किटेक्ट, इंजिनीयर, टॅक्स कन्सल्टंट असा व्यवसाय करणाऱ्या प्रत्येकाला त्यातलं औपचारिक शिक्षण घेणं सक्तीचं असतं.

संसारात याला दोन अपवाद आहेत. लग्न करण्यासाठी आणि मुलाला जन्माला घालण्यासाठी शिक्षणाची कायद्यानी जरूर नाही. जीवनसाथ अभ्यास

मंडळ आणि पालक विद्यापीठ या दोन कामांमुळे निदान त्याची थोडी तरी सोय आहे असं म्हणता येईल.

आणखी एक महत्त्वाचा धंदा म्हणजे बिल्डर बिझिनेस. शिक्षणाची कसलीच अट नाही. त्यामुळे काय घोटाळे होतात हे तर आपल्याला माहितीच आहे. पण या सर्व गोष्टींवर कडी म्हणजे राजकारणाचा धंदा. शिक्षणाची अट नाही. राजकारणी लोक ज्यांना आपल्या तालावर नाचवतात त्या लोकांना, म्हणजे आय.ए.एस. लोकांना शिक्षणाची सक्ती असते, पण त्यांना नाचवणाऱ्याला काही सक्ती नसते. परिणाम आपण बघतोच. राजकारण्यांचा शैक्षणिक दर्जा जेमतेम, त्याचबरोबर सांस्कृतिक दर्जाही जेमतेम असतो. अर्थात, काही अपवाद असतात. पण बाकीचे?

या अशा परिस्थितीमुळे मला आणि शोभाला हा निर्णय घेणं सोपं गेलं. आम्हाला सारांशात समजलं आहे ते असं आहे.

‘राजकारण म्हणजे लोककल्याणाचा देखावा आणि अभिनय आहे’, पुढचा मार्ग ठरवणं सोपं होतं. त्यामुळे नाइलाजानी जेवढा अगदी थोडा राजकारणाशी संबंध येतो, तेवढा आम्ही मान्य करतो.



# 10

# निवडणूक

सध्याची निवडणुकीची पद्धत आपण पाश्चिमात्यांकडून घेतली आहे. भारत देशात जातिभेद आज जेवढा बोकाळलेला आहे, तेवढा पूर्वी कधीही नव्हता, हे आपण पाहतच आहोत. बिहारमधे भूमिहार-राजपूत, आंध्रात कम्मा-रेड्डी, मद्रासकडे ब्राह्मण-ब्राह्मणेतर असे अनेक प्रकारचे भेद प्रत्येक प्रांतात वाढलेले आहेत. ज्या जातिभेदावर राजा राममोहन रॉयपासून महात्मा गांधींपर्यंत सर्वांनी प्रहार केले आणि जो जातिभेद मोडकळीस आला होता, तो आज इतका का वाढतोय? निवडणुकांनी जातिभेदाला प्रोत्साहन दिलं आहे, हेच याचं कारण आहे. निवडणुकांचा जर एवढा भयानक परिणाम होत असेल तर त्यांच्या पद्धतीत बदल करणं अत्यंत आवश्यक आहे. जातिभेदाची वाढ हा निवडणुकांचा पहिला दुष्परिणाम आहे. निवडणुकीची पद्धत याबद्दलदेखील मला विनोबाजींच्या लिखाणातून खूप गोष्टी कळल्या. जेव्हा जमेल तेव्हा मी त्यांचं आणखी साहित्य वाचीन.

जातिभेदासोबत धर्मभेदही आहे. जातिभेद, धर्मभेद, पक्षभेद यांची तिहेरी दोरी वळली गेली आहे. तीन धाग्यांची मिळून बनवलेली दोरी मजबूत असते, असा सिद्धांत आहे. वैज्ञानिकदृष्ट्या हे खरं आहे. जातिभेद, धर्मभेद आणि पक्षभेद वळून बनलेल्या दोरींनी खरं म्हणजे आपल्या गळ्याला फास लावला आहे. याखेरीज भारतात निरनिराळ्या बुवा महाराजांचे निरनिराळे पंथ आहेत.

पक्षभेदामुळे जातिभेद आणि धर्मभेद नाहीसे झाले असते आणि तोच एक भेद राहिला असता, तरीही परवडलं असतं. इंग्लंडमधे पक्षभेद आहे; तिथे बहुमतापुढे अल्पमताचं चालत नाही. तरीही तिथे अल्पमत शक्तिशाली असतं, कारण तिथे जातिभेद नाही. इंग्लंडमधे पूर्ण देशात एकच जात आणि एकच धर्म आहे. भाषाभेदही नाहीत. म्हणून तिथे पक्षभेदांमुळे तेवढं नुकसान होत नाही.

भारतात होतं. पक्षांकडे काही ना काही विचार असतोच. परंतु आज आपल्याकडे काय चाललं आहे? निवडणुकीत उमेदवार उभे करताना जातींच्या बलाबलाचाच विचार केला जातो. त्याशिवाय गती नाही. भारतात जातिभेद, धर्मभेद, भाषाभेद होतेच; त्यातच हा नवा जोमदार पक्षभेद दाखल झाला. यामुळे भारताची दशा अतिशय भयप्रद झाली आहे.

निवडणूक मोहिमेच्या दिवसांत असं वाटतं की, हे निवडणूक-प्रचारक जणू सगळीकडे आगी लावत फिरले आहेत. तिथे मग कोणतंही चांगलं सामाजिक काम उभं करणं कठीण जातं.

निवडणुका होतात. पण जे लोक उभे असतात, त्यांचे चेहरेही आपण आधी पाहिलेले नसतात. लाखो मतदारांकडून ज्यांची निवड व्हावयाची, अशा उमेदवारांचे गुण माहीत असणं तर सोडाच, त्यांचे चेहरेही माहीत नसतात. अशा प्रकारच्या निवडणुकांनी खर्च वाढला आहे, जातिभेद वाढत आहे आणि चांगली माणसंच निवडून येतील याचा काहीच भरवसा राहिलेला नाही. आजकाल देशात बहुमतवाले आणि अल्पमतवाले असे दोन पक्ष निर्माण झाले आहेत. हा एक वेगळ्या प्रकारचा जातिभेदच आहे. जातीचा विचार करून उमेदवार उभे केले जातात. त्यामुळे विचार समजावून सांगणं, तो अमलात येण्याबाबत धीर धरणं, त्याबद्दल प्रश्नोत्तरं, चर्चा होणं ही गोष्टच उरलेली नाही.

पूर्वी तलवारीच्या जोरावर निर्णय लादले जायचे तसेच आता तलवारीऐवजी बहुमताचं अस्त्र वापरतात. तलवारीला स्वतःची बुद्धी नसते, म्हणून आधुनिक विचारानी तलवारीचा त्याग केला. पण बुद्धीचा शहाणपणा तर बहुमतातही नसतो. हात मोजून निर्णय घेणंही चुकीचंच आहे. त्यामुळे असंतोष निर्माण होतो. प्रत्येकजण एकमेकाला पाडण्याचा प्रयत्न करतो. यावरच आज सगळी उभारणी झाली आहे. सगळ्या देशांमधे हेच चाललं आहे, कारण सगळीकडे हात मोजणंच सुरू आहे. त्या हातांमागे काही बुद्धी आहे की नाही, हे पाहिलं जात नाही. मनोरुग्णांना मताचा अधिकार दिला नाही एवढीच मेहरबानी आहे. या सगळ्यावर उपाय शोधण्याऐवजी पक्षभेद, सरकारी पक्ष, विरोधी पक्षातला अखंड विरोध, ही सगळी पाश्चात्त्यांची पद्धत आपण भारतात सुरू ठेवली तर त्यानी काही साधणार नाही. एक पक्ष दुसऱ्या पक्षाचं काम बिघडवत राहील.

पंतप्रधान पंडित नेहरूंनी स्वतःच सांगितलं की, 'जरी आम्ही निवडणूक पद्धत श्रद्धेनी स्वीकारली असली तरी तिच्यात अनेक दोष आहेत. ते सुधारणं

आवश्यक आहे.' पश्चिमेकडून कोणतीही गोष्ट नीट विचार करूनच स्वीकारली पाहिजे. जगातल्या सगळ्या देशांच्या मानगुटीला हे निवडणुकीचं भूत बसलं आहे आणि त्यामुळे फार नुकसान होत आहे. भारतात तर याचा परिणाम अत्यंत दुःखद होत आहे. जे लोक निवडून येतात ते 'मत-उन्मत्त' होण्याची शक्यता नेहमीच असते.

सगळा कारभार बहुमताच्या आधारावर चालेल, असं सध्याची निवडणुकीची राज्यपद्धती म्हणते. गेल्या शतकात इंग्लंडमधे एक तत्त्वज्ञान निर्माण झालं. ते म्हणजे 'अधिकात अधिक संख्येचं अधिकात अधिक कल्याण.' म्हणजेच 'बहुसंख्य लोकांसाठी अल्पसंख्य असणारांच्या हिताचं बलिदान करायला हरकत नाही,' असं चुकीचं तत्त्व त्यातून निघालं. युरोपात समाजशास्त्राचं जे मंथन झालं, त्यातून हे हलाहल निघालं. काय म्हणणार यावर?

मागे मी जनमानस प्रतिष्ठान या संस्थेतर्फे जनमानस वार्तापत्र चालवायचो, हे मी तुम्हाला सांगितलं. भारतातल्या निवडणूक पद्धतीत मला अनेक दोष दिसत होते, अजूनही दिसतात. प्रत्येक भारतीय माणसाला एक 'आयडेंटिटी कार्ड' असावं असे प्रयत्न अनेक वर्षापासून चालू आहेत. 'कॉम्प्युटरायझेशन'मधे भारत बऱ्यापैकी तयार आहे. या सगळ्या गोष्टींची कल्पना करून मी त्या वार्तापत्रात एक कल्पना मांडली होती ती इथे सांगतोय.

प्रत्येक सज्ञान नागरिकाकडे त्याचा फोटो आणि 'कोड' असलेलं 'आयडेंटिटी कार्ड' असेल. जगातल्या कुठच्याही कोपऱ्यातून तो कॉम्प्युटरवर आपलं मत नोंदवू शकेल. त्या पद्धतीत एका माणसाला दोनदा मत देता येणार नाही, त्यामुळे बोटावर शाईची जरूरच नसेल. ज्यांना कॉम्प्युटर वापरता येत नसेल त्यांच्यासाठी जगभरातल्या कुठच्याही बँकेत, एटीएममधे त्यांना मदत मिळण्याची सोय असेल. अनेकांना ही कल्पना आवडली होती. यात 'बूथ कॅप्चरिंग' शक्य नाही. अडचण फक्त एवढी व्यवस्था भारत सरकार कार्यक्षमतेनी करू शकेल का नाही, या शंकेची होती. ती शंका अजूनही खरी आहे हे आधारकार्ड प्रकरणानी एकदम सिद्ध केलं. कशाचीही व्यवस्था आणि तीही भारत सरकार करणार म्हटलं की माझ्यासारख्या व्यवस्थापनशास्त्रातल्या व्यावसायिकालाच काय कोणालाही अंगावर काटा येतो. काही दिवसांपूर्वी वर्तमानपत्रात बातमी वाचली की 'रिमोट व्होटिंग' या कल्पनेचा विचार पुन्हा चालू झाला आहे. चांगलं वाटलं. नकारात्मक मताचीही सोय ही तर फारच अर्थपूर्ण आणि उपयोगी कल्पना आहे.

अनुभवावरून ही गोष्ट कबूल केली पाहिजे की, जिथे चांगलं काम करायचं

असेल तिथे निवडणूक होता कामा नये. याचा अर्थ काय? बहुमतात असणाऱ्यांनी सत्ता हातात घेऊन सेवा करावी ही पद्धत योग्य असली तर स्थानिक संस्थांमधेही तसंच का होऊ नये? ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे. निवडणुकीची पद्धत भारतात हितकारक नाही. ज्याच्याजवळ खूप पैसा आहे तोच या प्रकारच्या निवडणुकीत उभा राहू शकतो. अशा स्थितीत गरीब, मूक जनतेचा आवाज कसा ऐकू येणार? बहुसंख्य म्हणजे लक्ष्मी, शक्ती आणि सरस्वती यांचा वाटा जिला बेताचा लाभलेला आहे अशी कष्टकरी सामान्य जनता. परंतु आज तर सत्ता शस्त्रसज्ज लोकांच्या हातात, विद्वानांपाशी किंवा श्रीमंतांपाशी आहे. आम जनतेजवळ सत्ता नाही, कारण तिच्याजवळ ना शस्त्र आहे, ना शास्त्र, ना संपत्ती. आजची निवडणूक पद्धतच अशी आहे की, सामान्य बुद्धीचे लोकच निवडून येऊ शकतात, ही गोष्ट आपण नीट समजून घेतली पाहिजे. सर्वोत्तम लोक निवडून येऊच शकत नाहीत. तो लोकशाहीचा शाप आहे.

सज्जन लोक वाटेल तेवढा पैसा खर्च करू शकत नाहीत. स्वतःची प्रशंसा आणि दुसऱ्याची निंदाही ते करू शकत नाहीत. आणि या गोष्टींशिवाय कोणाला मतं मिळू शकत नाहीत. निवडणुकीत या तीनही गोष्टी कराव्या लागतात. सर्वोत्तम लोक हे सगळं करू शकत नाहीत. शिवाय त्यांचा जाहीरनामा कोणाला मान्य होणार नाही. समजा, एखादा विचारवंत निवडणुकीला उभा राहिला आणि जाहीर केलं की निवडून आल्यावर सैन्य ठेवणार नाही. तर लोक त्याला हात जोडून म्हणतील, 'आम्ही तुमचं व्याख्यान ऐकू, पण तुम्हाला मत देणार नाही. तुम्ही पूजनीय आहात, पण आमच्या कामाचे नाही.' सारांश, सर्वोत्तम लोक निवडणुकीत भाग घेऊ शकत नाहीत. त्यांनी फार तर लोकशाहीच्या स्वरूपाविषयी विचार करावा. जे लोक निवडून येतील, त्यांचं शील, चारित्र्य कसं असलं पाहिजे याचं शिक्षण त्यांनी द्यावं, लोकमत जागृत करावं. सामाजिक प्रबोधनाचं काम करावं. बाहेर राहून आवाज उठवल्यानीच जनेतवर त्यांचा प्रभाव पडेल. सारांश, सत्तेत कोणतेही पक्ष असले तरी निवडून येणाऱ्यांचा दर्जा सामान्यच राहणार आहे.

मतदानाचा सध्याचा जो प्रकार आहे, यात एक गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे. यात मत देणारावर कसलीही जबाबदारी नसते, मत मागणाऱ्यावरच जबाबदारी असते. आपण मत देतो आणि एखाद्या पक्षाच्या डोक्यावर जबाबदारी टाकून देतो. आता हे पक्षवाले लोकांचं सहकार्य मागतात तेव्हा लोक म्हणतात, 'आम्ही तर आमचं सहकार्य केव्हाच देऊन टाकलं आहे. मतं देऊन तुमच्या

हातात सत्ता सोपवली आहे ना? मग आता पुन्हा कसलं सहकार्य मागता? आणखी कोणतं सहकार्य हवं आहे तुम्हाला?

तुम्ही अयोग्य ठरलात तर दुसऱ्यांना निवडून पाठवू. तुम्ही योग्य आहात की नाही, एवढंच सिद्ध करा. आम्ही तर तुमच्या हातात पूर्ण सत्ता सोपविली आहे. तुम्ही तुमच्या पसंतीची माणसं नेमू शकता, त्यांच्यावर नियंत्रण ठेवू शकता, योजना तयार करू शकता. आम्हाला जे करायचं होतं ते आम्ही केलं. आता आम्ही बरे आणि आमचं काम बरं. आम्हाला मुलंबाळं आहेत, कामधंदा आहे. त्यांच्याकडेही आम्ही लक्ष द्यावं की नाही? एक काम मात्र तुमच्यासाठी नक्की करू. तुम्ही आमचं काम नीट केलं नाही तर तुम्हाला पदावरून काढून टाकू. हेच आमचं सहकार्य. आणखी आम्ही काय करू शकणार? आता तर आम्ही जे काम तुमच्यावर सोपविलं आहे ते तुम्हाला करायचं आहे.' अशा तऱ्हेनी हे मत आपलं कर्तव्य दुसऱ्यावर सोपवून देणारं आहे. अर्थात, हे मत निष्क्रिय आहे.

या औपचारिक लोकशाहीत निवडणुकीचं यंत्र उभं करण्यात आलं आहे. लोकशाहीची मागणी आहे की, राज्यकारभारात प्रत्येकाचा सहभाग असला पाहिजे; म्हणून प्रत्येकाचं मत घेतलं पाहिजे आणि त्यांची गणती झाली पाहिजे. निसर्गानी अशी काही समानता निर्माण केलेली नाही की जिच्या आधारे प्रत्येक मनुष्याला एक मत असण्याचं समर्थन करता येईल. पण सध्याच्या निवडणूक पद्धतीत हे स्पष्ट आहे की, पंतप्रधानांना एक मत आहे आणि त्यांच्या शिपायालाही एक मत आहे.

पूर्वी राज्य चालवण्यासाठी सैन्य गोळा करावं लागायचं. आता लोकशाहीत मतं गोळा करावी लागतात. 21 वर्षांवरच्या सगळ्या व्यक्तींना मताधिकार मिळालेला आहे. 21 वर्षांवरचा प्रत्येकजण शहाणासुरता झाला आहे, असं जबरदस्तीनी ठरवलेलं आहे. आता तो बिचारा म्हणतो, 'मी मत कोणाला देऊ?' तेव्हा त्याला सांगण्यात येतं, दोन-चार पक्ष आहेत, 'एक आहे अमुक, दुसरा आहे तमुक आणि तिसरा आहे ढमुक. त्यांची मतं अशी-अशी आहेत. आता ठरव कोणाला मत द्यायचं ते.' तो बिचारा घाबरून जातो. 'कोण श्रेष्ठ हे ठरवण्याइतका मोठा तर मी नाही!' पण सांगण्यात येतं की, 'झालास तू मोठा! तू 21 वर्षांचा झालास. आता तुला लहान राहू देणार नाही.' आणि मग अशा लोकांना धरून-पकडून मतदानासाठी नेलं जातं.

राजस्थान, बिहारमधल्या बऱ्याच स्त्रिया पडद्याआड कैद आहेत. या स्त्रिया तर लग्नानंतर घरात शिरतात आणि जीवन संपवूनच बाहेर निघतात. अशा स्त्रियांना कसंतरी समजावून, मोटर-गाड्यांमधे बसवून मतदान-केंद्रांवर नेतात आणि ज्यांना बाहेरच्या जगाची कसलीही माहिती नसते, त्यांना मत द्यायला सांगतात. शेकडा पन्नास मतं तर या पडदानशीन स्त्रियांचीच असतात. एक दिवस खाऊ-पिऊ घालतात, मोटारीतून नेतात, परत आणून सोडतात आणि काहीतरी सांगून मतदान करवतात.

जेव्हा सगळी सत्ता केंद्रित आहे आणि ती मूठभर लोकांच्या हाती आहे, तेव्हा भारतात आज लोकशाही आहे आणि सत्ता लोकांच्या हातात आहे, असं कसं म्हणता येईल? मतदानाचा अधिकार मिळाला म्हणजे खरोखरच सत्ता तुमच्या हातात आली का? कलकत्त्यात गाईंच्या रक्ताच्या नद्या वाहतात, तेव्हा तिथले लोक त्या गोष्टीला अनुकूल आहेत असं समजता येईल का? उत्तरप्रदेशात गोहत्याबंदी आहे. उत्तरप्रदेशातलं लोकमत बंगालपेक्षा वेगळं आहे का? खरं म्हणजे, लोकमताचा काही प्रश्नच नाही. बंगालमधे तिथल्या मुख्यमंत्र्याच्या विचारानुसार काम चालतं, उत्तरप्रदेशात तिथल्या मुख्यमंत्र्यांच्या मर्जीप्रमाणे काम चालतं.

याचा अर्थ हा की, मुख्यमंत्री चांगला असेल तर राज्य चांगलं चालतं, तो वाईट असला तर वाईट. मोगलांच्या काळीही असंच तर होतं. अकबर आला तर राज्य चांगलं चाललं, औरंगजेब आला तर वाईट चाललं. त्या काळी जसा लोकमताचा प्रश्न नव्हता, तसा आताही नाही. मतदानाचं ढोंग तेवढं चालू आहे.

आजकाल पुष्कळांना प्रत्येक गोष्टीत 'फाईट' करण्याची सवय झाली आहे. असं म्हटलं जातं की, पुढच्या वर्षी निवडणुकीची 'फाईट' आहे. खरं म्हणजे लोक निवडणुका लढतात का? निवडणूक तर खेळली पाहिजे.

मानसशास्त्रातल्या एका गोष्टीचा आणि निवडणुकीच्या प्रचार तंत्राचा मला खूप जवळचा संबंध दिसतो. सर्वसाधारण माणसाच्या स्मरणशक्तीबद्दल काही निरीक्षणं आहेत. इतर काही खास व्यवस्था न करता माणसाला जास्तीत जास्त 5 गोष्टी क्रमासकट लक्षात ठेवता येतात. त्या वस्तू का ठिकाणं का व्यक्ती, यामुळे काही फरक पडत नाही. समजा, जास्त मोठं सलग संभाषण असलं की काही लोकांना सुरुवातीचा भाग जास्त आठवतो. काहींना शेवटचा भाग जास्त लक्षात राहतो. शेवटचा भाग आठवतो अशी माणसं संख्येनी खूप असतात. अगदी थोड्या लोकांना मधला कुठचा तरी भाग जास्त लक्षात राहतो, कारण

त्यातला संदर्भ त्यांच्या मनाला भिडतो.

हे सांगण्याचा उद्देश असा की, प्रत्यक्ष निवडणुकीत मतदानाच्या दिवशी मतदाराच्या काय लक्षात रहातं यावर त्याचं मत कोणाला हे ठरतं. यामुळे निवडणुकीचा प्रचार अगदी शेवटीशेवटी आचारसंहिता लागू होण्याच्या अगोदरपर्यंत चालतो. वाईट भाग असा आहे की, कित्येक वेळा प्रचारात काय सांगितलं याचाही काही संबंध नसतो. कित्येक लोकांना प्रचार-सभांमधे काय सांगितलं ते कळत नाही. बहुतेक लोक त्यांचा म्होरक्या म्हणेल तसं करायचं असं ठरवून टाकतात. संबंध फक्त पैसे वाटण्याचा असतो.

अशा नेत्यांवर नियंत्रण ठेवण्यासाठी त्यांचा प्रचाराचा खर्च देखील निवडणूक आयोगाकडून तपासला गेला पाहिजे. त्यासाठी जनतेशी बोलून नेत्यांनी नोंद केलेले खर्चाचे आकडे खरे आहेत का नाहीत, याचं निराळं 'ऑडिट' पाहिजे. सुरुवातीला सगळे खोटेपणा करणार असं गृहितच धरावं लागेल. नेत्यांची खाजगी मालमत्ता जाहीर करण्याच्या प्रकरणात सगळं मॅनेज करण्यात त्या बिचाऱ्यांना इतकी धावाधाव करावी लागते की जनतेसाठी काही करायला वेळच उरत नाही. त्यात आणखी प्रचारावर झालेल्या खर्चाचा हिशेब द्यायचा आणि तो तपासला जाणार म्हटल्यावर लोकांसाठी काही काम करताच येणार नाही, अशी तक्रार नेते करतील. पण शेवटी 'जनतेचे सेवक' होण्यासाठी निवडणुकांना उभं राहायचं असेल तर एवढं करायलाच लागणार. या कल्पनेचा पाठपुरावा जनतेनी करायला हवा आहे. माहिती अधिकाराचा कायदा हे त्या दिशेनी टाकलेलं एक छोटं पाऊल आहे.

या पुस्तकसंचात 'जनमानस प्रतिष्ठान' या ट्रस्टचा उल्लेख अनेकदा आलेला आहे. मी जनमानसतर्फे एक अनियतकालिक चालवायचो. त्यासाठी एका मुद्यावर मी अनेकांशी चर्चा केली होती. ती मी मांडलेली कल्पना अशी होती. निवडणुकांपूर्वी काही दिवस आचारसंहिता लागू होते. तोपर्यंत सगळे उमेदवार यशाच्या आशेनी प्रचारासाठी दारोदार हिंडतात, रक्त आटवतात. हा आचारसंहिता लागू करण्याचा दिवस खूप अलीकडे खेचावा, खरं म्हणजे निवडणुका जाहीर झाल्या की लगेच आचारसंहिता लागू करावी, प्रचारबंदी असावी, अशी ती कल्पना होती.

ज्याला लोकांच्या हितासाठी काही काम करण्याची इच्छा आहे त्याला कोणी अडवलंय? वर्षाचे सर्व दिवस समाजकार्य करायची त्या व्यक्तीला

परवानगी आहेच की! या मुद्यांविषयी मी अनेकांशी बोललो, सगळ्यांना ही कल्पना अतिशय आवडली. मग मी ती जीवनसाथ अनियतकालिकात सविस्तर मांडली. त्याला प्रतिसादही चांगला मिळाला. अनेक लोक मला भेटून गेले. जनमानसच्या कामाचं कौतुक आणि माझं अभिनंदन करून गेले. पुढे मात्र मी त्याचा पाठपुरावा करू शकलो नाही. वर्तमानपत्रांनी पाठिंबा दिला नाही याचं कारण मला समजतं. प्रत्येक वर्तमानपत्रामागे कुठचातरी राजकीय पक्ष असतोच. आपल्या देशाचं दुर्दैव, दुसरं काय!



# 11

# राष्ट्र

एक गमतीचा भाग सांगतो. आपण जिथे राहतो त्यापलीकडे जग किती पसरलेलं आहे, याची एकेकाळी काही कल्पना नव्हती. पृथ्वी गोल आहे हे गॅलिलिओला सिद्ध करायला काही वर्षं लागली आणि जीव पण गमवावा लागला. राष्ट्र नावाची तर कल्पना तेव्हा नव्हतीच. नैसर्गिक सीमा एवढी एकच गोष्ट लोकांना सहज समजायची. नद्या, पर्वत, समुद्र याच्यामधला एक भाग म्हणजेच आपला भाग या कल्पनेच्या मर्यादा होत्या. काही तत्त्वचिंतक आकाशाचा अभ्यास करून पृथ्वीपेक्षा निराळे ग्रह आहेत असं म्हणत होते. त्याला सुद्धा लोकांचा विरोध होता. हळूहळू खगोलशास्त्र या कल्पनेच्या आसपास जाणारं असं अस्पष्ट शास्त्र जन्माला आलं.

त्या खगोलातला पृथ्वी हा एक ग्रह आहे हे सर्वमान्य व्हायला अनेक वर्षं लागली. त्यानंतर पृथ्वीवर अनेक खंड, नैसर्गिक विभाग हा विचार मान्य झाला. निरनिराळी राष्ट्रं ही कल्पना लोकांच्या आवश्यक तेवढ्या गरजा पूर्ण करण्यासाठी नियोजनाच्या दृष्टीनी उपयोगी होती. एखाद्या मोठ्या कुटुंबात एवढ्या लोकांची जबाबदारी तू घे, एवढ्या लोकांची मी बघतो अशी विभागणी व्यवस्थापनासाठी आवश्यक असते. त्याच अर्थानी काही भौगोलिक विभागांची जबाबदारी वाटून घ्यायची हे समजण्याजोगं आहे.

त्या विभागातल्या लोकांना एकमेकांविषयी आपुलकीच वाटली पाहिजे. ते विभाग मोठे झाले तरी मुळातली मायेची, अनुकंपेची भावना तशीच राहावी अशी कल्पना आहे. गावं, तालुके, जिल्हे, राज्यं या सगळ्या कल्पना केवळ व्यवस्थेसाठी केलेल्या विभागण्या आहेत. त्यामधे एकमेकांच्यात दुष्टावा निर्माण होण्याचं काही कारणच नव्हतं. शेजारशेजारच्या दोन राष्ट्रांच्यातही सहकार्य नि

मैत्रीच अपेक्षित होती. प्रत्यक्षात विचारांचं चुकीच्या भावनेत रूपांतर झालं आणि शेजारची दोन राष्ट्रं एकमेकांची शत्रू झाली. माणसामाणसात अनेक भेद निर्माण होऊन मूळच्या आपुलकीच्या भावनेपासून द्वेषापर्यंत जग पोहोचलं. दुसऱ्याशी माणुसकीच्या नात्यानी वागण्याऐवजी माणसं, जमाती, राज्यं, राष्ट्रं निर्दय बनली. आपण जेवढा इतिहास शिकलेलो असतो त्यात अनेक युद्धांच्या इतिहासाचा आपण अभ्यास केलेला असतो, तो आठवावा. राष्ट्र, राष्ट्रभक्ती या कल्पनांचं एकदम विकृत टोक म्हणजे ॲडॉल्फ हिटलर. जर्मन वंश, जर्मन राष्ट्र याबद्दलची त्याची प्रेमभावना समजण्याजोगी होती, पण पुढे जो भयानक इतिहास घडला त्याला काय म्हणायचं?

भारताच्या इतिहासात आर्यांनी केलेल्या हिंसा आपण वाचलेल्या असतात. पुढच्या इतिहासाच्या भागात मुगल साम्राज्य आणि आधीची हिंदुस्तानातली राज्यं यांच्यातली युद्धं आपल्याला माहिती आहेत. औरंगजेब आणि शिवाजी यांच्या संघर्षाचा इतिहास आपल्याला चांगला माहीत आहे. पुढे ब्रिटिशांनी भारतीयांवर दीडशे वर्षं राज्य केलं, स्वातंत्र्य मागणाऱ्यांचे अमानुष छळ केले, हेही आपल्याला माहिती आहे. ब्रिटिशांचा हेतू साम्राज्य वाढवण्याचा होता.

स्वातंत्र्यलढ्याच्या काळातला टिळक-आगरकर वाद आपल्याला ऐकून माहीत आहे. टिळकांच्या म्हणण्याप्रमाणे स्वातंत्र्य आधी मिळवू आणि मग सरकार चालवायचं कसं, ते बघू. आगरकरांचं म्हणणं होतं की, आधी समाजप्रबोधन आणि त्यानंतर स्वातंत्र्य मिळवू. सध्याची परिस्थिती बघितली की त्यापैकी बरोबर काय, हा खरोखरच प्रश्न पडतो.

'चक दे' नावाच्या हिंदी सिनेमात अमुक खेळाडू विशिष्ट राज्याचा आहे म्हणून त्याला घेतलं गेल्याचा उल्लेख आहे. क्रिकेटमधेदेखील तशीच अवस्था होती. ज्या काळात भारताची क्रिकेट टीम फक्त हरून येण्यापुरतीच होती तेव्हा तर जवळजवळ पूर्ण टीम राजकीय म्हणजे प्रांतीय दबावामुळे निवडली जायची. 1983 साली एकदा क्रिकेट वर्ल्डकप जिंकल्यावर या विचारात बदल व्हायला सुरुवात झाली. आताही तो रोग पूर्णपणे बरा झालेला नाही, पण तब्येतीत खूप सुधारणा आहे.

इतिहासात झालेल्या महायुद्धांच्यात भारतापर्यंत एवढे परिणाम पोहोचले नाहीत. युरोपात मात्र हाहाकार झाला. हिटलरच्या नाझी राजवटीच्या अमानुषतेच्या कथा आपण दुरून ऐकल्या. आपल्याला कथा, कादंबऱ्या, सिनेमे यामधूनच त्या

अमानुष छळछावण्या वगैरेंची ओळख आहे. मुळात मानवजातीच्या भल्यासाठी जन्मलेल्या वंश, जाती, धर्म, राष्ट्रं या तत्त्वांचं भयानक रूप तेव्हा बघायला मिळालं.

पूर्वी मी जेव्हा फिलाडेल्फिया, यू.एस.ए.मधे राहात होतो, तेव्हा आमच्या ऑफिसमधे महायुद्धाच्या काळात आणि रशियन राज्यक्रांतीच्या काळात निसटून पळून अमेरिकेत स्थायिक झालेल्या कुटुंबांपैकी काही लोक होते. ते सांगायचे की, ब्रिटिशांच्या हिंसेच्या तुलनेत जर्मन हिंसाचारी फार वाईट होते नि रशियन अमानुष हिंसाचार तर जर्मनीला लाजवील इतका भयानक होता. हे लोक लाटविया, लिथुआनिया, बल्गेरिया, पोलंड, युक्रेन अशा 'आयर्न कर्टन'च्या पलीकडून आलेले होते. मानवाच्या इतिहासात ज्या मूळ तत्त्वांच्या आधारानी मानवाच्या विकासासाठी आणि भल्यासाठी 'प्रगती' होत गेली, त्याला खरोखर प्रगती म्हणता येईल का, हाच प्रश्न आहे.

लहानपणी मी 15 ऑगस्टच्या झेंडा वंदनाला जायचो. कॉलेजमधे गेल्यावर अनेक गोष्टी सुटल्या, त्यात झेंडावंदनही सुटलं. अनेक वर्षांनी मी एकदा कामासाठी बाहेरगावी असताना योगायोगानी 15 ऑगस्टचा दिवस मधे आला होता. शाळेतल्या शिक्षकांशी आणि मुलांशी तुम्ही बोलाल का विचारल्यामुळे मी त्यांच्याशी अनौपचारिकपणे बोलत होतो. मी तेव्हा उत्स्फूर्तपणे जे बोललो ते त्या लोकांच्याही अजून लक्षात आहे आणि एवढ्या वर्षांनंतर मला ही ते महत्त्वाचं वाटतं. त्याचा गोषवारा सांगतो.

मी शिक्षक आणि मुलांना विचारलं की, भारत देशासाठी तुम्ही काय कराल? उत्तरं अशा प्रकारची आली. 15 ऑगस्ट आणि 26 जानेवारीला आम्ही झेंडावंदन करू. कोणी म्हटलं, राष्ट्रगीत म्हणू. मी त्यांना म्हणालो की, हे दोन दिवस साजरे कराल आणि राष्ट्रगीत म्हणाल हे ठीक आहे, पण प्रत्यक्ष कृती काय कराल? त्याची उत्तरं आलं की, जवानांना दिवाळी भेटकार्डं पाठवू, जवानांना राखी पौर्णिमेला राख्या पाठवू.

मी म्हणालो की, पण तुम्ही स्वतः काय कराल ते सांगा ना! कोणी म्हणालं, शाळेचं अंगण झाडून काढू, वर्ग झाडून काढू. याचा अर्थ आता स्वतः करण्याच्या कृतिसंबंधी निदान विचार चालू झाला होता. त्यानंतर कोणी म्हणालं, मी मन लावून अभ्यास करीन. कोणी म्हणालं, मी घरच्या सगळ्यांशी नीट, सभ्यपणी वागीन. एक बाई म्हणाल्या, मी मुलांना ओरडणं बंद करीन. दुसरे पी.टी.चे सर म्हणाले, मी मुलांना छडी मारणं बंद करीन. अशा काही कल्पना

समोर आल्यावर मी म्हणालो, 'या सगळ्या गोष्टी चांगल्या आहेत, पण त्या भारत देशासाठी आहेत का स्वतःसाठी?' त्यावर उत्तर आलं, 'देशासाठी आम्ही काय करणार?' आम्ही सामान्य नागरिक आहोत.

आता मुख्य मुद्दा स्पष्ट झाला असं मला वाटलं. मी म्हणालो, 'तुम्ही सगळ्यांनी या पलीकडे काही करावं, अशी अपेक्षाच नाही. 365 दिवस, 24 तास चांगलं, सरळ, सभ्यपणी, जबाबदारीनी तुम्ही सगळे वागलात की झालं. ध्वजवंदन केलं का नाही केलं, राष्ट्रगीत म्हटलं का नाही म्हटलं, याला फार कमी महत्त्व आहे.' हे माझं शेवटचं वाक्य काहींना पटलं नाही, समजलं नाही हा भाग निराळा, पण प्रतीकात्मक काहीतरी नुसतं म्हणण्यापेक्षा 'स्वतः केलेली कृती' महत्त्वाची हे सगळ्यांच्या मनावर कायमचं बिंबलं.

मग मी त्यांना सांगितलं की, नागरिकशास्त्र हा शाळेतला विषय आपण नागरिक म्हणून तसं वागावं यासाठी शिकवलेला असतो. तेवढं करा की, देशसेवा झाली समजा. वाहन चालवताना सगळेच्या सगळे नियम, संकेत पाळा की झाली देशसेवा. धर्म, जात या बंधनांना मानू नका की आपोआप होईल देशसेवा.

तेव्हा मला माहिती नव्हतं, पण नंतर कळलं की प्रत्येक सरकारी इमारतीवर 15 ऑगस्ट आणि 26 जानेवारी या दिवसांना तिरंगी झेंडा उभारण्याचं कायद्याचं बंधन आहे.

आपण जेव्हा परदेशात जातो तेव्हा आपण आपल्या देशाचे प्रतिनिधी म्हणूनच जात असतो. आपलं नाव एखाद्याच्या लक्षात येईल न येईल, पण आपण भारतीय म्हणून त्यांच्या लक्षात नक्की राहू. परदेशातले लोक जेव्हा इथे येतात तेव्हा आपल्या लक्षात राहते ती प्रतिमा त्या देशासंबंधीचीच असते. त्या आधारावर आपण अमेरिकन लोक असे असतात, अरेबियन असे असतात, आफ्रिकन असे वागतात, अशी मतं बनवतो आणि बहुधा आयुष्यभर तसाच विचार करत राहतो. ती म्हणजेच राष्ट्राची प्रतिमा असते. आपण परदेशात जातो तेव्हा भारत राष्ट्राबद्दलच्या प्रतिमेची आपल्यावर जबाबदारी आहे, हे सतत लक्षात पाहिजे.

त्यातली वाईट गोष्ट अशी आहे की, परदेशातले भारतीय नागरिक या जबाबदारीला शोभणार नाही असं वागतात. तिथे जाऊन रांग मोडतात, वाहन चालवताना धड चालवत नाहीत, रस्त्यावर कचरा टाकतात, सार्वजनिक जागी मोठ्यानी ओरडून बोलतात, रस्त्यावर थुंकतात. भारतीयांविषयी इंग्लंड अमेरिकेत

लोक चांगलं बोलत नाहीत, तेव्हा फार वाईट वाटतं, हे मी अनुभवानी खात्रीपूर्वक सांगतो. स्वातंत्र्य दिन आणि प्रजासत्ताक दिन जोरात साजरा करायचा नि दुसरीकडे राष्ट्रप्रतिमेचा, इज्जतीचा कचरा करायचा.

राष्ट्र या शब्दासरशी मला पासपोर्ट आठवतो. त्याबद्दल एक विचार सांगतो. परदेशात जाताना आपल्याकडे पासपोर्ट असतो आणि त्यावर जिथे-तिथे त्या त्या देशाचे तारखेचे, आल्या-गेल्याचे शिक्के मारणं चालू असतं. माझ्या मते, पासपोर्टवर शिक्के मारणाऱ्या जगभरच्या सगळ्या लोकांना हे प्रशिक्षण द्यायला हवं आहे. पासपोर्टच्या पहिल्या कोऱ्या पानापासून ज्या क्रमानी आपण जिथे जाऊ तिथला शिक्का त्यांनी मारायला हवा. आपण कुठेही, कितीही प्रवास केलेला असो, पासपोर्टवरच्या शिक्क्यांच्या तारखा ओळीनी आणि सरळ नीट वाचता येणाऱ्या पद्धतीनी पाहिजेत. उलटट्यासुलटट्या आणि कुठच्याही भलत्या पानावरचे शिक्के माझ्या बुद्धीला काही पटत नाहीत. मला त्यात बेपर्वाई दिसते. ही माझी नुसती इच्छा आहे, यावर माझं काही नियंत्रण नाही. इतर देशांचं जाऊ दे, भारतानी तरी सगळ्या विमानतळांना, बंदरांना या सूचना द्याव्यात. राष्ट्र म्हणून आपली काही शिस्त, इज्जत आहे का नाही?

सबंध भारतभर एवढ्या राज्यांच्यात एवढी जनता राहते म्हटल्यावर काहीतरी चुकीच्या घटना रोजच घडणार. मारामाऱ्या, खून, बलात्कार असं काहीच घडलं नाही, असा दिवसच असू शकत नाही. सबंध देश म्हणून अशा गुन्हेगारीविषयी उपाय काय केले, याला महत्त्व आहे. असे गुन्हे रोखण्यासाठी देशाची व्यवस्था काय आहे बघावं तर काही नाही असं उत्तर मिळतं. गुन्हे घडल्यावर गुन्हेगारांना शोधण्याची, पकडण्याची व्यवस्था आहे, पण कुचकामी आहे असं दिसतं. प्रसारमाध्यमं झटका आल्यासारखा काही दिवस तो विषय लावून धरतात, झटका संपला की सगळे पुन्हा पहिल्यासारखे निष्क्रिय होतात. सामूहिक बलात्कार झाला की, देशभर कराटे क्लासेस निघतात. काही मुली त्या क्लासेसना जातात. ही काय राष्ट्रीय उपाययोजना झाली? खरा उपाय समाजप्रबोधन हाच आहे. पण त्या एका गोष्टीची या देशात काय परिस्थिती होते ते गेली साठ वर्षं आपण बघतोच आहोत की!

काही देशांपासून जगानी खूप शिकण्याजोगं आहे. जर्मनी, स्वित्झर्लंड, जपान, कॅनडा, नॉर्वे, स्वीडन, डेन्मार्क, नेदरलँड्स हे प्रगत देश आहेत, पण जागतिक महासत्ता बनण्याची स्वप्नं बघत नाहीत. इतर देशांच्या राज्यकारभाराबद्दल

गप्प बसतात आणि त्यात नाक खुपसत नाहीत.

मनुष्याची लालसा कुठच्याही देशात काही प्रमाणात असतेच. काही लोक भ्रष्टाचारी असतात. प्रगत देशांच्यातही भ्रष्टाचार चालतो, पण त्या आणि भारतातल्या भ्रष्टाचारात फरक आहे. 'स्पीड मनी' आणि 'ग्रीड मनी' हा मुख्य फरक आहे. काम लवकर व्हावं म्हणून प्रगत देशांच्यात 'स्पीड मनी'चे व्यवहार चालतात. पण भारतात खराब दर्जाचं काम खपवून घ्यावं म्हणून 'ग्रीड मनी'चे व्यवहार होतात. प्रगत देशांमधे दर्जात तडजोड नसते. भारतात कामाच्या, वस्तूच्या दर्जात कितीही तडजोड चालते. शेवटी जनतेला कितीही फसवलं तरी चालतं, अशीच भूमिका असते.

सबंध जगात सामाजिक विकासाबद्दल त्या त्या देशाची प्रगती बघतात आणि त्यांचे नंबर यूनोतर्फे जाहीर होतात. त्याचे निकष एवढे असतात – अन्न, आरोग्य, सुरक्षा, निवारा, शिक्षण, स्वातंत्र्य आणि विकासाच्या संधी. जगातल्या 165 देशांच्यात नॉर्वे, स्वीडन या स्कॅंडिनेव्हियापैकी कुठचातरी देश वर्गात पहिला दुसरा येतो. सध्या नुकत्याच केलेल्या सर्वेक्षणात भारत 102व्या स्थानावर आहे. समाधानाची बाब म्हणजे 63 देश भारताच्या मागे आहेत.

भारतात जनतेला फसवण्याचा रोज जो कार्यक्रम चालतो त्यात भारत जागतिक महासत्ता बनण्याच्या टप्प्यावर आहे, 10 वर्षांत अमुक होईल, 20 वर्षांत तमुक होईल अशा वल्गना – खरं म्हणजे थापा – असतात. 115 कोटी जनतेपैकी 80 कोटी जनता हालात दिवस काढतेय, हे माहिती असताना अशा गप्पा मारताना लाज कशी वाटत नाही?

सबंध भारत देश असा खरं म्हणजे अस्तित्वातच नाहीय. एक-तृतीयांश लोकं इंडियामधे राहतात आणि दोन-तृतीयांश भारतात. त्या दोन वर्गांच्यात इतकी तफावत आहे की ती दोन शकलं जोडणं अशक्य आहे. एक गट चरितार्थाच्या झगड्यात पिसून निघतो आहे आणि दुसऱ्या गटाला पैसे खर्चण्यासाठी आणखी वाटा, आणखी चंगळ, चैन हवी आहे. मुंबई शहराचीही दोन शकलं आहेत. एक बॉम्बे आणि दुसरा भाग म्हणजे झोपडपट्ट्यांनी व्यापलेली मुंबई. तसंच 'न्यू देल्ही' आणि दिल्लीचं आहे. भारतातल्या प्रत्येक महानगराचं आहे.

विकासाचा खरा अर्थ समजणारे अनेक जण आहेत. साध्या शब्दात 'देशाचा विकास म्हणजे देशातल्या प्रत्येक व्यक्तीच्या जगण्याच्या दर्जात सुधारणा.' दुसऱ्या पद्धतीनीही विकासाची व्याख्या करता येते. समाजातले दुर्बल घटक म्हणजे लहान मुलं, म्हातारे, दुर्दैवी, अपंग, आणि मोठ्या आजारामुळे अशक्त.

अशा दुर्बलांना सबल बनवण्यात समाज किती यशस्वी होतो, तो म्हणजे विकास.

याच कार्यशाळेबद्दलच्या पुस्तकसंचात 'आधुनिक संस्कार म्हणजे नेमकं काय' असा एक लेख आहे. त्यात आधुनिक संस्काराची मला योग्य वाटणारी व्याख्या सविस्तर दिली आहे. सारांशात ती व्याख्या अशी आहे – 'सबलांनी दुर्बलांना सतत मदत करण्याचा प्रयत्न' हाच खरा आधुनिक संस्कार आणि तीच रूढी बनायला हवी.

पाच-पन्नास लोकांनी गडगंज श्रीमंत होणं म्हणजे देशाचा विकास नाही. भारतात तर सबंध जगातल्या श्रीमंतांच्या यादीत काही लोक नियमित नंबर लावतात. एखाद्या व्यक्तीनी पैसा, ज्ञान, शक्ती कमावली तर त्या व्यक्तीचं कौतुक आहे, पण बाकी जनतेला त्याचा उपयोग होत असला तरच त्या पैशाचं, ज्ञानाचं, शक्तीचं खरं महात्म्य आहे. ग्रीस हा आणखी एक देश मला माहिती आहे. जगातल्या सर्वात धनाढ्य लोकांच्या यादीत एक-दोन ग्रीक उद्योजक असतातच, पण ग्रीक जनता गरीब आहे.

विकासाच्या अगदी विरुद्धार्थी शब्द म्हणजे विषमता. भारत हे एक राष्ट्र म्हणवून घेताना त्याची दोन शकलं झालेली स्पष्ट दिसतात. पाश्चिमात्य देशांच्या संस्कृतीनी, समृद्धीनी भारावलेले, मनाचं पाश्चात्त्यीकरण झालेले लोक आणि दुसरे भारतीय संस्कृती, हिंदुत्व, पारंपरिक संस्कार याच्या महत्त्वानी भारावलेले.

थोडक्यात, मगाशी म्हणाल्याप्रमाणे आपल्या राष्ट्राचे दोन वैचारिक तुकडे आहेत. एक आहे इंडिया आणि दुसरा भारत. आणि अगदी सूक्ष्मपणी हे दोन तुकडे एकमेकांशी वाईट वागतायत.

भारत देशाला शत्रू फार आहेत. ही आणखी एक मोठी अडचण आहे. संरक्षणावर भारताचा फार खर्च होतो आणि तरी देश सुरक्षित नाही. चारही दिशांनी भारतावर हल्ला होऊ शकतो. त्याची सतत काळजी घ्यावी लागते. 'आर्मी', 'नेव्ही' आणि 'एअर फोर्स' या तीनही आघाड्यांवर भारताची कसरत चालू असते. या सगळ्यांना मिळून 'सर्व्हिसेस' असं म्हणतात.

सामाजिक दृष्टीनी 'सर्व्हिसमेन' आणि 'सिव्हिलियन्स' या दोन गटांचं एकमेकांशी असावं तेवढं सख्य नसतं. सर्वसामान्य माणसाच्या संरक्षणाची जबाबदारी 'सर्व्हिसेस'च्या माणसांवर आणि त्यांच्यावर होणाऱ्या खर्चाची जबाबदारी सामान्य करदात्यावर असते. याचा अर्थ, दोघं एकमेकांवर अवलंबून असल्यामुळे त्यांच्यात खूप जवळीक असायला हवी. प्रत्यक्षात तसं नसतं. थोडे अपवाद

सोडले तर ‘सर्व्हिसेस’ मधले लोक उद्धट, आढ्यताखोर, खूप सवलती मिळाल्यामुळे बिघडलेले आणि उथळ असण्याचं प्रमाण फार आहे. हे ‘फौजी भाई’ प्रामाणिक, सचोटीचे असतात असा समज असतो तोही खोटा असतो. तिथेदेखील खूप वाईट राजकारण आणि भ्रष्टाचार चालू असतो.

इंग्रजांकडून भारताला स्वातंत्र्य मिळालं. आज देश स्वतंत्र आहे, परंतु गावं, शहरं परतंत्र आहेत. आता आपल्याला स्थिती बदलायची आहे. त्यामधे देश स्वतंत्र असेल आणि सगळी गावंही स्वतंत्र असतील. स्वतंत्र गावांचा आणि शहरांचा स्वतंत्र भारत आपल्याला निर्माण करायचा आहे. विनोबाजी म्हणायचे, ‘आपला देश म्हणजे मातीचा सुवर्णकलश आहे.’ मातीचा सुवर्णकलश कधी असू शकतो का? तसंच परतंत्र गावांचा देश स्वतंत्र म्हणता येईल का? स्वराज्य प्राप्तीनंतर खेड्यातल्या लोकांची स्थिती सुधारेल, अशी लोकांना आशा होती. स्वराज्यात जर जनतेची स्थिती सुधारली नाही, तर त्या स्वराज्याची किंमतच काय?

पण एक घोटाळा होता. सत्ता कोणी दिल्यानी मिळत नाही, एवढंही लोकांच्या लक्षात आलं नाही. सत्ता किंवा अधिकार स्वतःच्या आतल्या उर्मीतून प्राप्त झाले पाहिजेत. भारतातील लोक मुळात मूर्ख नाहीत, सुजाण आहेत. दहा हजार वर्षांचा अनुभव त्यांच्या मागे आहे. ते अशिक्षित आहेत, परंतु अनुभवी आहेत आणि म्हणूनच ज्ञानी आहेत.

भारतातले लोक सुजाण आहेत, पण त्यांना अनेक वर्षांपासून गुलामगिरीची सवय झाली आहे. सरकार माय-बापांप्रमाणे आपली काळजी घेईल असं त्यांना वाटतं. ही गोष्ट अजिबातच बरोबर नाही. म्हणून आता त्यांच्या हातात सत्ता आली असताना त्या सत्तेचं भान त्यांना आलं पाहिजे. आईला मातृत्वाचा सहजच अनुभव येतो. सिंह स्वतःच्या शक्तीनीच जंगलचा राजा बनतो. याचप्रमाणे स्वराज्य-शक्तीचं भान लोकांना स्वतःहून आलं पाहिजे. हे कसं होईल? गावोगावचे लोक दिल्लीचं राज्य चालवतील का? शक्य नाही. गावोगावचे लोक आपापल्या स्वतःच्या गावाचंच राज्य चालवतील. त्यामुळे त्यांना राज्य चालवण्याचा अनुभव येईल. प्रत्येक व्यक्तीनी आपल्या गावाला देश समजावं. तेवढ्या जबाबदारीनी स्वतःचं कर्तव्य करावं.

भारतामधे लोकशाही असली तरी अधिकारांची उतरंड असतेच. फार वरच्या अधिकारी लोकांचा आणि आपला सामान्य माणसांचा संबंधच कधी येत नाही, पण तो अधिकारवृक्ष कळण्यानी आपल्याला काय माहिती नाही, याची

तरी नीट माहिती होईल. मी तो अधिकारवृक्ष तक्त्याच्या स्वरूपात नक्की मिळवीन आणि छापीन.

भारतातली केंद्र सरकारची, राज्य सरकारची नोकरी म्हटली रे म्हटली की, बदल्या डोळ्यासमोर येतात. चरितार्थ चालवण्यासाठी नवरा-बायको दोघंही सरकारी नोकऱ्यांच्यात असले आणि दोघांच्या बदल्या होत राहिल्या की, सबंध कुटुंबाची जी फरपट होते त्याला तोडच नाही. बदली हा त्या नोकरीला मोठा शाप आहे. बदलून आलेल्या नवीन माणसाला आधीचं काही माहीत नसतं. शिवाय पुन्हा तिसरीकडे बदली होण्याची भीती असते. असं लाखो ठिकाणी लाखो लोकांचं चालू असलं तर कामं केव्हा आणि कशी होणार?

पुणे महानगरपालिकेत मागे एका मोठ्या साहेबांनी भ्रष्टाचार रोखण्यासाठी बदली हा उत्तम उपाय आहे असं ठरवलं. त्यांनी बदल्या करण्याचा असा सपाटा लावला की, लाच द्यायची देणाऱ्यांना भीती वाटायला लागली. पैसे दिल्यापासून काम पुरं होईपर्यंत त्या माणसाची बदली झाली तर दिलेले पैसे वाया जातात या भीतीमुळे भ्रष्टाचारही थांबला आणि कामंही थांबली. अर्थातच हे काही काळच चाललं. कारण त्या साहेबांची लौकरच बदली झाली.

सरकारी नोकरी म्हटल्यासरशी दुसरा विचार समोर येतो तो म्हणजे जातींचं आरक्षण. तोही सरकारी नोकरीला मोठा शाप आहे. मी स्वतःचा व्यवसाय करायचा ठरवल्यामुळे त्यातून सुटलो. शोभा सुटली, आमची मुलं सुटली. आणखीन काही वर्षांनी आरक्षण हा प्रकार काय रूप धारण करेल काहीच सांगता येत नाही. शिक्षणात आरक्षण, नोकऱ्यांच्यात आरक्षण यामुळे कामाच्या दर्जाबद्दल काही बोलण्याची सोयच राहिलेली नाही.

विशिष्ट जातींसाठी शिक्षणात, नोकरीत आरक्षण ही त्या जातींवर केलेली मेहरबानी आहे का तो त्यांचा हक्क आहे? अनेक पिढ्या उच्च जातींनी इतर जातींवर अन्याय केला हे खरं आहेच. माझ्या मते, कुठचाही सामाजिक प्रश्न कुठच्याही काळात समोर आला की, प्रबोधन हाच खरा इलाज असतो. कायद्यानी दिलेला हक्क यानी उत्तर कधीच सापडत नाही. कोणता तरी गट दुखावतो. एकावरच्या अन्यायाचं निवारण करण्यासाठी दुसऱ्यावर अन्याय करणं हा सरकारचा निर्णय मला तरी चुकीचाच वाटतो. सरकारचा तत्त्वज्ञान या विषयीचा अभ्यास कमी पडला असं मला वाटतं.

सरकारी यंत्रणांमधे अनेक विनोदी निर्णय घेतले जातात. अगदी काही

महिन्यांपूर्वी गॅस वितरण व्यवस्थेत मोठा जबरदस्त विनोद चालू होता. घरगुती गॅस सिलिंडर पोहोचवताना रु. 450/-च्या ऐवजी गिऱ्हाइकाकडून रु. 1250/- घ्यायचे आणि मधले ८०० रु. गिऱ्हाइकाच्या बँकेत ठरलेल्या खात्यात जमा करायचे. त्यासाठी बँकेत अर्ज, खेपा, गॅस वितरकाकडे अर्ज, खेपा असं लाखो गॅसधारकांना करावं लागलं. नशिबानी 2-3 महिन्यांत सरकारला स्वतःची चूक कळली आणि इतकी करमणूकप्रधान योजना बंद पडली. ती काही काळानी पुन्हा चालू झाली. लोकांची करमणूक महत्त्वाची नाही का?

महाराष्ट्र राज्यात दोन चाकी वाहन चालवण्याचा परवाना निरनिराळ्या ठिकाणच्या आर.टी.ओ.मधे मिळतो. परवाना मिळवण्यासाठी एजंटजवळ पैसे द्यायचे, वाहन चालवण्याच्या चाचणीसाठी तिथे जायचं. तिथे बसलेला तपासनीस तुम्ही कसं वाहन चालवता आहात, ते बघण्याचीही तसदी घेत नाही. नियमावलीपैकी '८२, ८३ नियम म्हणा' असं बोलून तो तिथून उठून दुसरीकडे जातो. एका कागदावर फोटो, सह्या वगैरे झालं की परवाना नक्की मिळतोच. ही गोष्ट मात्र निव्वळ करमणूक असू शकत नाही. वाहन धड चालवता येत नसताना लाखो स्कूटर्स, मोटरसायकल्स चालवणारे इतरांच्या काळजाचा ठोका चुकवतात, अपघातही करतात.

महाराष्ट्रातलं हे वर्णन इतर सगळ्या राज्यांना लागू असणार, हे मी खात्रीनी सांगतो. मी पुण्यात राहतो. पुण्यात दोन चाकी वाहन चालवणारे लाखो लोक आहेत. त्यामधे वाहन चालवण्याचे सगळे नियम आणि संकेत पाळणारे जबाबदार चालक साधारण शंभर एवढेच भरतील. परदेशातून इथे आलेल्या ड्रायव्हरला इथल्या रहदारीची भीती वाटते. ती सगळी भीती सर्व दिशांनी येणाऱ्या दोन-चाकी वाहनांची असते.

परदेशी माणसाचं भारतात आल्यावर राष्ट्र म्हणून आपल्या देशाविषयी काय मत होत असेल? आपल्याला माहिती आहे याचं उत्तर. पाश्चिमात्य लोकं कोणाचा अपमान करत नाहीत, त्यामुळे ते उघड टीका करत नाहीत एवढंच. मागे बोललो होतो तेच पुन्हा सांगतो. भारताबद्दल जग म्हणतं की, भारत हा एक श्रीमंत देश आहे आणि त्यात गरीब लोक राहतात.



# 12

# राष्ट्रीय एकात्मता, विश्वबंधुत्व/विश्वशांती

निरनिराळ्या तत्त्ववेत्त्यांपैकी विवेकानंद हे भारतीय तत्त्वज्ञानी म्हणून खूप महत्त्वाचा विचार मांडणारे ठरले. त्यांनी मुख्य काम विश्वबंधुत्व, स्वतःचा जन्म कशासाठी, आणि स्वतःचं कार्यक्षेत्र काय, या विषयांवर केलं. त्याखेरीज त्यांनी आणखी एक मोठं काम केलं. हिंदू धर्माचा खोलात जाऊन अभ्यास केला आणि त्याची ओळख पाश्चात्त्य जगाला करून दिली. ते अविवाहित राहिले. त्यांचा धर्माविषयीचा विचार भारतीय तत्त्ववेत्त्यांच्यात एक महत्त्वाचा टप्पा मानतात.

विवेकानंदांनी म्हटलंय, 'विशिष्ट मतं, सांप्रदायिकता यांच्या भिंती पाडून टाकणं हाच सर्वश्रेष्ठ जगण्याचा मार्ग आहे.' जीवनसाथ अभ्यास मंडळाचा प्रमुख सूत्रधार या नात्यानी मी माझ्या परीनी या विचाराचा प्रसार करण्याचं काम करतो आहे. खुद्द माझ्या आयुष्यात त्याचं मी पूर्ण पालन करतो. त्यातलं विश्वबंधुत्व या तत्त्वाची धूळधाण झालेली आपण प्रत्यक्ष रोज बघतोच. याच प्रकारच्या ध्येयानी राजाराम मोहन रॉय यांनी विश्वधर्म ही कल्पनाही मांडली.

विश्वबंधुत्वाच्या कल्पनेची तर पायरी फार दूरची आहे, भारतात राष्ट्रीय एकात्मताही शक्य वाटत नाही. भाषा हा त्यामधला मोठा अडसर आहे. राष्ट्रभाषा हिंदी असली तरी ती सर्व राज्यांनी खुषीनी मान्य केलेली नाही. चार दक्षिणी राज्यं, संपूर्ण ईशान्य भारत हिंदी ही आपली भाषा मानत नाही. हिंदी सिनेमांनी हे एक मोठं काम केलं आहे की, भारतभर निदान हिंदी समजतं. मी विवाह अभ्यास मंडळाचं काम मराठीतून करतो. अगदी कमी प्रमाणात इंग्लिशमधे आणि फारच कमी वेळांना हिंदीतून. वैयक्तिक समुपदेशनात तर खूप खोलात शिरायचं असल्यामुळे ते मला हिंदीत नाही जमत.

विश्वबंधुत्व ही कल्पना जेव्हा अमलात येईल तेव्हा येईल; आधी भारत

देशाला एकसंध कसं बनवायचं हा प्रश्न सोडवायला हवा, असं अनेकांना वाटत होतं. अजूनही या दिशेनी काम करणारे बरेच लोक आहेत. अशा अनेक प्रयत्नांपैकी एक महत्त्वाचा प्रयत्न म्हणजे बाबा आमट्यांनी उभं केलेलं भारत जोडो अभियान. मला स्वतःला त्यामधे भाषा हा सर्वांत प्रमुख अडचणीचा घटक वाटतो.

आणखी एका गोष्टीचा विचार करावा लागतो. विश्वबंधुत्वाची कल्पना आणि 'स्वदेशी' मालाचा, ज्ञानाचा आग्रह या परस्परविरोधी कल्पना आहेत. विश्वबंधुत्वामधे जगभरातली अनेक लोकं इकडून तिकडे जात राहावीत, ज्ञान देणं आणि घेणं, कच्चा माल, पक्का माल जरुरीप्रमाणे देत-घेत जावा अशी कल्पना आहे. स्वदेशीच्या कल्पनेत आपलं, आपल्यापुरतंच, आपल्याच हद्दीत द्यायचं नि घ्यायचं अशी कल्पना आहे. कच्चा-पक्का माल आणि ज्ञान हेदेखील बाहेरदेशात जाता कामा नये आणि परदेशातून भारतात आयात होता कामा नये अशी कल्पना आहे. या दोन्ही कल्पनांचा वापर एकाच वेळी शक्य नाही. माझं स्वतःचं मत 'स्वदेशी'च्या बाजूनी आहे. मी स्वतः परदेशात शिकलो असलो, पैसे मिळवले असले तरी माझ्या मते, 'ग्लोबलायझेशन' भारताच्या फायद्याचं नाही.

आधी माणसानी जसं स्वतःच्या आरोग्याकडे आधी लक्ष दिलं पाहिजे, मग इतरांना आरोग्याचे धडे द्यायला हरकत नाही, तसं मला वाटतं. भारतातली श्रीमंत माणसं अधिक श्रीमंत झाली आणि गरीब अधिक गरीब झाले असं गेली साठ वर्षं सतत चालू आहे. ग्लोबलायझेशनमुळे ही श्रीमंत-गरिबांमधली तफावत आणखी वाढली आहे. संपूर्ण भारत देशाचा विचार केला तर देशाचं आर्थिक आरोग्य बिघडलेलं आहे.

जरा निराळा विषय मांडतो. वंश या कल्पनेचा स्पष्ट विचार आपण केला, तर एक गोष्ट अगदी निश्चित आहे. खूप खूप वर्षांपूर्वी, साधारण 10,000 वर्षांपूर्वी जगाची, भारताची लोकसंख्या फारच कमी होती. त्या अगदी थोड्या माणसांनी एकमेकांशी केलेल्या लैंगिक संबंधांमुळे त्यानंतरची सगळी माणसं जन्माला आली. याचाच दुसरा अर्थ असा की, ही सगळी माणसं एकमेकांच्या रक्ताच्या नात्याचीच आहेत. वंश या गोष्टीच्या अतिशयोक्तपणी केलेल्या उल्लेखाला खरं म्हणजे फारसा अर्थच नाही, हे कुठच्याही सर्वसाधारण बुद्धीच्या माणसाला समजायला काही हरकत नाही. मग वंशावरून वाद, भांडणं, अशांतता या गोष्टी अतार्किकच नाहीत का?

सबंध जगाचा विचार केला तर गोरे, पिवळे, काळे हे तर मुख्य भेद आहेतच. त्याशिवाय निरनिराळी पैशाची चलनं, व्हिसाचे भेदभाव करणारे कायदे, अनेक भाषा, यामुळे विश्वबंधुत्व ही कल्पना अशक्य आहे. जागतिक शांततेसाठी यूनोची स्थापना झाली. जागतिक आरोग्यासाठी संघटना स्थापना झाली. 'एस्पेरांटो' नावाची जागतिक भाषा शोधून काढली. एस्पेरांटो भाषा कोणीही बोलत नाही. अनेकांना अशी भाषा असते, हेही माहीत नसतं. या सगळ्या विश्वबंधुत्वाच्या कल्पना पार फसल्या. एकाच वेळेला अनेक युद्धंही जगात सुरू असतात. कुठच्या ना कुठच्या देशात भांडणं, कुरापती, लढाया सतत चालू असतातच. जागतिक शांतता ही गोष्ट पूर्ण अशक्य कोटीतलीच झालेली आहे. भारत-पाकिस्तान संघर्ष, अमेरिका-रशिया संघर्ष ही अखंड चालणारीच गोष्ट झालेली आहे.

युद्धनीती, युद्धकला हा काही माझ्या अभ्यासाचा विषय नाही, पण मला समजतंय त्याप्रमाणे यापुढे युद्धं होतील, महायुद्ध देखील होईल, पण ते पारंपरिक पद्धतीनी होणार नाही. दोन सैन्यं, जवान, तोफा, रायफल्स या गोष्टी आता कालबाह्य झाल्या. आता यापुढे होणारी युद्धं अणुयुद्ध शक्य आहे. रासायनिक वायूयुद्ध शक्य आहे. रासायनिक दूषित पाणीयुद्ध शक्य आहे. विश्वशांतीच्या प्रयत्नांसाठी जाणकारांना या नवीन युद्धसाधनांचा अभ्यास करावा लागेल.

पूर्वी इंग्लंड या देशानी आणि अलीकडच्या काळात अमेरिका आणि रशिया यांनी सत्तेच्या मोहामुळे, व्यापारी दृष्टिकोनामुळे इतर राष्ट्रांच्यामधे ढवळाढवळ सुरू केली आणि घोटाळ्याला सुरुवात झाली. 'विश्वशांती' ही कल्पना त्यांच्यामुळे जवळजवळ अशक्य बनलेली आहे.

इतिहासातली रशियातली झारची, स्टॅलिनची जुलमी राजवट, जर्मनीमधला हिटलर, अलीकडच्या काळातली तालिबान राजवट, ओसामा बिन लादेनसारखे दहशतवादी, दाऊद इब्राहिमच्या कारवाया या सगळ्या गोष्टी आणि त्या घटनांचा बदला घेण्यासाठी केलेल्या प्रति कारवाया, त्याबद्दलची दोन टोकाची मतं यामुळे विश्वशांती सोडा, एका राष्ट्राची अंतर्गत शांतीही अशक्य वाटते.

इतिहास बघितला तर असं आढळतं की, देशाच्या अंतर्गत राजकारणात सत्तेवरच्या सरकारला शेजारच्या देशांशी भांडण उकरून काढण्याची जरूर होती. देशाच्या प्रजेला दुर्दशेचं काहीतरी कारण सांगणं भाग पडल्यामुळे शेजारच्या देशाशी युद्ध करायचं, थोडक्यात, जनतेचं लक्ष दुसरीकडे वळवायचं अशीही कारणं असतात. अनेक युद्धं या कारणासाठी सुरू झालेली दिसतात.

पूर्वी अशा युद्धाला मोठं स्वरूप येऊन महायुद्ध झालं असंही घडलं. युरोपातलं पहिलं महायुद्ध जर्मनी हरल्यावर मधे काही वर्षांनी दुसरं महायुद्ध अनेक अर्थांनी मोठं झालं. या काळात स्कँडिनेव्हियन देश होरपळले. पुढे मात्र ते शहाणे झाले आणि त्यांनी जगाच्या राजकारणात यापुढे कधीही भाग न घेण्याचा निर्णय घेतला. असाच निर्णय जगातल्या इतर अनेक देशांनी घेतला.

युनायटेड स्टेट्स ऑफ अमेरिका ऊर्फ यू.एस.ए. या देशाला जाणकार लोकं हसतात. इतकी नैसर्गिक समृद्धी, अवाढव्य जमीन, भरपूर गोडं पाणी, मर्यादित लोकसंख्या, प्रगत तंत्रज्ञानासाठी जरूर असणाऱ्या संशोधन सुविधा, बुद्धिमान माणसं या सगळ्या गोष्टी अनुकूल असताना तो पृथ्वीवरचा स्वर्ग बनायला हवा होता. पण आफ्रिकेतून गुलाम आयात करण्याच्या कल्पनेनी ते सामाजिक स्वास्थ्य घालवून बसले. पुढे सत्तेच्या हव्यासापायी चुकांवर चुका करत गेले. 'यू.एस.ए.'ला लोक स्व-पराभूत देश म्हणतात. खऱ्या प्रगतीच्या व्याख्येत तो देश बसत नाही.

दुसरं उदाहरण पाकिस्तानचं. भारताशी शत्रुत्व ठेवणं, सतत ते दाखवणं ही पाकिस्तानच्या अंतर्गत राजकारणाची गरज आहे. भारताची परिस्थिती काही निराळी नाही. पाकिस्तानशी दुष्टावा ही राजकारणाची गरजच आहे.

गोडं पाणी हा प्रश्न जगात सगळीकडे बिकट व्हायला लागलेला आहे. ब्रह्मपुत्रेच्या पाण्यावरून भारताचं चीनशी वाकडं आहेच. पाकिस्तानाबरोबर भांडणांचा काश्मीरखेरीज सिंधू, चिनाब या नद्या हा विषय आहे. ही दोन्ही युद्धं केव्हाही होऊ शकतील, अशा अवस्थेत आहेत.

महात्मा गांधी म्हणायचे, 'जगात एकही समस्या अशी नाही की जी शांततापूर्वक चर्चा करून सोडवता येणार नाही.' माझ्या मते, हे खूप महत्त्वाचं तत्त्व आहे. ते विश्वशांतीला, देशांतर्गत शांतीला, राज्यांतर्गत शांतीला लागू आहे. कौटुंबिक सुसंवादासाठी आपण जो हा प्रयत्न करत आहोत त्याचंही मर्म हेच आहे. मला स्वतःला कौटुंबिक विसंवादाबद्दल तसंच वाटतं म्हणून मी समुपदेशक बनलो.

विश्वशांतीसाठी करण्याच्या अनेक कल्पनांपैकी एक म्हणजे देशादेशात खरेदी-विक्रीचा व्यवहार वाढवणं. प्रत्येक देशाकडे काही उत्पादनं कमी किंवा जास्त असतातच. या सगळ्यासाठी जागतिक भाषा 'एस्पेरांटो'चा वापर व्हावा अशीही कल्पना काहींनी मांडली आहे.

विश्वशांतीच्या विषयात झालेले काही प्रयोग लक्षात घेण्याजोगे आहेत. अशा प्रयोगांमागचा उद्देश विश्वशांती हा नव्हता, पण तरी त्याचा अभ्यास गरजेचा आहे. युरोपामधल्या देशांच्या सीमा त्यांनी काढून टाकल्या. संरक्षणावरचा काही खर्च कमी झाल्यामुळे पैशाचे प्रश्न सोपे झाले. शिवाय 'यूरो' हे चलन चालू केल्यामुळे सोयपण झाली.

विश्वशांतीच्या दिशेनी काही देशांनी प्रयत्न चालवलेला आहे. भारताला मात्र अजून ते जमलेलं नाही. भौतिक सत्ता न्यूयॉर्क किंवा दिल्लीत असावी, असं आज मानलं जातं. 'एक विश्व' कल्पना मांडणारे लोक तर म्हणतात की, सर्व भौतिक सत्ता यूनो किंवा एखाद्या विश्वसरकारच्या हाती असावी. या विषयावर अधिक संशोधनाची मात्र गरज आहे.

मी या विषयाचा अभ्यास करतो तेव्हा माझ्या डोळ्यासमोर 'यूरो'चं उदाहरण येतं. तीच कल्पना जगभरासाठी वापरून एक जागतिक चलन निर्माण करावं आणि त्याचा जगभर वापर करण्याची मोहीम हातात घ्यावी. कदाचित असा प्रयत्न झालाही असेल आणि ते मला माहिती नसेल.

महायुद्धं, औद्योगिक क्रांती, भारताचं स्वातंत्र्य, लोकशाही गणराज्याची संकल्पना, कॉम्प्युटरचा शोध आणि विकास, स्त्री-स्वातंत्र्याची चळवळ, भारताच्या शासनाला न रोखता आलेली महागाई या गोष्टी इतक्या झपाट्यानी घडल्या की, ते भारताला, जगाला झेपलं नाही. नव्या पिढीची सांस्कृतिक व्याख्या 25 वर्षांवरून 5 वर्षांवर आली. मूल्यं इतक्या वेगानी बदलली की, ते समाजाला सहन करता आलं नाही. एखाद्या दिवसात फार माणसं भेटली, फार घटना घडल्या की, आपल्याला सुन्न व्हायला होतं तसं सबंध समाजाचं झालं. कायम सुन्न.

भारत आणि रशिया या दोन देशांची अनेक वर्षांपासून मैत्री आहे. रशिया-अमेरिका वैर असल्यामुळे भारत-अमेरिका मैत्री होऊ शकत नाही. त्याशिवाय पाकिस्तान-अमेरिका मैत्री आणि भारत-पाकिस्तान वैर. असं सगळं असलं तरी भारतीय सुशिक्षित लोक बुद्धिमान, मेहनती, इंग्लिश येणारे आणि स्वभावानी गरीब असल्यामुळे अमेरिकेला भारतीयांची जरूर आहे. भारतीयांना भारतातल्या भ्रष्ट वातावरणातून सुटका हवी असते. इतक्या सगळ्या देशादेशातल्या गुंतागुंतीच्या नातेसंबंधांचं चित्र बघितलं की, विषण्णता येते. कसलं विश्वबंधुत्व नि कसलं ग्लोबलायझेशन! मानवाच्या विकासाचं तत्त्व ते हेच का?



# 13

# कायदा आणि पोलीस यंत्रणा

तत्त्वज्ञानाच्या अभ्यासात अगदी सुरुवातीला आपण योग्य म्हणजे काय आणि अयोग्य म्हणजे काय, याविषयी बोललो होतो. योग्य वागणूक याचंच दुसरं नाव नीतिमत्ता. नीती ढासळली याचा अर्थ लोक खूप प्रमाणात चुकीचं वागायला लागले आणि इतरांवर अन्याय करायला लागले. असं झालं की, सरकार नावाच्या गोष्टीला त्याविरुद्ध काहीतरी कायदा करावा लागतो, हे राजकारणात स्पष्ट झालं. तेव्हापासून स्वतंत्र कायदा व्यवस्था म्हणजेच कायदा विभाग, शिक्षणात कायद्याची शाखा हे सगळं सगळ्या देशांना करावं लागलं.

तुम्ही ऐकलं असेल की, यू.एस.ए.सारख्या देशात अगदी 60-70 वर्षांपूर्वी म्हणजे इतक्या अलीकडच्या काळात एकाला दुसऱ्याचा राग आला की, तो सरळ त्या माणसाला पिस्तुलाची गोळी घालायचा. असं जोपर्यंत मर्यादेत होतं तोपर्यंत चाललं. जेव्हा फार वाढलं तेव्हा दुसऱ्याची हत्या, दुसऱ्याला कुठल्याही प्रकारची इजा न करण्याचा कायदा अस्तित्वात आला. भारतातदेखील खूप प्रमाणात लोक चुकीचं वागायला लागले की, त्याबद्दलचा कायदा करावा लागतो. पुढे तो पाळला जावा म्हणून आणखी बरीच व्यवस्था करावी लागते.

जेव्हा एखादा कायदा बनतो तेव्हा अधिक लोक कायदा पालन करणारे असतात आणि तो मोडणाऱ्यांची संख्या कमी असते, असं गृहीत धरून आपण चालत असतो. त्यामुळे तुरुंगात थोड्याच लोकांची राहण्याची व्यवस्था असते. सध्या तर तुरुंगाच्या व्यवस्थेतही शक्ती आणि अधिकाराचा अंश कमी कमी होत जावा असा प्रयत्न असतो. हल्ली तुरुंगाच्या ज्या सुधारणा होत आहेत, त्यात बंदोबस्त शक्य तो कैद्यांच्या हातात देण्याचा प्रयत्न आहे. याचा अर्थ, देशाचा कल स्वतंत्रतेकडे आहे, प्रशासनाकडे नाही. ही तर फार चांगली गोष्ट आहे.

स्वातंत्र्यात स्वयंशासन आणि आत्मनियंत्रण अभिप्रेत आहे. यालाच अनुशासन किंवा संयम म्हटलं जातं. लोकनीतीचं हे प्राणभूत तत्त्व आहे.

याबद्दल तीन प्रकारांनी विचार करता येतो. लोकांनी स्वतः बंधन पाळणं सर्वात चांगलं. ते जमत नसलं तर त्याबद्दल सरकारनी प्रबोधनाची मोहीम उघडणं. शेवटी नाइलाज झाला तर तसा कायदा करणं.

ज्या प्रकारचा सद्व्यवहार लोकांच्यात प्रस्थापित व्हावा असं आपल्याला वाटतं, त्या प्रकारचे कायदे आपण बनवत असतो. त्या कायद्यांना अनुसरून लोकमत निर्माण करणं प्रत्येक जबाबदार नागरिकाचं कर्तव्य आहे. नागरिकांनी सामुदायिक किंवा संस्थारूपानी हे कर्तव्य पार पाडलं नाही तर दंडाच्या, शिक्षेच्या बळावर त्याचा अंमल करण्याची पाळी येते. शिक्षेच्या जोरावर कायद्याचं पालन करवून घेण्याची पाळी जितकी जास्त जास्त येत जाईल तितकी तितकी लोकसत्ता आणि नागरिकांची स्वतंत्रता कमी होत जाईल. समाजात ज्या आदर्शाचा आणि सदाचारांचा विकास आपल्याला हवा आहे, त्यांची प्रतिष्ठा राहणार नाही.

उदाहरणार्थ, दारूबंदीच घ्या. काँग्रेस, प्रजा-समाजवादी, केवळ समाजवादी, भाजपा सर्वांनाच दारूचं किंवा इतर नशांचं व्यसन समाजात नको आहे. दारूबंदीचा कायदा करावा की नाही याबद्दल मतभेद असू शकेल, पण दारूचं व्यसन नसावं याविषयी कोणाचाच मतभेद नाही. कम्युनिस्ट देशांनी या बाबतीत बरंच पुढे पाऊल टाकलं आहे. त्याबद्दल त्यांना अभिमान वाटतो. एका बाजूनी आम्ही दारूच्या व्यसनाचा अंत व्हावा अशी इच्छा करू आणि दुसऱ्या बाजूनी दारूच्या पार्ट्या करू, शिवाय ते आधुनिकतेचं लक्षण समजू, तर दारूबंदीला लागणारं वातावरण कधीच निर्माण होऊ शकणार नाही. सामाजिक आदर्शांना अनुसरून लोकमत बनवण्याचा प्रयत्न म्हणजे राजनीती नाही, लोकनीती आहे. या पार्श्वभूमीवर सध्याचे दारूचे धंदे अतिशय भरभराटीला आलेले आहेत, ही गोष्ट खटकल्याशिवाय राहत नाही. खुद्द माझ्या माहितीत, प्रत्यक्ष ओळखीत अनेक राजकारण्यांचे 'रेस्टॉरंट अँड बार' चे धंदे आहेत. यावरून आम जनता काय बोध घेईल?

यू.एस.ए.मधे कायद्याचं पालन याबद्दल नुकताच घडलेला एक प्रसंग सांगतो. मी एका डिपार्टमेंट स्टोअरमधून बाहेर पडलो. वाटेत मला पँटचा पट्टा घट्ट करायचा होता म्हणून हातातली शॉपिंग बॅग एका झुडपाजवळ ठेवून पट्टा घट्ट करत होतो. तेवढ्यात सिटी पोलीसची गाडी येऊन माझ्याजवळ थांबली.

जाबजबाब झाले. त्यातल्या एकाला वाटत होतं की, मी झुडपात लघवी करत होतो. याबाबतीतला कायदा यू.एस.ए.मधे अगदी कडकपणी पाळतात. मी त्यांना पट्टा घट्ट करण्याबद्दल समजावून सांगितलं. त्यांना ते पटलं आणि ते गेले. वादावादी नाही, दंड नाही, लाच नाही. उलट त्यांनी माझी माफी मागितली.

या प्रसंगावरून असे अर्थ निघतात – 1) सार्वजनिक ठिकाणी घाण न करण्याचा कायदा तिथे खरोखर कडकपणी पाळला जातो, ही कौतुकाची गोष्ट आहे. 2) गोऱ्या कातडीचा नसणारा, भारतीय वाटणारा अशा माणसांविषयी आधी बरीच बदनामी झालेली आहे. 3) एखादी खरी असलेली गोष्ट पटली तर यू.एस.ए.मधले पोलीस उगीच त्रास देत नाहीत, पैसे उकळत नाहीत. 4) मी स्वतः यापुढे जास्त काळजी घेतली पाहिजे, विशेषतः गोऱ्या लोकांच्या देशात वावरताना. इतपत अडचणीचा प्रसंगदेखील घडू द्यायचा नाही.

लोकांचं चुकीचं वागण्याचं प्रमाण वाढलं की, कायदे बनतात. कायदे बनले की, ते खुबीनी मोडायचे कसे, यावर लगेच कामाला सुरुवात होते. अशा लोकांना तरीही कसं पकडायचं यावर कायदा यंत्रणा कामाला लागते. खरं-खोटं सिद्ध करण्यासाठीच्या सुविधांच्यामधले काही टप्पे कायद्याच्या इतिहासाच्या अभ्यासात फार महत्त्वाचे मानले जातात.

1) माणसाचं हस्ताक्षर आणि सही. सही ही गोष्ट एकासारखी दुसरा माणूस हुबेहूब करू शकत नाही ही कल्पना, त्याचा पाठपुरावा, त्याला मिळालेली जागतिक पातळीवरची मान्यता आणि त्या आधारावर चाललेले जगभरचे बँकेच्या चेकचे व्यवहार हा महत्त्वाचा टप्पा ठरला.
2) त्यानंतर जगातल्या प्रत्येक माणसाचे बोटाचे ठसे निराळे असतात ही कल्पना, त्याचा पाठपुरावा, जगभरच्या गुन्हेनियंत्रण विभागांकडून त्याला मिळालेली मान्यता हा पुढचा महत्त्वाचा टप्पा ठरला.
3) डी.एन.ए. या गोष्टीनी कोण कुणाचं अपत्य हे ठरवण्यासाठी खूप उपयोग होतो हा पुढचा महत्त्वाचा टप्पा आहे.

कायदा, न्याय, गुन्हे नियंत्रण यंत्रणा हे सगळेच विषय तत्त्वज्ञानाच्या विकासातले टप्पे आहेत, याची लोकांना एरवी कल्पना नसते. आपल्या रोजच्या आयुष्याचा आणि या विषयांचा प्रत्यक्षात खूपच जवळचा संबंध आहे.

एखादी रोज दिसणारी चुकीची किंवा अन्यायाची गोष्ट दिसली तर लोकं एकमेकांकडे तक्रार करतात. घरातल्या घरात चिडतात, पण योग्य ठिकाणी तक्रार करत नाहीत. तोंडी किंवा लेखी तक्रार करण्याइतकं धाडसच सर्वसामान्य माणसाकडे नसतं. लहान मुलांविषयी सगळ्यांना काळजी असते म्हणून लहान मुलांचंच एक उदाहरण घेऊ.

शहरांमधे शाळेत मुलं जातात त्यांना ऑटो रिक्षा, व्हॅन किंवा तसलीच कुठची तरी बससारखी वाहनव्यवस्था असते. रिक्षावाल्याचा किंवा व्हॅनवाल्याचा तो धंदा असतो. त्यामुळे तो जास्तीतजास्त पैसे कमावण्याच्या सगळ्या युक्त्या करतो. मुलांना शाळेत सोडताना आणि घरी आणताना मुलं सुरक्षितपणे नेली-आणली पाहिजेत, याला सर्वांत जास्त महत्त्व द्यायलाच पाहिजे. त्यातल्या अगदी प्राथमिक गोष्टी जाणवतात त्या अशा.

1) बाजूनी उघड्या असलेल्या रिक्षा मुलांना नेण्या-आणण्यासाठी कायद्याच्या बंधनानी अमान्य कराव्यात.
2) शाळेसाठीच्या रिक्षाच्या किंवा बसच्या वाहनाची कार्यक्षमतेची तपासणी दर महिन्यातून एकदा कायद्यानी आवश्यक करावी.
3) अशा रिक्षा किंवा बसच्या ड्रायव्हरला सुरक्षित ड्रायव्हिंगसाठीचे नियम आणि संकेत पूर्ण माहिती आहेत, याबद्दल तपासणी करून तसा दाखला चालवण्याच्या परवान्याबरोबरच आवश्यक करावा. त्याची मधूनमधून तपासणी करावी.
4) विद्यार्थ्यांच्या बसण्याच्या संख्येचा कायदा जास्त कडकपणी पाळावा.

आता याबद्दल पालक काय करतात? बघावं तर स्वतःच्याच मुलाच्या सुरक्षिततेबद्दल पालक अज्ञानी आणि निष्काळजी असतात. वाहनचालक बेपर्वा, शाळेचा या गोष्टीशी संबंधच नाही आणि पालक अज्ञानी, आळशी, घाबरट असा संयोग जुळून आल्यावर मुलांचे हाल होतील नाहीतर काय!

जगामधली एकूण कायद्याची परिस्थिती बघितली तर प्रगत देशात मुलांच्या संबंधीचे कायदे कडकपणी केले जातात आणि पाळले जातात. भारत त्याला अपवाद आहे. याचा अर्थ भारत प्रगतीच्या वाटेवरचा प्रवासी नाही.

भारतातल्या अनेक शहरांमधे ऑटो रिक्षा असतात. चार चाकी कारच्या

तुलनेत स्वस्तातलं वाहन असल्यामुळे कायदा यंत्रणा ऑटो रिक्षांच्या बाबतीत धोरणं शिथिल ठेवतात. खरं म्हणजे वाहन म्हटलं की, अपघाताची शक्यता लक्षात घेऊन कायदे आणि त्याचं पालन कडकच हवं. ऑटो रिक्षानी प्रवास करणारी मुलं, तरुण, म्हातारे सगळेच रिक्षा प्रकरणाबद्दल नाराजच असतात.

ऑटो रिक्षाला डावी-उजवीकडे वळण्यासाठी 'इंडिकेटर लँप' रिक्षाचं उत्पादन करताना नक्की असतात. ते एकदा बिघडले की, त्याकडे रिक्षावाले आणि ट्रॅफिक पोलीस दोघंही सोयिस्करपणी दुर्लक्ष करतात. अर्थात, बहुतेक वेळा पोलिसांना हप्ते देऊन ही कामं होतात. ग्राहकाच्या नजरेतून ऑटो रिक्षासंबंधीची आणखी एक अडचण असते. लांबून बघताना या रिक्षात कोणी व्यक्ती बसलेली आहे का रिक्षा रिकामी आहे, हे कळतच नाही. ऑटो रिक्षा बनवताना रिक्षाच्या डोक्यावर समोरच्या बाजूला हिरव्या किंवा लाल दिव्याची सोय हवी. आणि अर्थात त्याचा कायदा बनावा, शिवाय त्या कायद्याची अंमलबजावणी कडकपणी व्हावी.

कायदा व्यवस्थेतली पहिली गोष्ट म्हणजे कायद्यातून पळवाट काढण्यासाठी कोणाची तरी मदत घेण्याची गरज निर्माण झाली. म्हणजेच वकील नावाचा प्राणी आला आणि त्याचा तो चरितार्थ चालवण्याचा उद्योग बनला. पैसे मिळवण्याची गरज माणसाला खोटं वागायला शिकवतेच. वकील म्हणजे खऱ्याचं खोटं, खोट्याचं खरं करणारा, अशी लोकांची पक्की समजूत झाली. पुढे तर न्यायदान करणारे न्यायाधीशही पैसे खायला लागले. 'न्यायदेवता आंधळी असते', 'शहाण्यानी कोर्टाची पायरी चढू नये' वगैरे वचनात फार तथ्य आहे.

शहाण्यानी कोर्टाची पायरी चढू नये म्हणतात ते दोन गोष्टींसाठी. कोर्टात न्याय मिळेल याची खात्री वाटत नाही आणि त्याखेरीज खूप बिघडलेली वकील जमात. प्रत्येक गोष्टीबद्दलचा कायदा थेट छापील स्वरूपात असतो. त्याला 'बेअर ॲक्ट' म्हणतात. प्रत्येक प्रकरणाप्रमाणे त्याचा अर्थ लागू करायचा असतो. त्याबाबतीत गुंतागुंत असू शकते, दोन वकिलांची मतं निराळी असतात, हे समजण्याजोगं आहे. पण अशीलाला सोपं व्हावं म्हणून वकील एकत्र चर्चेला तयार नसतात. अशीलाची मात्र यामुळे वाट लागते.

वकिलांबद्दल माझा अनुभव चांगला नाहीच, शिवाय अनेकांकडून मी अनेक कहाण्या ऐकलेल्या आहेत. एका गोष्टीबद्दल मला स्वतःला खूप आश्चर्य वाटतं. व्यवसाय, धंदा, छोटा असो, मोठा असो, कुणालाही दिलेलं, पाठवलेलं कुठचंही पत्र सही करण्यापूर्वी वाचलेलंच पाहिजे, असा व्यवस्थापनशास्त्राचा

दंडक आहे. माझा स्वतःचा धंदा प्रचंड मोठा नव्हता आणि किरकोळही नव्हता. मी तर माझ्या ऑफिसमधे आलेलं, गेलेलं प्रत्येक पत्र, परिपत्रक वाचायचो. प्रत्यक्षात माझ्या व्यवहारात लिखाणात एखादी चूक राहिली तरी एवढं बिघडण्याजोगं नसायचं. पण न्यायसंस्था, न्याययंत्रणा ही तर सगळ्या सामाजिक यंत्रणांपैकी सर्वोच्च अधिकार असलेली म्हणजेच सर्वांत जास्त जबाबदारी असलेली यंत्रणा आहे. आणि तरी टायपिंग केलेला मजकूर वकील तपासत नाहीत. कोर्टात खुशाल 'टायपिंग मिस्टेक' असं सांगतात आणि न्यायाधीशदेखील ते मान्य करताना दिसतात.

मला हे एरवीही तत्त्व म्हणून पटत नाहीच. त्याखेरीज अगदी सध्या एका खटल्यामधे मी त्याचा हिसका बघतोच आहे. माझ्या वकिलानी, किंवा स्वतः मी, जरा वेळ काढून कागदपत्रं नीट वाचली असती तर या सध्याच्या खटल्याची वेळही आली नसती.

एका वकिलाचा आलेला वाईट अनुभव मी आयुष्यभर विसरणार नाही. साधारण वर्षभर एका छोट्या कामासाठी त्या वकिलाकडे मी संध्याकाळी मधूनमधून चकरा मारत होतो. ऑफिसमधे ठरलेल्या वेळेला न येणं, काही उद्योग नसल्यासारखं वेड्यासारखं मला वेटिंग रूममधे थांबून राहायला लावणं, हे तर चालायचंच; याशिवाय न पटणारी बेहिशेबी फी घेणं, हे देखील झालं. त्याखेरीज मी बांधकामाच्या धंद्यात असल्याचा गैरफायदा घेतला गेला. कुठचंतरी माझा काही संबंध नसलेलं बांधकाम माझ्याकडून जलद गतीनी फुकट करून घेतलं. मला अनेक वाईट वकील भेटले हे खरंच, पण या एका वकिलाचा अनुभव भयानक म्हणण्याजोगाच होता.

एक विषय मी आत्तापर्यंत अनेक वकिलांशी बोललेलो आहे. मराठी असो, इंग्लिश असो; 'लीगल लँग्वेज' नेहमीच्या साध्या 'लँग्वेज'पेक्षा निराळी कशी असेल? एखादा शब्द एखाद्याला माहीत नसेल, मला माहीत नसेल हे शक्य आहे, पण त्यासाठी 'डिक्शनरी' आहे ना! आक्षेप आहे तो मुद्दामून जड शब्द निवडायचे, त्याची विशिष्ट रचना करून 'असंच कोर्टात लिहावं लागतं' असं अशीलांना सांगायचं या विधानाला. कोर्टाला म्हणजे ओळखीच्या न्यायाधीशांना हाच प्रश्न मी विचारला. ते म्हणतात, 'वकील असंच करतात, त्याला काय करायचं?' थोडक्यात, वकील आणि न्यायाधीश एकमेकांवर ढकलतात, याचं एकच कारण असू शकतं. अशीलाच्या नजरेत स्वतःचं महत्त्व वाढवणं. शेवटी

हे सगळं कशासाठी, तर जास्त फी उकळण्यासाठी.

वकिलांच्या फीबद्दल, फी आकारण्याच्या पद्धतीबद्दलदेखील सामान्य जनता वकील लोकांवर पार नाराज असते. खरं म्हणजे कुठचंही काम असो, त्या कामाच्या फीचा अंदाज वकिलांनी काम करण्याआधी अशीलाला द्यायलाच हवा. हे मी अनेक वकिलांशी बोललो, पण कोणालाही ते पटलं नाही. ते म्हणतात की, काम होण्यासाठी काय काय करावं लागेल, हे माहिती झाल्याशिवाय फी सांगता येणार नाही. प्रत्यक्षात मला हे पटलेलं नाही. कुठच्या सल्ल्याची किती फी, कोर्टातल्या कामाला किती फी, ऑफिसमधे करायच्या कुठच्या डॉक्युमेंटसाठी किती फी या गोष्टी माझ्या मते स्पष्ट कागदावर लिहून कामाआधीच देता आल्या पाहिजेत. कामाच्या वर्णनात कुठचा बदल झाला तर फीमधला बदल, वाढ हेही आधी लिहिता आलंच पाहिजे. नंतर फी सांगणं याचा अर्थ ती फी मिळण्याची खात्री असते. फी बुडवण्याचं अशीलाचं धाडस नसतं. याचा अर्थ दहशत असाच होतो. या दहशत पद्धतीत बरेच वकील अगदी आयत्या वेळी अशीलाकडून कामाआधीच पैसे घेतात. अशील काही बोलण्याच्या अवस्थेत नसतो. थोडक्यात, सगळा मनमानीचाच कारभार असतो.

मला तर वाटतं, वकील होतानाच्या आवश्यक असलेल्या परीक्षेत मानसशास्त्र हा विषय वाढवावा. त्यांच्या स्वतःच्या व्यवसायाला त्याचा फायदा होईल आणि ते आपल्या 'क्लायंट'शी नीट वागतील.

जिथे जो खटला चालू असतो त्या विशिष्ट ठिकाणची सर्वोच्च अधिकारी व्यक्ती न्यायाधीश ही असते. न्यायाधीश हा देशाच्या न्यायव्यवस्थेचा प्रतिनिधी असतो. न्याययंत्रणेच्या धोरणांचा इराद्यांचा प्रतिनिधी असतो. एखाद्या मोठ्या उत्पादक कारखानदारीमधला सर्वोच्च पदावरचा माणूस, त्याच्या वागणुकीचा दर्जा, विचारांची पद्धत, सामान्य माणसाला त्या उत्पादनातून कळते, तसंच आहे. न्यायव्यवस्थेचा दर्जा, शिस्त, इरादे सगळे स्पष्ट होतात ते न्यायाधीशांच्या वागणुकीमुळे.

न्यायाधीश दिलेला शब्द, वेळ पाळत नाहीत. खटल्याची तारीख कोर्टात सगळ्यांच्या देखत ठरते. संबंधित सगळे लोक कुठून कुठून धडपड करून, वेळ आणि पैसे खर्चून येतात. कोर्टात आल्यावर कळतं की, आज न्यायाधीश रजेवर आहेत. साध्या भाषेत बोलायचं तर 'यथा राजा तथा प्रजा'. न्यायाधीशांना जबाबदारी समजत नसेल तर तोच गुण क्लार्क लोकं, वकील सगळ्यांमधे

झिरपतो. भारतीय जनताही तशीच वागते.

त्याखेरीज न्यायाधीशांच्या सारख्या बदल्या होतात. नवीन येणाऱ्या न्यायाधीशाला चालू खटल्यात काही रस नसतो, हे वागणुकीत स्पष्ट दिसतं. मी असं ऐकलं आहे की, राजकारणातल्या मोठ्या व्यक्ती विशिष्ट खटल्याचा काय, केव्हा निकाल लागला पाहिजे हे ठरवतात. ते ठरवताना वाटाघाटी, व्यवहार पूर्ण झाले की, आता खटला निकाली काढायचा असं ठरतं. न्यायाधीशांच्यात दोन मुख्य प्रकार असतात. निकाल देणारे आणि निकाल पुढे ढकलणारे, म्हणजेच वेळ काढणारे. वेळ काढणाऱ्यांची संख्या जास्त असते. ते न्यायाधीश काही न करण्याचं काम तेवढं चोख करतात.

न्यायालयाच्या खोल्या एखाद्या शाळेच्या वर्गाएवढ्या किंवा जरा मोठ्या असतात. न्यायाधीश आणि कारकून यांच्यासाठी उंच प्लॅटफॉर्म, उरलेल्या भागात वकील, अशील यांनी बसण्याची सोय असते. न्यायाधीश आणि वकील, न्यायाधीश आणि कारकून जे बोलतात ते मागे बसलेल्यांच्या दृष्टीनी हळू आवाजात केलेली कुजबुजच असते. प्रश्न असा पडतो की, मग एवढ्या लोकांचा दरबार कशासाठी भरवलेला असतो?

खोलीत जेवढे लोक हजर असतील तेवढ्यांना संभाषण ऐकू जायला हवं असलं आणि तरी न्यायाधीशाच्या आवाजावर ताण पडायला नको असेल तर माइकची सोय असायलाच हवी. निदान थांबलेल्या लोकांचा मिळालेल्या ज्ञानामुळे थोडातरी फायदा होईल. वकिलांची मुद्दा मांडण्याची पद्धत, न्यायाधीशाची विचार करण्याची पद्धत कळेल. सध्याच्या परिस्थितीत यातलं काहीच साध्य होत नाही.

मी 'मॅनेजमेंट' क्षेत्रातला माणूस आहे. हेतूशिवाय कुठचीही गोष्ट चालू असेल, यावर माझा विश्वास नाही. एवढ्या मोठ्या दरबाराचा हेतू मला एकच दिसतो. इथे सगळ्यांसमोर सगळ्या गोष्टी चालू असतात म्हणजे इथे भ्रष्टाचार नसेल, असं व्यक्त करण्यासाठी दरबार असतो. प्रत्यक्षात अठ्ठ्याण्णव टक्के न्यायाधीश पैसे घेऊन निकाल देतात, असं कानावर येतं.

कोर्टाच्या दरबारातल्या वातावरणात कुठच्याही माणसाचं चित्त एकाग्र होऊ शकेल, यावर माझा विश्वास नाही. मी मानसशास्त्र शिकलेला असल्यामुळे चित्त एकाग्र करून शांत डोक्यानी साधकबाधक गोष्टींचा एकत्रित विचार केल्याशिवाय कुठच्याही गोष्टीचा नीट निर्णय होऊ शकत नाही, हे मला माहीत आहे. माझ्या मते, एका टेबलाभोवती बसून संबंधितांनी एकत्र मुद्देसूदपणी बोलणं हीच

निर्णयाची योग्य पद्धत आहे. यासाठी 'आर्बिट्रेशन'ची सोय असते. पण शेवटी कोर्टात जावंच लागतं. त्यामुळे लोक आर्बिट्रेशनच्या फारसे फंदात पडत नाहीत. कोर्टानी देखील वार वेळ ठरवून टेबलाभोवती बसून न्याय देण्याच्या पद्धतीत मला काहीच चूक दिसत नाही.

व्यवस्थापनशास्त्रात कागदोपत्री रेकॉर्ड्स कशी ठेवायची, कशी सांभाळायची याची पद्धत शिकवलेली असते. माझ्या स्वतःच्या खटल्यासाठी मी कोर्टात गेलेलो असताना इतर कोणाची कागदपत्रं मी बघण्याचा प्रश्नच नव्हता. पण खुद्द माझ्या खटल्याची कागदपत्रं बघायचा प्रयत्न केला तेव्हा एकतर क्लार्कच्या टेबलाभोवती गराडा होता. क्लार्कचं कशाकडेही नीट लक्ष असणं शक्यच नव्हतं आणि त्यांना वेळही नव्हता, हे स्पष्ट होतं. 'त्या कपाटात तुमची केस आहे का बघा' या उत्तरासरशी एक कळलं की माझ्यासारखे 'इतर' लोकदेखील कपाटातली कागदपत्रं स्वतः काढून बघू शकतात. माझ्या दृष्टीनी 'सिस्टिम' तिथेच नापास झाली. क्लार्कची अवस्था प्रचंड ताणाखाली आणि भांबावलेली होती. जमलेल्या सगळ्यांचा वेळ वाया जात होता. सारांशात सांगायचं तर कोर्टातली एकूण व्यवस्था बघितली तर 'कसं काम करू नये', याचं हे उत्तम उदाहरण सांगता येईल.

कोर्टाच्या बाबतीत एक गोष्ट सामान्यज्ञानाला अगदी न पटणारी दरवर्षी घडत असते. उन्हाळ्याची सुटी. ब्रिटिशांच्या राज्यात कोर्टाला उन्हाळ्याची सुटी का चालू झाली असेल ते आपण समजू शकतो. गोऱ्या लोकांना भारतातला उन्हाळा सहन व्हायचा नाही. पण आता हे बुद्धीला पटण्याजोगंच नाही. वर्षभर जर अन्याय करण्याचं काम जनता इतक्या इमानेइतबारे चोखपणी करतेय, तर न्याय करण्याच्या कामाला सुटी कशी देता येईल?

भारत देशात खटल्यांची संख्या प्रचंड, त्यामानानी कोर्टं कमी, न्यायाधीश अपुऱ्या संख्येनी अशी परिस्थिती असल्यामुळे खरं काहीतरी घडायला काही वर्षं सहज लागतात. हे असं सरळ न सांगता, कोर्टाकडून तारखा मिळतात. त्या तारखांना काही घडत नाही. नुसता सगळ्यांचा वेळ, पैसे, शक्ती सगळं वाया जातं. असं कितीतरी वेळा होतं. महिनोन्महिने, वर्षन्वर्षं कोर्ट फिर्यादीला, वकिलांना नुसतं झुलवतं. न्याय यंत्रणेनी केलेली जनतेची ही फसवणूकच आहे.

मी स्वतः कधी कोणाला असं फसवत नाही, कोणीही मला फसवलेलं आवडत नाही. माझ्या मते, जेवढी वर्षं लागणार असतील त्याबद्दल कोर्टानी स्पष्ट सांगावं. काही वर्षांनंतरची तारीख, वेळ ठरवावी आणि अर्थात, ती सगळ्या

संबंधितांनी पाळण्याचं कायद्यानी बंधनकारक करावं. त्या ठरलेल्या तारखेला खटला चालू करून, खटल्याच्या स्वरूपाप्रमाणे काही दिवसांत, काही महिन्यांत त्याचा निकाल द्यावा. ही झुलवण्याची आणि नैतिक फसवणुकीची पद्धत थेट राजकारणातल्या सर्वोच्च पदावरून झिरपत झिरपत खालपर्यंत पोहोचलेली असते, असंच मला वाटतं.

मगाचचंच वाक्य पुन्हा आठवूया. 'शहाण्यानी कोर्टाची पायरी चढू नये' याबद्दल माझं मत सांगतो. कायद्याप्रमाणे प्रत्येक प्रकरण विशिष्ट काळानंतर 'टाइम-बार' होतं. टाइम-बार होण्याच्या दिवसापर्यंत प्रत्येकानी तडजोडीनी मार्ग काढण्याचा आटोकाट प्रयत्न करावा. मध्यस्थाकडे प्रकरण सोपवावं, स्वतः पुन्हा पुन्हा भेटून मार्ग काढण्याचा प्रयत्न करावा. पण शक्यतोवर कोर्टाची पायरी न चढण्याचा शहाणपणा करावा. महात्मा गांधी वकील होते हे आपल्याला माहिती आहे. गरवारे बालभवननी प्रकाशित केलेल्या आणि शोभानी अनुवाद केलेल्या बहुरूप गांधी या पुस्तकात उल्लेख केला आहे की ते लोकांना कोर्टात न जाण्यासाठी, त्यांचं मन वळवण्यासाठी आटोकाट प्रयत्न करायचे.

एक गोष्ट अगदी पटण्याजोगी आहे. कायदा मोडणाऱ्यांची, गुन्हेगारांची संख्या इतकी आहे की, तेवढे पोलीस, न्यायाधीश, न्यायालयं निर्माण करणं अशक्य आहे. तेवढे वकील निर्माण होऊ शकतील, बहुधा आत्तासुद्धा वकील पुरेशा संख्येनी आहेत. त्यांचा स्वतःचा व्यवसाय असल्यामुळे ती अडचण नाही. या सगळ्याचा परिणाम म्हणजे खटल्याच्या निकालाला अनेक वर्षं लागतात. खटला भरणाऱ्या कित्येकांची हीच खरी ताकद असते. प्रतिपक्षाला खेटे मारायला लावणं, वेळ काढणं, अडकवणं आणि जेरीला आणणं, हाच खटला भरण्यामागे उद्देश असतो.

मानसशास्त्राच्या दृष्टिकोनातून जन्मलेल्या प्रत्येक माणसाला चांगलं, सज्जनपणी जगण्याचीच इच्छा असते. जेव्हा माणूस काहीतरी चुकीची गोष्ट, अन्याय, गुन्हा करतो तेव्हा तो मनोविकृतीचा बळीच असतो. व्यक्तिमत्त्वातले काही भाग, काही प्रवृत्ती जन्मजात असतात, पण गुन्हेगार बनण्याची इच्छा कधीच कोणाची नसते.

याखेरीज छोट्या किंवा निराळ्या प्रकारच्या अन्याय्य वागणुकीसाठी निराळी छोटी कोर्टं असतात आणि ती सगळी बदनाम झालेली असतात. 'लेबर कोर्ट' निराळ्या ठिकाणी असतं. तिथे फक्त लेबरचीच बाजू घेतात असं दिसतं. 'कन्झूमर कोर्ट' असतं. तिथे फक्त कन्झूमरचीच बाजू घेतात असं मी प्रत्यक्ष

अनुभवावरून सांगू शकतो. अशा पक्षपाताला न्याय म्हणताच येत नाही. 'फॅमिली कोर्ट' हे निराळं कोर्ट असतं. शक्यतोवर तिथे स्त्रियांच्या बाजूनी निकाल देण्याची पद्धत असते. त्यामुळे पुरुषावर अन्याय झाल्याची खूप उदाहरणं सापडतात.

मी वकील नाही. न्यायव्यवस्थेवर टीका करण्याचा मला काय अधिकार, असं म्हणता येईल. मी एक नागरिक तर आहे ना? तत्त्वज्ञानातली एक गोष्ट अभ्यासक म्हणून मला माहिती आहे. 'कायद्याचा जिथे कमीतकमी वापर करावा लागेल ते म्हणजे सुराज्य.'

एके काळी नव्हता पण पुढे विवाहाबद्दल सुद्धा कायदा झाला. कायदेशीर विवाहाचं वय हे सगळं सरकारनियंत्रित झालं. अगदी अलीकडे अलीकडे विवाहाच्या वयाच्या कायद्याच्या अंमलबजावणीला सुरुवात झाली. कायदा अस्तित्वात येण्यापूर्वी एका पुरुषाला अनेक बायका हे समाजमान्य होतं. ज्या लोकांनी त्या आधी लग्नं केली आहेत त्यांना दोन किंवा तीन बायका हिंदू समाजातही होत्या. अजूनही आहेत. कायदासुद्धा हिंदूंचा कायदा, मुस्लिमांचा कायदा आणि असाच इतर धर्मांचाही निराळा कायदा, असं सगळं व्हायला लागलं. जीवनसाथमधे 'विवाह आणि कायदा' या विषयाबद्दल मधूनमधून कार्यशाळेची मागणी असते. जीवनसाथच्या सभासदांपैकी काही वकील अशा कार्यशाळांचे सूत्रधार असतात.

लोकांचं भलं करण्याच्या हेतूनी भारत सरकारनी काही कायदे केले; काही थोडेसे उपयोगी, काही देशाचं वाटोळं करणारे. 'अर्बन लॅन्ड सीलिंग'चा कायदा हा भारताच्या इतिहासातला सर्वांत जास्त बरबादीचा कायदा ठरला. जमिनींच्या, घरांच्या किमती कायमच्या वाढून बसल्या.

पुणे शहर पातळीवर 'बी.आर.टी.' नावाची योजना पुणे शहराची वाट लावण्याचं काम सध्या जोरात करत आहे. टाऊन प्लॅनिंग या विषयातल्या जगभरच्या वाहतुकीबद्दलच्या संशोधनात काय करायचं नाही, ते अगदी स्पष्ट सांगितलेलं आहे. 1) निरनिराळ्या वेगांची वाहनं चालवण्याचे पट्टे स्वतंत्र करायचे. त्यांना एका पट्ट्यातून जाऊ द्यायचं नाही. 2) आकारानी मोठी म्हणजे बस, ट्रक सारखी वाहनं ज्या पट्ट्यावरून जाणार त्या पट्ट्यावर छोट्या वाहनांना जाऊच द्यायचं नाही. 3) मोठ्या आकाराच्या बससारख्या वाहनांच्या पट्ट्याला छेदून आडवी जाणारी वाहनं म्हणजे निखालस धोका. ट्रक किंवा बसच्या समोरून रस्ता ओलांडण्यासाठी छोट्या वाहनांनी आडवा प्रवास तर पूर्ण टाळण्याची गोष्ट. या सगळ्या न करण्याच्या यादीतल्या गोष्टी पुण्याच्या बी.आर.टी.मधे

आहेत. ‘टाऊन प्लॅनिंग’, ‘वाहतुकीच्या नियोजनाचं शास्त्र’ जाणणारे लोक बी.आर.टी.सारखी विनोदी आणि वाटोळं करणारी सध्या दिसते तशी योजना शुद्धीवर असताना कधीही बनवणं किंवा मान्य करणं शक्य नाही.

मगाशी मी अमेरिकेतल्या पोलिसांचं उदाहरण सांगितलं तसं अगदी क्वचित भारतातही आढळतं, हे मला कबूल करायलाच हवं. पण असा एखादा पोलीस सोडला तर बाकी सगळी पोलीस यंत्रणा भ्रष्टाचारानी बरबटलेली आहे. भारतात सर्वसाधारणपणी दिसणारा ढेरपोट्या आणि पैसेखाऊ पोलीस एखाद्या गुन्हेगाराच्या मागे पळत जाऊन त्याला पकडेल यावर जनतेचा अजिबात विश्वास नाही.

1986 साली 2000 सालानंतरचं पुणं कसं असेल, याबद्दल सेमिनार झाला होता. त्याचा मी आधी उल्लेख केला आहे. त्या काळात माझ्या पोलीस मुख्यालयामधे प्रमुख अधिकाऱ्यांबरोबर बैठका झाल्या होत्या. इतर अनेक मुद्द्यांबरोबर भ्रष्टाचाराचाही मुद्दा निघाला होता. ते अधिकारी पोलिसांच्या बाजूनी काही मुद्दे मांडत होते. त्यातले दोन मुद्दे मला महत्त्वाचे वाटले. एक – पोलिसांना पगार कमी असतात. दोन – त्यांचे कामाचे तास खूप आणि अनियमित असतात. ते अधिकारी भ्रष्टाचाराचं समर्थन करत नव्हते, तर भ्रष्टाचाराची कारणं सांगत होते.

आणखी एक त्यांनी न सांगितलेलं कारण मला माहीत आहे. मला ते सर्वांत महत्त्वाचं वाटतं. मुळात देशाची लोकसंख्या आणि पोलिसांची संख्या यांचं प्रगत देशांमध्ये प्रमाण ठरलेलं असतं. भारतामधे कायदा तोडणाऱ्यांची संख्या इतकी प्रचंड आहे की, योग्य त्या प्रमाणात पोलिसांची नेमणूक करणं शक्य नाही. दुर्दैव असं की, कायदा मोडणाऱ्यांची संख्या रोज वाढते आहे. ‘प्रत्येक नियम हा पाळण्यासाठी असतो’ असं म्हणणाऱ्या माझ्यासारख्या माणसाला लोक मनातल्या मनात हसतात.

शेवटी पुन्हा एकदा सांगतो. या इतक्या बिघडलेल्या न्याययंत्रणेत अजूनही, अगदी थोडे का होईना, चांगले, प्रामाणिक, अपवादात्मक लोक आहेत. त्यांच्या आधारावर, त्या आशेवर भारत देश अजून सांस्कृतिकदृष्ट्या बेचिराख होण्यापासून बचावला आहे.



# 14

# स्वतःच्या आयुष्याविषयी समतोल विचार

पूर्वी म्हणाल्याप्रमाणे तत्त्वज्ञानापासून इतर सगळ्या विषयांचा जन्म झाला असं म्हणतात. हे मान्यच आहे की, माणूस हा प्राणी इतरांपेक्षा निराळा आहे, त्याला सारासार विचाराची क्षमता आहे. त्यामुळे सारासार विचारातूनच तत्त्वज्ञानाचा जन्म झाला असंच म्हणावं लागेल.

तत्त्वज्ञानामधे वास्तववादी विचाराला फार महत्त्व आहे. भूतकाळ, वर्तमानकाळ, भविष्यकाळ तिन्हीचा विचार करून निर्णय घेण्याची क्षमता ही अपेक्षा आहे. मानसशास्त्रामधे हीच गोष्ट म्हटलेली आहे आणि व्यवस्थापनशास्त्रही तेच सांगतं. वास्तववादी विचार आणि सारासार विचार या अगदी जवळच्या गोष्टी आहेत. या पुस्तकसंचात 'व्यक्तिमत्त्वाचे 6 प्रकार' या लेखात सारासार विचाराची क्षमता तपासण्यासाठी मी तयार केलेली एक चाचणीदेखील दिलेली आहे.

ज्या निरनिराळ्या गोष्टींवरून वास्तववादी विचार आहेत का नाही, ते कळतं त्यातली एक छोटी गमतीची गोष्ट सांगतो. घरातलं भिंतीवरचं घड्याळ, हातावरचं घड्याळ खऱ्या वेळेपेक्षा थोडं मागे ठेवणारी लोकं असतात. ते घड्याळ दुरुस्त करण्याच्या भानगडीतही पडत नाहीत. असे लोक भूतकाळाच्या आठवणीत जास्त रमणारे समजावेत. जे लोक घड्याळ थोडं पुढे ठेवतात ते भविष्यकाळाची जास्त चिंता करतात, असं ओळखावं. आणि जे लोक घड्याळ बरोब्बर वेळेप्रमाणे लावतात त्यांचं सध्याचे प्रश्न आणि त्यांचं नियोजन याकडे वास्तववादी पद्धतीनी जास्त लक्ष असतं, असं समजायला हरकत नाही.

वास्तववादी विचार या कल्पनेचा अभ्यास करताना मगाशी म्हणालेल्या तीनही शास्त्रांत याचा परामर्श घेतलेला आहे. तत्त्वज्ञान, मानसशास्त्र आणि व्यवस्थापनशास्त्र हे तीनही विषय माझ्या अभ्यासाचे असल्यामुळे मी त्याबद्दल

नक्की सांगू शकतो की, याशिवाय दुसरा पर्याय खरं म्हणजे नसतोच. काही लोकं ठामपणी म्हणतात की, सकारात्मक विचारसरणी हा आयुष्य जगण्याचा मार्ग आहे. आपण सगळ्यांनीच लहानपणापासून सकारात्मक विचार केला पाहिजे, हे पदोपदी ऐकलेलं आहे. तरीही काही लोकं पूर्ण नकारात्मक विचाराकडे झुकलेले असतात. या बाबतीतला योग्य दृष्टिकोन कसा हवा, याबाबतीत प्रथम मी व्यवस्थापनाच्या शिक्षणात शिकलो. योग्य दृष्टिकोन सकारात्मकही असता कामा नये आणि नकारात्मकही नाही. होकारात्मक आणि नकारात्मक दोन्ही दृष्टिकोनातून एकाच वेळी घटनेकडे बघता येणं, याच पद्धतीनी योग्य निर्णय घेणं शक्य असतं.

जीवनसाथमधे आयुष्यात येऊ शकणाऱ्या 55 प्रश्नांची एक यादी तयार असते. मागणीप्रमाणे ते विषय आळीपाळीनी गटचर्चेला घेतले जातात. खरं सांगायचं तर हे सगळे विषय तत्त्वज्ञानातलेच आहेत आणि या सगळ्या विषयांवर समतोल विचारांकडे जमलेल्यांना नेण्याचा जीवनसाथचा कायम प्रयत्न असतो. एवढ्या 55 विषयांवर इतर अनेक लोकांचे विचार काय असू शकतात, त्यातला आपला विचार कुठचा हे त्याच्या कारणासकट स्पष्ट होणं म्हणजे प्रगल्भता. पण या गटचर्चांशिवाय ती प्रगल्भता येत नाही. जीवनसाथमध्ये याखेरीज 5 विषय समुपदेशनाच्या पद्धतींबद्दलही असतात.

बहुतेक लोकांच्या तोंडात काही वाक्यं बसलेली असतात. तत्त्वज्ञानाच्या दृष्टिकोनातून अशा वाक्यांना काही अर्थ नसतो. एक-दोन वाक्यं सांगतो. 'काळजी करू नका, सगळं ठीक होईल' किंवा 'परीक्षेसाठी शुभेच्छा' या दोन्ही उदाहरणांतून तुम्ही त्या व्यक्तीचे हितचिंतक आहात, हे स्पष्ट होतं. पण सगळं ठीक हेही पूर्ण खरं कधीच असू शकत नाही आणि तुमच्या शुभेच्छांमुळे दुसऱ्याच्या परीक्षेतल्या यशावर काही परिणाम होईल हे पण शक्य नाही. हीच वाक्यं समतोल पद्धतीनी मांडायची तर ती अशी होतील. 'तुमचा हा प्रश्न लवकर सुटावा अशी माझी इच्छा आहे.' आणि 'परीक्षेत तुम्हाला चांगलं यश मिळावं अशी माझी इच्छा आहे.'

आणखी काही वाक्यं खूप लोकप्रिय आहेत, पण त्यानी खूप घोटाळे करून ठेवलेत. इंग्लिशमधे म्हणतात, 'बी पॉझिटिव्ह.' मराठीत म्हणतात, 'हसण्यासाठी जन्म आपुला', 'माणसानी सतत हसत राहावं'. असं खरोखर कोणी वागलं तर त्या माणसाला लोकं हसतात त्याचं काय? माझ्या मते,

समाजाला 'पॉझिटिव्ह' शब्दाचं आकर्षण आहे. फक्त 'पॉझिटिव्ह' विचार अशक्य आहेत हे सगळ्यांना कळतं. पण पॉझिटिव्हच्या तुलनेत 'बॅलन्स्ड' शब्दाचं एवढं आकर्षण नाही.

समतोल विचारांचा आणि प्रतीकांचा मला संबंध दिसतो तो सांगतो. ज्या प्रतीकांची सवय नाही, जे प्रतीक ओळखीचं नाही ते पाहिलं की माणूस बिचकतो आणि समतोल घालवून बसतो. स्थितप्रज्ञ माणसाचं असं होत नाही. निरनिराळ्या लोकांच्या निरनिराळ्या पद्धती, प्रतीकं असतात याची त्याला कल्पना असते. त्यामुळे तो शांत राहू शकतो.

इथपर्यंत हा विषय समजण्यात फार काही अडचण नाही. जसा एखाद्या राष्ट्राचा ध्वज तसा राष्ट्रीय प्राणी, पक्षी, तसंच त्या त्या धर्माच्या लोकांचं प्रतीक. इथपर्यंत तत्त्वचिंतनात मतभेदाचा मुद्दा येत नाही. काही प्रतीकं संपूर्ण मानवजातीला लागू असतात. उदा. हसण्याची क्रिया म्हणजे संतोष व्यक्त करणं. डोळ्यातून अश्रू म्हणजे दुःख होणं. पण याला प्रतीक म्हणता येत नाही. कारण ती गोष्ट निसगनिर्मित आहे, मानवनिर्मित नाही. पण दोन्ही हात जोडून नमस्कार करणं किंवा हात हलवून पुन्हा भेटू असं व्यक्त करणं हे मानवनिर्मित प्रतीक आहे. प्रतीकात त्या त्या ठिकाणाप्रमाणे फरक असू शकतात. उदा. संपूर्ण कॉकेशियन म्हणजेच गोऱ्या लोकांच्यामधे उजव्या हातानी शेकहँड करतात. जपानी माणसं हाताचा वापर न करता कमरेतून खाली वाकतात. ही सगळी प्रतीकं आणि तत्त्वचिंतन ह्यांचं काही भांडण नाही. पण एखाद्यानी हस्तांदोलन करायला नकार दिला आणि त्यामुळे दुसऱ्याचा अपमान झाला तर ती गोष्ट तत्त्वज्ञानाला मान्य नाही. समतोल वागणुकीत, समतोल व्यक्तिमत्त्वाच्या कल्पनेत ते बसत नाही.

सारासार समतोल बुद्धीबद्दल विचार करताना शिक्षणानी नेमकं काय साध्य होतं, हे जरा बघूया. संपूर्ण औपचारिक शिक्षणात एका गोष्टीचे अनेक पर्याय बघण्याची सवय लावलेली असते, संयमित भाषा वापरण्याची सवय असते. असंस्कृत माणूस म्हणजे विचार आणि भावना भडकपणे मांडणारा. समतोल वागणुकीत आणखी एक गोष्ट अपेक्षित असते. राग, दुःख, आनंद, कुतूहल, मत्सर हे सगळं कुठच्याही घटनेबद्दल स्वतःला वाटतं त्या भावना. दुसऱ्याच्या भावना समजणं हा विचार झाला. थोडक्यात, स्वतःच्या भावनांची तीव्रता व्यक्त करताना मर्यादा सांभाळणं आणि दुसऱ्याच्या भावना समजून त्याविषयीची स्वतःची समज व्यक्त करणं, ही समतोल वागणूक.

जीवनसाथ अभ्यास मंडळात स्वतःच्या विचारांबद्दल रास्त आत्मविश्वास आणि दुसऱ्यांच्या मतांबद्दल, विचार पद्धतीबद्दल आदरानी उल्लेख याचं महत्त्व आम्ही संपूर्ण गटाला आवर्जून सांगतो. ही गोष्ट जमावी यासाठी तर अभ्यास मंडळ आहे. समतोल वागणूक याचा अर्थ 'मध्यम मार्ग' ही काही लोकांची झालेली गैरसमजूत आहे. समतोल वागणूक म्हणजे स्वतःचा ठाम विचार आणि दुसऱ्याचा विरोधी विचार असला तरी त्याविषयीचा आदर. मध्यम मार्ग म्हणजे बोटचेपी, मिळमिळित 'टेंटेटिव्ह' वागणूक.

विवाहयोग्य स्थळाशी चर्चा करताना मुलगा-मुलगी भेटतात तेव्हा काय आणि कशा पद्धतीनी बोलावं, याबद्दल दोन मुख्य प्रवाह आहेत. मध्यम मार्गी प्रवाहाच्या म्हणण्याप्रमाणे स्वतःचं म्हणणं ठामपणे मांडायचं नसतं. 'अॅप्लाइड सायकॉलॉजी'चा मुळातला आग्रह असा आहे की, स्वतःला काय म्हणायचं आहे ते ठामपणे म्हणा. त्यानी समतोलपणात बाधा येत नाही. मुद्दा अर्धवट मांडणं हा भित्रटपणा झाला. त्यामुळे फायद्यापेक्षा तोटे जास्त असतात.

आता विवाह या संबंधात ज्या निरनिराळ्या महत्त्वाच्या विचारांचा संबंध येतो त्याचा समाचार घेऊ आणि त्यातून समतोलाची व्याख्या पुन्हा पडताळून पाहू. विवाह संबंधातले काही महत्त्वाचे प्रश्न असतात. त्याबद्दलच्या विचारांच्या स्पष्टपणासाठी 'कॅटॅगरीज' हा खूप मनोरंजक, उद्‌बोधक असा सुंदर खेळ जीवनसाथनी शोधून काढला आहे. प्रत्येक कॅटॅगरीमध्ये दोनच बाजू ठेवलेल्या असतात. त्या विधानाच्या बाजूनी किंवा विरोधात असे दोनच विचारगट असतात. छोटे, मध्यम, महत्त्वाचे अनेक विषय त्यात येतात. काही विषय उदाहरण म्हणून इथे देतो. काही विषयांचा वरवर बघता विवाहाच्या प्रश्नाशी संबंध नसतो, पण विचारपद्धतीशी असतो.

1) भीक द्यावी किंवा न द्यावी, 2) मांसाहार योग्य का शाकाहार योग्य, 3) मायदेशातच राहावं की परदेशात स्थायिक व्हावं, 4) मातृभाषेतून शिक्षण योग्य का इंग्रजी माध्यमातून, 5) लहानपणी घरीच राहावं की हॉस्टेलमधे, 6) मुला-मुलींच्या शाळा एकत्र असाव्यात की स्वतंत्र.

त्यानंतर विवाह या विषयाचा प्रत्यक्ष संबंध असलेले प्रश्न – 1) लग्नसमारंभ छोटा की मोठा, 2) स्त्रीनी करिअर करावी का नाही, 3) पत्रिका बघायची की नाही, 4) जात या विषयाला स्थळ बघताना महत्त्व द्यायचं का नाही.

गटातली लोकं यावर 2 गट करून खूप वाद घालतात. दुसरी बाजू

ऐकायला मिळाल्यामुळे त्यातून जन्मतो तो मात्र पूर्वीपेक्षा अधिक समतोल विचार. म्हणजेच वैवाहिक आयुष्याचा खरा आधारस्तंभ.

एक खूप महत्त्वाचं तत्त्व आहे. आयुष्यभर त्याचा उपयोग करण्याची जरूर आहे. 'कुठचीही गोष्ट अकस्मात होत नाही. त्याचे टप्पे असतातच.' याचा अर्थ समजावून घेतला की खूप गोष्टी सोप्या होतात. जेव्हा एखादं कठीण काम समोर असेल तेव्हा त्याचे भाग करायचे आणि त्यातल्या छोट्या भागाचाच फक्त विचार करायचा. छोट्या भागासाठीच तारीख, वेळ, पद्धत ठरवायची. तो भाग, ती तारीख अशी निवडायची की त्यात नक्की यश मिळालं पाहिजे. त्यामुळे हुरूप येतो. मग दुसऱ्या भागाचा विचार करायचा. मग तिसरा, मग चौथा. या पद्धतीनी अशक्य वाटणारी कामं शक्य करण्याच्या खास तंत्रामधे तर मी 'कन्स्ट्रक्शन मॅनेजमेंटचा' व्यवसाय अनेक वर्षं करत होतो.

जीवनसाथमधे अनेक विषयांच्या तपशीलवार मिश्रगट चर्चा चालतात. त्यात योग्य काय आणि अयोग्य काय, याबद्दलचं प्रत्येकजण प्रत्येक बाबतीत मत मांडतं. जे योग्य ते सर्व प्रसंगी योग्यच असतं नि जे अयोग्य ते कधीच करता कामा नये, हे सगळ्यांना मान्य असतं. प्रत्यक्ष वागताना यामधे काहीही फरक होता कामा नये म्हणता म्हणता परिस्थितीप्रमाणे फरक करावे लागतात आणि मग खऱ्या अडचणीच्या विषयाला सुरुवात होते. सुवर्णमध्य प्रत्येकालाच हवा असतो, पण तो मध्य ठरवायचा कसा आणि तो सुवर्णमध्य आहे का नाही, हा निर्णय कसा घ्यायचा?

प्रत्येक माणसानी स्वतःचा, आपल्या जोडीदाराचा, कुटुंबाचा विचार केलाच पाहिजे. तेवढं सांभाळून लोकांसाठी कितीही कामं करावीत. याचं समजायला सोपं उदाहरण म्हणजे विमानप्रवासात आणीबाणीच्या प्रसंगासाठी देतात ती सूचना. 'प्रथम स्वतःचा ऑक्सिजन मास्क नीट लावा आणि मग शेजारच्यांना मदत करा.' दुसरं उदाहरण म्हणजे हिंदीमधली एक म्हण– 'सर सलामत तो पगडी पचास.' हे तत्त्व माहिती असूनही काही लोकांचा स्वार्थ-परार्थाचा तोल कधीकधी चुकतो. त्याचं मूळ कारण भिडस्तपणा हे असतं. शिवाय लोकसंग्रहाचा मोह त्या व्यक्तीला नडतो. कुटुंबाला पुरेसा वेळ दिला जात नाही आणि बाहेरच्यांनाच प्राधान्य दिलं जातं. कित्येक वेळा कौटुंबिक विसंवादाचं ते कारण बनतं.

समतोल विचारांच्या अभ्यासामधे नवरा-बायकोचं नातं खास अशासाठी

मानलेलं आहे की, नवरा-बायको दोघंही स्वावलंबीही असावे लागतात आणि त्यांना एकमेकांची गरजही असावी लागते. एकमेकांना एकमेकांची गरज नसली तरी संसार नीरस होतो आणि दोघं स्वावलंबी नसले, एकमेकांवर फार अवलंबून असले तरी विसंवाद निर्माण होतात. त्यासाठी नवरा-बायकोमधल्या समतोल नात्याचा खास अभ्यास करावा लागतो. हेही खरं की, जोडीदाराला स्वतःची गरज असण्याचीच गरज असते. या सगळ्यातून मार्ग काढून संसार करायचा असतो.

नवरा-बायकोचं नातं अलिप्त असलं तरी चालत नाही. बेपर्वाई तर अजिबातच चालत नाही. दुसरं टोक म्हणजे जोडीदाराची सतत काळजी केली, सतत लक्ष दिलं तरी जोडीदाराला तो पहारा वाटायला लागतो. कारण योग्य तेवढं दुर्लक्ष म्हणजेच स्वातंत्र्य ही नवरा-बायकोची गरजच असते. ते समजलं तर समतोल साधला जातो.

माझी स्वतःचीच या बाबतीतली पंचाईत सांगतो. गेली 7-8 वर्षं माझं स्वतःच्या वजनावरचं नियंत्रण निसटलं. साधारण 10 किलोंनी वजन वाढलं. सविस्तर उदाहरण द्यायचं असल्यामुळे अगदी थोडक्यात पण नेमकं सांगतो. शोभा तिच्यावरच्या संस्कारांमुळे कुठचाही खाद्यपदार्थ कमी बनवूच शकत नाही. आम्ही दोघंच घरात असतो. मी शक्यतोवर पदार्थ वाया जाऊ देत नाही. या दोन्ही कारणांमुळे जास्त खाल्लं जातं. मला स्वयंपाक येत नाही. शोभाला वेळ नसतो. यामुळे खाद्यपदार्थांचे 'शॉर्टकट्स' काढले जातात. त्यामुळे खाल्लेले पदार्थ आरोग्यासाठी चुकीचेही असू शकतात. याही कारणामुळे वजन कमी होत नाही. याशिवाय मी गेली अनेक वर्षं 'मायग्रेन पेशंट' आहे. न खाल्ल्यामुळे डोकं दुखण्याची सतत भीती वाटत राहते. घरात असताना त्यामुळे काहीतरी खाल्लं जातं. शिवाय मला सर्व पदार्थ आवडतात. हे सगळं असलं तरी वजन कमी करायलाच हवं, हे मला समजतं. प्रत्यक्षात तो समतोल, सुवर्णमध्य काही केल्या निघत नाही.

एक साधा विचार सांगतो. 'सर्व गुणांपैकी सारासार विचार हा सर्वश्रेष्ठ गुण आहे.' माणसांचे, स्वभावाचे प्रकार ठरवण्याचे कितीही आडाखे असले तरी प्रत्यक्षात समोर येणारं प्रत्येक माणूस, प्रत्येक प्रसंग, प्रत्येक क्षण निराळाच असतो. याबद्दल समतोल विचार सांगितला की, समतोलाची व्याख्याच स्पष्ट होईल. माणसाचे अमुक इतके प्रकार असतात, त्यामुळे सगळी माणसं त्या साच्यात बसणार, हे विचाराचं एक टोक झालं. प्रत्येक माणूस निराळा असतो,

त्यामुळे माणसांचे स्वभावाचे प्रकार असूच शकत नाहीत, हे दुसरं टोकं झालं. मुळात हे प्रकार असतात. त्याचा आधार घेऊन त्यापेक्षा निराळं त्या माणसात काय आहे हे शोधूया, हा समतोल विचार झाला. समतोल विचार आणि सारासार विचार एकच.

रोमेनिया नावाच्या 'आयर्न कर्टन' पलीकडच्या एका देशामधली एक म्हण आहे. त्याचा अर्थ असा, 'ज्या हाताला चावता येत नाही त्या हाताचं चुंबन घ्या.' शब्द जरा भडक आहेत, पण अर्थपूर्ण आहेत. अशा रोज आपण आपल्या आयुष्यात कित्येक गोष्टी करतो. आपली खरी इच्छा असते समोरच्या नाठाळाला धडा शिकवण्याची. प्रत्यक्षात मात्र आपण त्या व्यक्तीला नमस्कार करतो.

अनेक निरनिराळ्या प्रश्नांविषयी 'समतोल' शोधण्यापूर्वी आपण पूर्वी बघितलेल्या प्रथम दर्शन, द्वितीय दर्शन, तृतीय दर्शन या कल्पनेच्या आधारानी काही व्याख्या स्पष्ट करूया. बाह्यरूप म्हणजे चेहरा, रंग, रूप, बांधा. फार सुंदर स्त्री किंवा पुरुषाला आपल्या असामान्य रूपामुळे आत्मविश्वास मिळाला तरी एरवी त्रास होणार. त्या स्त्रीच्या मागे अनेक पुरुष लागणार. तिचा नवरा तिच्याविषयी संशय घेणार. तिला सामान्य माणसासारखी वागणूक, कामधंदा, नोकरी मिळणार नाही. नाटक, सिनेमात कामं मिळाली आणि अभिनय गुण, नशीब असल्यामुळे प्रसिद्धी मिळाली तर त्याचा संसारावर, साध्या रोजच्या आयुष्यावर परिणाम होणार.

याउलट माणूस फार कुरूप असला तरी त्याला त्याचा न्यूनगंड सतावणार. सामान्य माणसासारखा कामधंदा, वागणूक त्याला मिळणार नाही. थोडक्यात, चारचौघांपेक्षा उठून दिसेल असं आत्मविश्वास देणारं, पण अति सुंदर नसलेलं रूप ज्याला मिळालं असेल त्याच्या वाट्याला अधिक समतोल आयुष्य येईल. गबाळं राहणं हे एक टोक आणि दागदागिने, भारी कपडे याच्या मागे लागणं हे दुसरं टोक. दोन्ही टोकं चुकीचीच आहेत. नीटनेटका साधेपणा यावर जीवनसाथमधे सविस्तर चर्चा चालतात. कारण संसारात त्याचं फार महत्त्व असतं. साधेपणाचं मूल्य फार उच्च स्तरावरचं आहे. सुदृढ शरीरयष्टीचं असंच असतं. अतिशय पिळदार, धिप्पाड पहिलवान पुरुष किंवा खूप उंच, मोठाड शरीरयष्टीच्या स्त्रीच्या वाट्याला समतोल आयुष्य येणं कठीण असतं.

खेळाचं असंच असतं. एखाद्या खेळाडूकडून खूप अपेक्षा असतात. त्याचं त्याच्यावर इतकं दडपण असतं की, समतोल आयुष्य जगणं त्याला जवळजवळ अशक्य आहे. खेळ चांगला खेळण्याला आपला आक्षेप नाही. एक का, अनेक

खेळांत नैपुण्य असावं, आवड असावी. तो खेळ खेळताना छान वाटतं, यात खरं सुख आहे. प्रत्येक वेळच्या खेळाचं अटीतटीच्या स्पर्धेत रूपांतर झालं, प्रतिस्पर्ध्याची पंचाईत करण्याची तंत्र शिकणं हा मुख्य भाग बनला की समतोल हरवतो. खेळ खेळताना त्यामागचं शारीरिक, मानसिक आरोग्य जास्त महत्त्वाचं आहे, हे समजणं हा तोल आहे.

कलागुणांचं, छंदांचं असंच आहे. गाणं, नृत्य, नाटक हा व्यवसाय बनला की त्यात स्पर्धा, आर्थिक गणितं, मार्केटिंग, व्यापार सगळं आलं. छान गाणारे आणि अप्रतिम आवाजाची नैसर्गिक देणगी असणारे यांच्यात फार फरक असतो. जो कलावंत स्वतः त्या कलेची उंची गाठेल आणि शिवाय सर्वसामान्यांच्या–बरोबर अगदी सहजपणी मिसळून आपली कला दाखवेल तो कलावंत लोकप्रियही होईल आणि समतोल आयुष्याचा त्याला आनंद मिळेल. लेखक, कवी यांचं हेच. छान लिहावं आणि सहजपणी सामान्यांच्यात मिसळावं. साधं बोलतानाही समीक्षणात्मक किंवा काव्यमय बोलणारे समतोल घालवून बसतात. बोलताना काही लोकांना चमकदार, आकर्षक, अलंकारिक बोलण्याची सवयच लागून जाते. सतत दुसऱ्याला हसवण्याची, रिझवण्याची आपल्यावर सतत जबाबदारी असल्यासारखी ही माणसं बोलतात. अर्थातच, त्यांचा समतोल गेलेला असतो. अहंगंड आणि न्यूनगंड हे दोन्ही समतोलाचे शत्रू आहेत.

अनेकांना राग आवरत नाही, ही त्यांची अडचण असते. मग ते म्हणायला लागतात, 'म्हणजे काय, राग व्यक्तच करायचा नाही की काय?' खरं म्हणजे याचं उत्तर असं आहे की, रागच काय कुठचीही भावना जरूर व्यक्त करायची, नक्की करायची, पण कशी व्यक्त करायची, ती योग्य पद्धत शिकून घ्यायची. यालाच समतोल वागणूक म्हणतात. कारण भावना दाबून ठेवल्यामुळे स्वतःला त्रास होतो. तो त्रासही होऊ द्यायचा नाही.

समतोल वागण्याच्या पद्धतीत एका पद्धतीचा वापर जरूर करावा. कारण तेच खरं असतं. एखाद्या गोष्टीबद्दल तीव्र नकारात्मक किंवा टीकात्मक प्रतिक्रिया व्यक्त करण्याऐवजी खऱ्या विचार आणि भावनेशी सुसंगत शब्द वापरावेत. तीन प्रकारे हे व्यक्त करता येईल.

1) प्रथमदर्शनी माझी अशी समजूत झाली.
2) आता माझ्या मनातला प्राथमिक विचार असा आहे.
3) माझी ताबडतोबीची प्रतिक्रिया अशी आहे.

याचा अर्थ, माझ्या विचारात नंतर बदल होऊ शकेल, ही शक्यता शिल्लक आहे.

तत्त्वज्ञानातलं एक महत्त्वाचं वाक्य आपण सगळ्यांनी लक्षात ठेवण्याजोगं आहे. 'मूर्खालाही मूर्ख म्हणता येत नाही.' याचा मतितार्थ असा आहे की, समजा, आपल्याला वाटतंय की, समोरची व्यक्ती मूर्ख आहे आणि मी त्याच्या मानानी शहाणा आहे. खरी गोष्ट अशी असते की, त्याच वेळेला तिसरी कोणीतरी व्यक्ती माझ्याहीपेक्षा खरोखर शहाणी असेल किंवा स्वतःला शहाणी समजत असेल तर ती व्यक्ती तिच्या तुलनेत मला मूर्ख म्हणेल त्याचं काय? त्या तिसऱ्या व्यक्तीनी मला मूर्ख म्हटलेलं चालेल का? नाही ना? मग तुम्ही त्या पहिल्या व्यक्तीलाही मूर्ख म्हणू शकत नाही.

व्यक्तीचा आवाज, बोलण्याचा स्वर आणि त्या व्यक्तीचे विचार या दोन गोष्टींचा संबंध असतो का नसतो, याबद्दल मानसशास्त्रात दोन्ही परस्परविरुद्ध मतं आहेत. थेट नाही आणि स्पष्ट हो. मी दुसऱ्या गटातला आहे. खूप वरच्या स्वरात बोलणाऱ्या माणसाचे विचार नियंत्रित, संयत आहेत, असं क्वचितच आढळतं. ज्या व्यक्तीच्या विचारात प्रगल्भता आली त्याच्या वागणुकीत, बोलण्यात भारदस्तपणा आपोआपच येतो. बोलण्याचा स्वर खाली येतो, पट्टी बदलते. बोलण्याची पद्धतही बदलते, वेगही कमी होतो.

जीवनसाथ अभ्यास मंडळात योग्य तेवढ्या आवाजात योग्य तेवढं बोलता येण्याविषयी अनेक खेळ असतात, सूचना असतात. साधारण 25-30 माणसांचा गट खोलीत बसला असला तर अगदी हळू आवाजात बोलणाऱ्या व्यक्तीनी समतोलासाठी जरा मोठ्यानी बोलण्याचा सराव करायला हवा. फार मोठ्यानी बोलणाऱ्याला उलट सूचना असतात. काही माणसं स्वतःच सलग खूप बोलतात. स्वतःला हवं ते व्यक्त करताना दुसऱ्याला मधे प्रतिक्रिया व्यक्त करायला सवड आणि संधी देणं ज्याला जमलं नाही त्याला समतोल समजलेला नाही.

लोकांसमोर कसं वागावं हा तात्त्विक पेच असतो, असा आणखी एक प्रसंग सांगतो. घरात कोणीतरी वारलेलं असतं. अशा वेळी कामावर कळवून किंवा न कळवता लोक रजेवर राहतात. पण घरातल्या दैनंदिन कामांचं काय? घरात स्वयंपाक करणं वाईट दिसतं, पण खायला तर लागतंच. मुलांना तर सगळ्याच गोष्टी वेळेवर द्यायला लागतात. पूर्वी शेजारी स्वयंपाक करून जेवणाची व्यवस्था करायचे. आता तेही कठीण आहे. अशावेळी वाईट वाटतं हे

खरं, पण नुसतं रडत कसं बसायचं? कर्मकांडप्रिय घर असलं तर काही विचारायलाच नको. काहीही केलं तरी पेच. पण तीच तर खरी परीक्षा असते.

कधीकधी खूप गोष्टी एकाच वेळी हाताळाव्या लागतात. काही गोष्टी न पटणाऱ्या असतात, त्याही कराव्या लागतात. त्यापासून पळून चालत नाही. त्याला हसतमुखानी हाताळण्याची गरज असते. पूर्वी माझा एकट्याचा बांधकामाचा धंदा होता तेव्हा एक बाहेरगावचे नवे 'क्लायंट' आलेले होते. त्याच वेळेला बांधकामावरचे प्रश्न विचारायला लेबर मिस्त्री, सप्लायर्स आले होते. शिवाय क्लायंटचं आदरातिथ्य करायला हवं होतं. ज्यांचा छोटा प्रश्न होता त्यांचा मी आधी आलेल्यांना सांगून झटपट प्रश्न सोडवत होतो. काहींना आश्वासन देऊन ते माझ्या डायरीत लिहून घेत होतो. मधे फोनही येत होते. माझ्याकडे आलेले गृहस्थ शांतपणानी हे सगळं बघत बसले होते. सगळे लोक गेल्यावर त्यांनी त्यांच्या बांधकामासाठी माझी नेमणूक केली नि पहिला चेक दिला. ते म्हणाले, 'द वे यू हँडल्ड एव्हरिथिंग मेड माय डिसिजन.' पुढे कळलं की ते त्यांच्या गावी तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक होते.

गेली अनेक वर्षं एक वाक्य मी अनेकांकडून ऐकलंय. इतर काहीही करता येईल, पण पैशाचं सोंग आणता येत नाही. मी या वाक्याशी सहमत आहे, पण मला त्यात एक वाढ करायचीय. आपल्याकडे भरपूर पैसे आहेत असा देखावा काही काळ करून तात्पुरतं पैशाचं सोंग आणता येतं. पुढे ते जास्त काळ प्रत्यक्ष पैशाशिवाय वठवता येत नाही हे मान्य. वेळ मात्र नसला तर त्याचा आभासही निर्माण करता येत नाही. त्यामुळे सुधारित वचन असं होईल, 'पैशाचं सोंग फार कठीण असतं आणि वेळेचं सोंग अजिबात आणता येत नाही.'

एक नेहमीचा संभ्रमाचा प्रश्न असतो. प्रत्येक माणूस स्वतःच्या समाधानासाठी प्रत्येक निर्णय घेतो, हे विधान ऐकून लोक विचारतात, 'आपण आपलं मन मारून दुसऱ्याच्या म्हणण्याप्रमाणे कित्येक वेळा वागायचं ठरवतो. ते यात कुठे बसतं?' त्याचं उत्तर असं, 'आपण दुसऱ्याच्या निर्णयाप्रमाणे वागायचं ठरवतो, पण तो निर्णय स्वतःचा आणि स्वतःच्या समाधानासाठीच घेतलेला असतो.'

आमचा एक मित्र आहे. नवरा-बायकोमधला वाद असो, मित्रा-मित्रामधला मतभेद असो. हा एकदम टोकाची भूमिका घेणार. जेवण बनवण्याबद्दल काही अडचणीचा उल्लेख झाला की, घरात स्वयंपाक नको. बाहेरच जेवायला जाऊ म्हणणार. मित्राशी वादविवादात झालेल्या मतभेदामुळे एकदम संबंध तोडणार.

बायको म्हणत असली की, तू मला पुरेसा वेळ देत नाहीस की एकदम तिला दुसऱ्याबरोबर भानगड कर, घटस्फोटाचा अर्ज कर, असलं टोकाचं काहीतरी बोलणार. कामाच्या ठिकाणी काही मनःस्ताप असला की एकदम राजीनाम्याची भाषा काढणार. अशा माणसाबरोबरचा संसार तर कठीण असणारच. त्याच्या बायकोला आणि मुलांनादेखील, त्याला स्वतःलादेखील खूप त्रास होत असणार. या माणसानी तत्त्वज्ञानातला हा समतोल वागणुकीचा संदेश मनापासून शिकण्याची गरज आहे.

स्वतः ठरवलेलं तत्त्व काहीही असो, त्याची आग्रहानी अंमलबजावणी करायला पाहिजे हे नक्कीच, पण त्याचबरोबर दुसरं एक तत्त्व सतत लक्षात ठेवलं पाहिजे की, कोणतीही गोष्ट माणूस यथाशक्ती करू शकतो. कुठचंही आश्वासन हे शंभर टक्के असूच शकत नाही. शक्यतोवर करीन, माझ्या प्रयत्नांची पराकाष्ठा करीन, यापेक्षा पलीकडच्या आश्वासनाला काही अर्थ नाही.

कुठचीही गोष्ट, कुठचंही तत्त्व शंभर टक्के आचरणात आणता येत नाही, हे खरं आहे. कारण नियम झाला की अपवादही असणारच. अपवादाची व्याख्या तत्त्वज्ञानापासून निघालेल्या व्यवस्थापनशास्त्रानी व्यवस्थित केली आहे. पहिली गोष्ट म्हणजे त्याची गणिती व्याख्या. दोन टक्के एवढाच अपवाद व्यवस्थापनशास्त्राला मान्य आहे. अपवादाचं प्रमाण त्यापेक्षा जास्त असलं तर ते नियमित आचरणामधेच मोडतं. ते दोन टक्के कुठचे, याचीही व्याख्या स्पष्ट आहे. एक टक्का दुसऱ्याला फार वाईट वाटेल अशा भीतीपोटी बोललेलं नि दुसरा एक टक्का म्हणजे जे वागल्यानी आपल्यावर फार मोठं संकट कोसळण्याची शक्यता वाटली तर. या दोन टक्क्यांव्यतिरिक्त तुम्ही ठरवलेलं तत्त्व कायमच पाळायचं असतं.

आपल्या ओळखीच्या माणसांपैकी पूर्णपणी आपल्या मनाजोगं वागणारी माणसं जवळजवळ नसतातच. चुकीचं बोलणाऱ्यांपैकी, वागणाऱ्यांपैकी काहींना केवळ वागण्या-बोलण्याची पुरेशी समज नसते, म्हणजेच परिपक्वता नसते. पण आपल्याला कळत असतं की, या व्यक्तीच्या मनातला हेतू वाईट नाहीय. याउलट काहींच्या बोलण्यात-वागण्यात काही चूक शोधता येत नाही, इतके ते उपचार शिकलेले असतात. आणि तरी आपल्याला कळतं की, हा माणूस लबाड आहे. हे ओळखण्यासाठी अनेकांशी वागण्या-बोलण्याचा अनुभव लागतो. नुसत्या हवा-पाण्याच्या गप्पा, जागतिक किंवा देशाचं राजकारण, सिने नट-नट्या यांच्याविषयी बोलण्यात तासन्तास काढले तरी माणूस कळत नाही. सामाजिक

प्रश्न, वैयक्तिक सवयी, वैयक्तिक प्रश्न याविषयी बोलूनच खरं मनातलं कळतं. इतरांविषयी कुचाळक्या करणाऱ्या माणसाचाही दर्जा, वृत्ती आपल्याला कळते. लबाड माणसं कळतात तशीच मत्सरी माणसंही कळतात.

आणखी एका प्रकारची माणसंही आपल्याला दिसतात आणि ओळखू यायला लागतात. खरी, सरळ, भोळी, पण समाजाच्या रेट्यामुळे 'स्मार्ट' वागण्याची धडपड करणारी. समाज सगळ्या ठिकाणी सर्वांना असा संदेश देत असतो की, लबाडीनी वागा तरच तुम्ही आयुष्यात पुढे जाल. जिथे तिथे पुढे घुसा, तोच यशाचा मार्ग आहे. अशी माणसं कदाचित पहिल्या भेटीत समोरच्याला प्रभावित करतात, पण नंतर लवकरच उघडी पडतात.

तत्त्वज्ञानातल्या एका निराळ्या विषयाला 'असणं किंवा दिसणं' असं म्हणतात. या विषयावर जगभर भरपूर गैरसमजुती, वाद, विसंवाद झालेले आहेत आणि आजही चालू आहेत. मुळात या दोन प्रवृत्ती आहेत. एका प्रवृत्तीच्या माणसांच्या दृष्टीनी माणूस आतून चांगला असणं, प्राणी, वस्तू, चांगली असणं याला जास्त महत्त्व असतं. तो माणूस, तो प्राणी, ती वस्तू दिसते कशी, याबद्दल त्यांचं फारसं म्हणणं नसतं. दुसऱ्या प्रवृत्तीच्या माणसांच्या दृष्टीनी माणूस, प्राणी, वस्तू चांगली दिसणं जास्त महत्त्वाचं असतं. असण्याला त्या तुलनेत त्यांच्या दृष्टीनी कमी महत्त्व असतं.

समतोल दृष्टिकोनाचं याबाबतीतलं वर्णन असं की, चेहरा कायम नीटनेटका ठेवण्याचा उल्लेख केला की चिडून तो विषय 'हेवी मेक-अप'वर नेणं चूक आहे. आधीच्या बोलणाऱ्याचा मतितार्थ तो नसतो. सुजकट, तेलकट, केस विसकटलेले, असा चेहरा कोणाचा असतो? दारुड्याचा, अमली पदार्थांच्या व्यसनात अडकलेल्या व्यक्तीचा, झोप न झालेल्या माणसाचा, दमलेल्या माणसाचा, समोरच्या माणसामधे काही स्वारस्य नसलेल्याचा. अशी समजूत टाळण्यासाठी, आठवण टाळण्यासाठी चेहरा पाण्यानी धुतलेला किंवा फेस पावडरनी नीट केलेला, केस नीट केलेले असा हवा. हा त्याचा खरा अर्थ असतो.

समतोल विचारसरणीमधे असणं आणि दिसणं यामधे तफावतही असता कामा नये आणि दोन्हीला सारखं महत्त्व देण्याला फार महत्त्व आहे. दोन तत्त्वज्ञानी माणसांचा मी इथे विशेष उल्लेख करतो. जे. कृष्णमूर्ती आणि रवींद्रनाथ टागोर. दोघंही विचारांनी खूप प्रगल्भ, विद्वान, अभ्यासू, प्रतिभावंत होतेच, पण त्यांचा नीटनेटकं दिसण्याबद्दल खूप कटाक्ष असायचा. त्यांच्या

विचाराप्रमाणे माणूस, प्राणी, वस्तू चांगली असूनही चांगली दिसत नसली तर ती हिंसा होते.

सध्याच्या काळात आणखी एक गोष्ट समाज शिकवतोय. दुसरा आपल्या पुढे गेला तर आपल्याला वाईट वाटलंच पाहिजे असं जणू काही बंधन आहे. प्रत्यक्षात शाळेत काय, कॉलेजमधे काय, नोकरीत काय, व्यवसायात काय, कोणीतरी पहिला येणार नि कोणीतरी दुसरं येणार. कोणीतरी जास्त यश मिळवणार, पैसे कमावणार, आपल्या पुढे जाणार. आपल्यात गुणवत्ता असूनही दुसरं कोणीतरी नशिबानी पुढे जाणार, हे अनेकांना स्वतःला व्यवस्थित कळतं. पण समाज बोलून बोलून आपल्याला वेडं करतो. आपली खरी म्हणजे दुसरा पुढे गेल्याबद्दल काही हरकत नसते, पण दबावामुळे आपल्याला खरं काय वाटतंय, हेच समजेनासं होतं. खरं म्हणजे 'स्थितप्रज्ञता' हा खूप मोठा सद्‌गुण आहे आणि तो लहानपणीसुद्धा एखाद्यामधे असू शकतो. पण सध्याच्या आयुष्यात स्थितप्रज्ञ असण्याला किंमत नाही असं जाणवतं.

तत्त्वज्ञान आणि वैवाहिक आयुष्य, एरवीचं रोजचं आयुष्य, यांचा मला खूप जवळचा संबंध तर दिसतो. तो त्यातल्या त्यात सोपं करण्याचा माझा प्रयत्न अखंड चालू आहे. माझ्या दृष्टीनी कुठचंही तत्त्व आज पाळायचं कारण आज तो विशिष्ट दिवस आहे, उद्या ते नाही पाळलं तरी चालतं असं काहीच नसतं. ती कायमची पथ्यं अशी –

1) नियमित व्यायाम,
2) माफक सात्त्विक आहार,
3) भावना मनात दाबून न धरता योग्य पद्धतीनी व्यक्त करणं,
4) स्वच्छता हा सद्‌गुण आहे, पण दुसऱ्याला त्रास होण्याइतका त्याचा अतिरेक न करणं,
5) शिस्त हा सद्‌गुण आहे, पण त्याबद्दल दुसऱ्याला न छळणं,
6) मध्यमवर्गीय राहणीइतके पैसे मिळवणं, साठवणं हा सद्‌गुण आहे, पण त्यापेक्षा जास्त पैसे मिळाले तर ते समाजकार्यासाठी खरचणं.

वर्षातले 365 दिवस 24 तास पाळण्याचीच सगळी तत्त्वं आहेत. त्यांना वागणुकीची पथ्यं म्हटलं तरी चालेल. सतत म्हणजे सतत त्याबद्दलचा सारासार

विचार हीच गोष्ट खरी उपयोगी पडते.

मानवी शरीर हे एक अतिशय कार्यक्षम आणि उत्तम यंत्र आहे. प्रगतीच्या, विकासाच्या टप्प्यात यंत्रयुगाच्या, कृत्रिम मेंदू म्हणजे कॉम्प्युटर यांच्या आहारी गेलं तर मूळच्या मानवी क्षमता वापर नसल्यामुळे कमी होतात. असे समतोल गेलेले म्हणजेच यंत्रांच्या आहारी गेलेले लोक मंदबुद्धी नसतात, पण बंदबुद्धी असतात.

समतोल वागणूक या विषयाचा अभ्यास करताना एक गोष्ट लक्षात ठेवावीच लागते. कुठचाही सामाजिक बदल घडायला मधे 1 पिढीचा काळ जावाच लागतो. पिढीचा काळ पूर्वी 15 वर्षं समजायचे, कारण 15व्या वर्षी स्त्रीला मुलं व्हायला सुरुवात व्हायची. नंतर त्याची सरासरी हळूहळू बदलली. पिढीची व्याख्या 20 वर्षं झाली. मग सध्या 25 वर्षांचा काळ म्हणजे एक पिढी मानतात. आणि खरोखरच कुठचाही सामाजिक बदल व्हायला सध्या 25 वर्षं लागतात. प्रत्येक बदलाला कुटुंबाचा आणि समाजाचा पाठिंबा लागतो. तो पाठिंबा मिळवण्यासाठी बरीच धडपड करावी लागते.

समतोल वागणुकीचा अभ्यास करताना एक दुर्दैवी सत्य समोर येतं, ‘काळाच्या फार पुढे असणं हाच एखाद्याचा गुन्हा ठरतो’.



*समतोल विचारांच्या अभ्यासामधे नवरा-बायकोचं नातं खास अशासाठी मानलेलं आहे की, नवरा-बायको दोघंही स्वावलंबीही असावे लागतात आणि त्यांना एकमेकांची गरजही असावी लागते. एकमेकांना एकमेकांची गरज नसली तरी संसार नीरस होतो आणि दोघं स्वावलंबी नसले, एकमेकांवर फार अवलंबून असले तरी विसंवाद निर्माण होतात. त्यासाठी नवरा-बायकोमधल्या समतोल नात्याचा खास अभ्यास करावा लागतो. हेही खरं की, जोडीदाराला स्वतःची गरज असण्याचीच गरज असते.*

# जीवनसाथ पुस्तक संच
# संपूर्ण यादी

| पुस्तक क्र. | पुस्तकाचं नाव |
|---|---|
| 1. | विवाह अभ्यास म्हणजे नेमकं काय<br>●<br>कौटुंबिक विसंवाद |
| 2. | जोडीदाराची निवड<br>●<br>लैंगिक शिक्षण |
| 3. | व्यक्तिमत्त्व विकासाचा खरा अर्थ<br>●<br>पुरुष पालकांचं शिक्षण |
| 4. | आर्थिक व्यक्तिमत्त्व<br>●<br>करीअरचं नियोजन |
| 5. | व्यवस्थापनशास्त्र – वैवाहिक आणि रोजच्या आयुष्यातलं |
| 6. | स्वावलंबन, आत्मसन्मान<br>●<br>स्त्री-पुरुष असमानतेची रूपं |
| 7. | उत्सवी प्रवृत्ती<br>●<br>लग्नसमारंभ |

| | |
|---|---|
| 8. | खरे उपयोगी संस्कार<br>●<br>सर्वांनी करण्याजोगं समाजकार्य |
| 9. | रोजच्या आयुष्यातलं तत्त्वज्ञान<br>●<br>समतोल विचारांचं महत्त्व |
| 10. | ज्येष्ठांशी संवाद<br>●<br>मृत्यूसंबंधी स्पष्ट विचार |
| 11. | समुपदेशनाच्या अनेक नव्या पद्धती<br>●<br>जीवनसाथ समुपदेशन संस्था |
| 12. | कौटुंबिक स्वास्थ्यासाठी उपाय<br>●<br>जीवनसाथमधले खेळ |

# जीवनसाथ संचामधली अनिल भागवत यांची इतर पुस्तकं

पुस्तक-1

## विवाह अभ्यास म्हणजे नेमकं काय



## कौटुंबिक विसंवाद

या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---

**1 ) विवाह अभ्यास मंडळ म्हणजे नेमकं काय?**

1. या कल्पनेची थोडक्यात ओळख 2. विवाहाचा तत्त्वज्ञानाशी संबंध 3. वैवाहिक आयुष्यासाठीची काही महत्त्वाची तत्त्वं 4. रोजच्या आयुष्यातली साधी तत्त्वं 5. भावनांविषयीचा अभ्यास 6. विचारांचं भावनेत रूपांतर 7. भावनांवर नियंत्रण 8. कुटुंबाबरोबरच्या आयुष्याचं महत्त्व 9. व्यवस्थापनशास्त्राचा उपयोग 10. कुटुंबाचं समुपदेशन 11. आपुलकी, प्रेम, या भावना व्यक्त करणं 12. नाती सांभाळण्यासाठीची तत्त्वं आणि तंत्रं 13. प्रश्न सोडवण्याची पद्धत– मिश्रगट कार्यशाळा म्हणजेच 'ग्रुप काउन्सेलिंग' वर्कशॉप्स 14. खरं बोलणं 15. पैशाबद्दलची विचारसरणी 16. स्वावलंबन आणि आत्मसन्मान 17. स्त्री-पुरुष समतेची आणि समानतेची समज 18. लोकशाहीचं मूल्य आणि स्वतंत्र किंवा एकत्र कुटुंब 19. उत्सव, समारंभ याबद्दल भूमिका 20. असणं, दिसणं आणि दाखवणं 21. आधुनिक आणि पारंपरिक 22. वैयक्तिक समुपदेशन 23. या पुस्तकासंबंधीच्या सूचना

**2 ) कुटुंबातले आणि नवराबायकोमधले मतभेद म्हणजेच कौटुंबिक विसंवाद**

1. प्रश्नाचा नेमका शोध आणि उपायाचा शोध 2. विवाहाच्या इतिहासात आणि तत्त्वज्ञानात काय सांगितलंय 3. कौटुंबिक विसंवाद या विषयातली आकडेवारी 4. विचार, भावना यांचे गट आणि नवरा-बायकोचं नातं 5. कुटुंबातली इतर नाती / एकत्र कुटुंब 6. पैशावरून वाद 7. आत्मसन्मानावरून वाद 8. मुलांसंबंधीचे वाद 9. सासर-माहेर याविषयी वाद 10. स्त्री-पुरुष समानतेची समज नसण्यावरून विसंवाद 11. आधुनिक किंवा पारंपरिक विचारांमुळे विसंवाद 12. व्यसनं आणि भांडणं 13. नवराबायको आणि कुटुंबातले समाईक धागे 14. कुटुंबासाठी वेळ देणं 15. व्यवस्थापन कौशल्यांचा वापर 16. विवाहाचा अर्थ कळणं 17. सर्वात महत्त्वाची गोष्ट– संवाद 18. राग, धमक्या, रागवारागवी, रुसणं 19. मारहाण– हिंसेचे प्रकार 20. लग्न ठरवण्याची पद्धत– सगळ्याचं मूळ 21. लग्नाचा करार 22. मानसशास्त्राची मदत 23. करण्याजोग्या गोष्टी 24. खरं प्रेम म्हणजे काय ते न समजणं 25. भांडणांचं टोक– घटस्फोट

**3 ) मी आणि शोभामधले विसंवाद**

**4 ) मी आणि शोभा यांचं सहजीवन, आम्ही काढलेले उपाय**

**5 ) राग आवरण्याचे मार्ग**

**6 ) आभार**



पुस्तक-2

# जोडीदाराची निवड



# लैंगिक शिक्षण

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---

**1 ) प्रथमदर्शनी प्रेम आणि प्रेमप्रकरणं**

1. नैसर्गिक स्त्री-पुरुष आकर्षण 2. प्रथमदर्शनी प्रेम 3. एकतर्फी प्रेम 4. नॉर्मल - ॲबनॉर्मल तारुण्य 5. दुतर्फी प्रेम प्रकरण 6. लग्न ठरवणं – साखरपुडा वगैरे 7. अविचाराची शक्यता 8. लग्न मोडणं/प्रेमभंग 9. विवाहबाह्य आकर्षण/प्रेमप्रकरण 10. खरं प्रेम म्हणजे काय?

**2 ) विमुक्त जीवन**

**3 ) अविवाहितांचं आयुष्य**

1. अविवाहितांच्या आयुष्याचा अभ्यास 2. विवाहाचा इतिहास 3. काही अविवाहितांची उदाहरणं 4. जीवनसाथमधे अविवाहितांच्या प्रश्नाबद्दल काय असतं? 5. समतोलपणी वागणाऱ्या अविवाहितांची उदाहरणं 6. लिव्ह-इन रिलेशनशिप (लग्नाविना एकत्र राहणं) 7. लग्न करण्याविषयी माझं स्वतःचं मत

**4 ) अविवाहितांच्या मुलाखती**

**5 ) लग्न कशासाठी?**

**6 ) लग्नाचं योग्य वय**

**7 ) वधू-वर सूचक मंडळं आणि मेळावे**

1. वधू-वर सूचक मंडळं 2. मेळावे, खेळ, सहल आणि जीवनसाथचे प्रयत्न

**8 ) जोडीदाराची निवड**

1. दुनिया जिसे कहते है वो जादू का खिलौना है – सध्याचा प्रश्न 2. स्वस्थ वैवाहिक आयुष्याचं ध्येय 3. निवडीसाठी किती काळ योग्य? 4. लेखी

प्रश्नावलीच्या देवघेवीची कल्पना 5. प्राथमिक प्रश्नावली 6. सविस्तर प्रश्नावली– बाह्यरूप 7. सविस्तर प्रश्नावली– पत्रिका 8. सविस्तर प्रश्नावली– शिक्षण/ व्यासंग 9. सविस्तर प्रश्नावली– आरोग्य 10. सविस्तर प्रश्नावली– स्वभाव 11. सविस्तर प्रश्नावली– पैशांबद्दलची विचारसरणी 12. सविस्तर प्रश्नावली– मासिक प्राप्ती 13. सविस्तर प्रश्नावली– स्त्री-पुरुष समानता 14. सविस्तर प्रश्नावली– स्त्री-पुरुष लैंगिक संबंध 15. सविस्तर प्रश्नावली– कुटुंब 16. सविस्तर प्रश्नावली– मुलं 17. सविस्तर प्रश्नावली– लग्न समारंभ 18. सविस्तर प्रश्नावली– वैवाहिक आयुष्याचं सार 19. सविस्तर प्रश्नावली– महत्त्व कशाला? 20. त्रोटक सविस्तर माहिती 21. भावी जोडीदाराच्या प्रत्यक्ष भेटीपूर्वीचे पर्याय 22. जोडीदाराबद्दल अंतिम निर्णयप्रक्रिया 23. जीवनसाथची कार्यशाळा नेमकी कशी असते? 24. निवडक गटाचं जोडीदाराच्या निवडीसाठी समुपदेशन 25. जोडीदार ठरल्यावर लग्नापूर्वीची बौद्धिक चाचणी (मॅरेज मॅच्युरिटी इंडिकेटर) 26. अविचाराची शक्यता 27. लग्न ठरल्यानंतरची कर्तव्यं 28. जोडीदाराची निवड या कार्यशाळेत वापरायचे खेळ

**9 ) लैंगिक शिक्षणाची गरज**

1. या लेखाची पार्श्वभूमी 2. भारतातलं पारंपरिक कामशास्त्र आणि जगातली परिस्थिती 3. तत्त्वज्ञान आणि मानसशास्त्राची लैंगिक संबंधाबद्दलची भूमिका 4. सध्याच्या प्रश्नाचं स्वरूप 5. लैंगिक शिक्षणाची कार्यशाळा 6. लैंगिक संबंधातलं समुपदेशन

**10 ) लैंगिक शिक्षण– जन्मापासून 5 वर्षांपर्यंतच्या मुलामुलींबद्दल**

**11 ) लैंगिक शिक्षण– 5 ते 10 वर्षांपर्यंतच्या मुला-मुलींसाठी**

**12 ) लैंगिक शिक्षण– 10 ते 16 वयापर्यंतच्या मुला-मुलींसाठी**

**13 ) लैंगिक शिक्षण – तरुणांसाठी – लग्नापूर्वी**

1. सध्याची परिस्थिती 2. लैंगिक भावनांचा गोंधळ 3. मुलग्यांच्या विकृत गप्पा 4. हस्तमैथुन 5. वेश्येकडे जाण्याचा मोह 6. मुलींच्या मनातल्या कल्पना 7. मुलगे आणि मुली यांची चांगली मैत्री 8. लैंगिक शिक्षणाची अविवाहितांसाठी कार्यशाळा 9. चुकीच्या गोष्टींची शक्यता– रेव्ह पार्टी 10. प्रेमभंग आणि लग्नापूर्वी लैंगिक संबंध 11. लग्नापूर्वी लैंगिक संबंधाबद्दल वैयक्तिक समुपदेशन 12. परदेशातली परिस्थिती 13. लैंगिक संबंधांमागची मानसशास्त्रीय बैठक

**14 ) लैंगिक शिक्षण– जोडीदाराच्या निवडीनंतर पण लग्नाआधी**

1. द्विधा मनःस्थितीचे परिणाम 2. वैद्यकीय तपासणी

**15 ) लैंगिक शिक्षण– लग्न झाल्यापासून मूल होईपर्यंतचा काळ**

1. लग्नानंतरची पहिली रात्र 2. लैंगिक संबंधांबद्दलचं अज्ञान 3. स्त्रीची मासिक पाळी 4. स्त्री-पुरुषांची मानसिक बैठक 5. लैंगिक समस्यांबद्दलचं मिश्रगट समुपदेशन 6. लैंगिक संबंधातल्या अडचणी आणि उपाय 7. प्रणय म्हणजेच 'फोरप्ले'चं महत्त्व 8. लैंगिक संबंधात स्त्रीचं समाधान 9. समलिंगी, उभयलिंगी आकर्षण वाटणारे स्त्री-पुरुष 10. अविश्वास– जोडीदारावर, समाजावर 11. लैंगिक अतृप्तीचे परिणाम 12. गर्भ राहणं 13. आनंददायी लैंगिक संबंधांसाठी काही सूचना

**16 ) लैंगिक संबंध– मध्यमवयीन स्त्री-पुरुषांचा**

1. स्त्री-पुरुषांची लैंगिक गरज 2. लैंगिक संबंधांतून निवृत्ती 3. स्वप्नरंजन 4. लैंगिक उपासमार 5. नसबंदी 6. पुढच्या पिढीचं भवितव्य

**17 ) लैंगिक संबंध– ज्येष्ठांचा आणि लैंगिक विकृती**

1. ज्येष्ठांचा लैंगिक संबंध 2. लैंगिक विकृती

**18 ) आभार**



पुस्तक-3

# व्यक्तिमत्त्व विकासाचा खरा अर्थ



# पुरुष पालकांचं शिक्षण

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---

**1 ) संवादकला**

1. संवादामागचं तत्त्वज्ञान 2. मानसशास्त्रातला एक महत्त्वाचा प्रयोग 3. चांगला संवाद म्हणजे काय? 4. आयुष्यभरातल्या सगळ्या नात्यांचे फक्त 3 गट 5. जोडीदाराबरोबरचा किंवा जवळच्या व्यक्तीबरोबरचा संवाद 6. संवादातल्या चुकांची उदाहरणं 7. व्यवसाय, धंदा, दुकानदारी यामधले संवाद 8. चांगला संवाद– त्यासाठीचे मार्ग आणि तंत्रं 9. संवादकलेबद्दलच्या गटचर्चा 10. संवादातल्या भाषेचा प्रश्न आणि हावभाव, हालचाली यांच्यामधून संवाद

**2 ) व्यक्तिमत्त्व विकास**

1. आत्मविश्वास– व्यक्तिमत्त्वाचा पाया 2. बाह्यरूप 3. बोलणं 4. चेहऱ्यावरचे भाव 5. चुकीच्या लकबी 6. फसवेगिरी - खोटेपणा 7. कुचाळक्या - एक विकृती 8. अंगचे कलागुण 9. छंदापासून व्यसनापर्यंत 10. शिस्त आणि व्यवस्थापन 11. आयुष्याचा संतुलित दृष्टिकोन 12. अष्टपैलू– चतुरस्त्र– अष्टावधानी व्यक्ती 13. विकासाचे दोन मार्ग 14. मिश्रगट समुपदेशनाचे व्यक्तिमत्त्वासाठी फायदे

**3 ) खरं बोलणं – अठ्ठ्याण्णव टक्के**

**4 ) नकार देण्याची कला**

**5 ) मी केलेल्या चुका**

**6 ) मी जोडीदाराकडून/विशिष्ट व्यक्तीकडून काय शिकलो/शिकले**

**7 ) इ.क्यू. ( इमोशनल कोशंट ) म्हणजेच भावनिक गुणांक**

1. भावनिक गुणांकाची (इ.क्यू.) मूळ कल्पना 2. स्त्रियांच्या आणि पुरुषांच्या भावनांकातला फरक 3. भावनांक सुधारण्याचं शिक्षण 4. समुपदेशनातले अनुभव 5. शोभा आणि मी यांचं उदाहरण 6. भावनांक आणि समाजकार्य यांचा संबंध 7. भावनांकावर वय, आरोग्य यांचा परिणाम

**8 ) पुरुष पालकांचं शिक्षण**

1. माझं स्वतःचं लहानपण 2. पालक शिक्षणाची थिअरी आणि प्रॅक्टिस 3. शोभाचं आणि माझं पालक-शिक्षणातलं काम 4. मूल कशासाठी? 5. मुलाची शारीरिक वाढ 6. सर्वसाधारण पुरुष पालकाची सध्याची वागणूक 7. पालकत्वाचे नवे प्रश्न / उपायांचा शोध 8. मुलांना अपमानास्पद वागणूक 9. मुलं बिघडण्याची कारणं 10. आईवडलांचं एकमेकांशी नातं 11. आजोबांची भूमिका 12. शिक्षण-शाळा-अभ्यास-समुपदेशन 13. मुलांचा भाषाविकास 14. मुलांना केलेल्या शिक्षा 15. मुलांना स्वच्छतेचं शिक्षण 16. मुलांसाठी लैंगिक शिक्षण 17. मुलांसाठी वेळ काढणं 18. मुलांची पैशाबद्दलची समज 19. मुलांचे खेळ - आरोग्य 20. मुलांमुळे करिअरमधे खंड 21. भावंडांचे संबंध 22. समाजाचं मुलांकडे दुर्लक्ष 23. संस्कार 24. ‘स्पेशल’ मुलं 25. तरुणांचे पालक म्हणून जबाबदाऱ्या 26. पालकत्वामागचा समतोल विचार

**9 ) आभार**



पुस्तक-4

# आर्थिक व्यक्तिमत्त्व



# करीअरचं नियोजन

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---

**1 ) पैशाबद्दलची विचारसरणी**

1. पैशाबद्दलच्या विचारसरणीची प्रक्रिया 2. विवाहापूर्वी आर्थिक व्यक्तिमत्त्वाची पारख 3. मिश्रगट कार्यशाळा– प्रश्नावलीचा उपयोग 4. कामाचं स्वरूप आणि करिअर प्लॅन 5. मिळवती बायको 6. पिढीतला फरक 7. गरिबीमुळे येणारी समृद्धी 8. उसनवारी, कर्ज, परतफेड 9. बचतीच्या सवयी 10. प्रामाणिकपणा– रास्त भूमिका 11. मध्यमवर्गीय असण्याचे फायदे 12. मोह, फसणं, फसवणं 13. दातृत्व, 14. भ्रष्टाचार– काळा पैसा 15. व्यसनं 16. पैशाबद्दलचा कौटुंबिक सुसंवाद-विसंवाद 17. आर्थिक विषमता– देशाची धोरणं

**2 ) शिक्षण आणि करिअर**

1. सध्याची परिस्थिती 2. परीक्षांची पद्धत 3. शिक्षणाची योग्य पद्धत 4. शैक्षणिक इमारती, इतर सोयी 5. वैवाहिक आयुष्यात शिक्षणाचं महत्त्व 6. आयुष्यात करिअरचं महत्त्व 7. जीवनशिक्षणासाठी योग्य मार्ग 8. करिअरचं नियोजन आणि बदल 9. भागीदारीतली करिअर 10. तीन मिनिटांचा खेळ

**3 ) परदेश**

**4 ) बचत**

1. बचत 2. विमा

**5 ) आभार**



पुस्तक-5

# व्यवस्थापनशास्त्र – वैवाहिक आणि रोजच्या आयुष्यातलं

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---





पुस्तक-6

# स्वावलंबन, आत्मसन्मान



# स्त्री-पुरुष असमानतेची रूपं

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---

**1 ) स्वावलंबन आणि आत्मसन्मान**

1. लेखामागची मूळ कल्पना 2. समाजाची सध्याची परिस्थिती 3. इतर सजीव सृष्टी, वनस्पती, प्राणी आणि मानव 4. स्वावलंबन आणि पालकत्व 5. स्वावलंबन आणि वैवाहिक आयुष्य 6. रोजच्या आयुष्यातलं स्वावलंबन 7. स्वावलंबन, आत्मसन्मान आणि तत्त्वचिंतन 8. पैशाबद्दलचं स्वावलंबन 9. आजारपण, म्हातारपण यातलं स्वावलंबन 10. काही खास उदाहरणं 11. स्वावलंबन आणि भेटवस्तू, बक्षीशी, भीक वगैरे 12. निष्कर्ष

**2 ) लोकशाहीची समज आणि रोजचं कौटुंबिक आयुष्य**

**3 ) एकत्र किंवा स्वतंत्र कुटुंब**

**4 ) अंतिम निर्णय कोणाचा?**

**5 ) स्त्री-पुरुष समानतेच्या प्रवासातली असमानतेची रूपं**

1. गर्भधारणेपासून 5 व्या वर्षांपर्यंतची असमानता 2. अपत्याच्या 5 ते 10 वयामधली असमानता 3. अपत्याचं वय 10 वर्षांच्या पुढे ते शिक्षण पूर्ण करून कमवायला लागेपर्यंतची असमानता 4. नोकरी, धंदा, व्यवसायात, 'मिळवती बायको' या विषयातली असमानता 5. घरच्या आणि समाजातल्या वातावरणातली असमानता 6. लग्न ठरवतानाची असमानता 7. प्रत्यक्ष लग्न समारंभातली असमानता 8. लग्नानंतरचं एक ते दीड वर्ष किंवा मूल झाल्यावरची असमानता 9. पालकत्वातली असमानता 10. आपल्या मुलांच्या लग्नाच्या वेळची असमानता 11. म्हातारपणातली असमानता 12. जोडीदाराच्या मृत्यूनंतरची असमानता 13. स्त्री-पुरुष समानतेच्या प्रवासाच्या अभ्यासाचा निष्कर्ष

**6 ) आभार**



पुस्तक-7

# उत्सवी प्रवृत्ती



# लग्नसमारंभ

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---





पुस्तक-8

# खरे उपयोगी संस्कार



# सर्वांनी करण्याजोगं समाजकार्य

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---

इत्यादी 6. खाण्यापिण्याबद्दलच्या रूढी 7. लग्नसमारंभाशी जोडलेल्या रूढी 8. पोषाखाच्या रूढी 9. हिंसा-अहिंसा 10. नमस्कारासंबंधी रूढी 11. सामाजिक कार्यक्रमातल्या रूढी 12. रूढीमधले झालेले आणि करण्याजोगे बदल 13. पाप-पुण्य, मृत्यूसंबंधीच्या रूढी 14. कुटुंबकारणातल्या आणि सामाजिक अधिकाराच्या रूढी 15. काय बदल करता येतील?

### 9 ) आधुनिक-पारंपरिक म्हणजे नेमकं काय?

1. या लेखामागची कल्पना 2. बाह्यरूपातली पारंपरिकता किंवा आधुनिकता 3. मनातली आणि विचारातली पारंपरिकता किंवा आधुनिकता 4. निष्कर्ष

### 10 ) खरे संस्कार म्हणजे नेमकं काय?

1. आहाराविषयीचे संस्कार 2. आरोग्याविषयीचे संस्कार 3. पोषाखाविषयीचे संस्कार 4. निवाऱ्यासंबंधीचे संस्कार 5. विवाहासंबंधीचे संस्कार 6. मुलांवरचे संस्कार 7. पैशांबद्दलचे संस्कार 8. कामाबद्दलचे संस्कार 9. अभिरुचीचे संस्कार 10. मृत्युसंबंधीचे संस्कार 11. संस्कारांबद्दल करण्याजोग्या गोष्टी

### 11 ) स्वतःची होकारांची आणि नकारांची यादी

### 12 ) समाजकार्याच्या दिशा

1. या लेखामागची कल्पना 2. 'फंडिंग' असलेली कामं 3. सामाजिक प्रथा बदलण्याची कामं 4. धार्मिक प्रकारची सामाजिक कामं 5. शिक्षणक्षेत्रासाठी सामाजिक कामं 6. बालकांच्या हक्कांसंबंधी कामं 7. पत्रकारितेमधून सामाजिक काम 8. ग्राहकहितासाठी सामाजिक काम 9. शहरी सुविधांसाठी चळवळ 10. वैद्यकीय क्षेत्रातली सामाजिक कामं 11. शिष्यवृत्त्यांसाठी, पारितोषिकांसाठी पैशाची सोय 12. नैसर्गिक आपत्तीनंतरची कामं 13. शहरांमधल्या झोपडपट्ट्यांच्यामधे काम 14. पर्यावरण रक्षण-शिक्षण 15. कोणालाही जमतील अशी साधी कामं

### 13 ) आभार



टीप : जीवनसाथ पुस्तक संचातल्या पुस्तक क्र. 9 चा सविस्तर अनुक्रम या पुस्तकाच्या सुरुवातीच्या भागात दिला आहे.

पुस्तक-10

# ज्येष्ठांशी संवाद



# मृत्यूसंबंधी स्पष्ट विचार

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---





पुस्तक-11

# समुपदेशनाच्या अनेक नव्या पद्धती



# जीवनसाथ समुपदेशन संस्था

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---

**5 ) वैयक्तिक समुपदेशन**

1. या लेखाची मूळ कल्पना 2. घरातल्या किंवा ओळखीतल्या ज्येष्ठांचा सल्ला 3. मार्गदर्शन आणि समुपदेशनातला फरक 4. समुपदेशनातली मूलतत्त्वं किंवा गृहितं 5. भारत आणि पाश्चात्त्य देशातली परिस्थिती 6. समुपदेशकाची खास कौशल्यं– ऐकणं, बोलणं 7. समुपदेशनाची सुरुवात आणि प्रगती 8. समुपदेशकानी स्वतःविषयी सांगणं 9. समुपदेशनाचे प्रकार 10. क्रिटिकल ॲनॅलिसिस पद्धतीचं समुपदेशन 11. आत्मविश्वास वाढविण्यासाठी समुपदेशन 12. समुपदेशनातली तंत्रं 13. समुपदेशनातली पथ्यं 14. समुपदेशनातल्या अडचणी 15. समुपदेशकांच्या श्रेणी 16. विवाहपूर्व समुपदेशन 17. घटस्फोटापूर्वीचं समुपदेशन 18. ग्रुप काऊन्सेलिंग– एक उत्तम पर्याय 19. निष्कर्ष

**6 ) रिफर्ड काऊन्सेलिंग ऊर्फ अप्रत्यक्ष समुपदेशन किंवा कॅरम बोर्ड काऊन्सेलिंग**

**7 ) जागा-पद्धत-व्यवहार, सूत्रधार तयार करणं वगैरे**

**8 ) या पुस्तकाचा उपयोग**

**9 ) अभ्यास मंडळात न येण्याची कारणं**

**10 ) आभार**



पुस्तक-12

# कौटुंबिक स्वास्थ्यासाठी उपाय,



# जीवनसाथमधले खेळ

## या पुस्तकाचा सविस्तर अनुक्रम

---





# अनिल भागवत यांनी लिहिलेली आणखी पुस्तकं

पुस्तक-1

## घर पाहावं बांधून (पाचवी आवृत्ती)

- प्रस्तावना
- प्रमोटर बिल्डर्सविषयी
- आर्किटेक्टस्‌विषयी
- बिल्डिंग कॉट्रॅक्टरविषयी
- आर. सी. सी. डिझायनरविषयी
- मटेरियल सप्लायरविषयी
- बांधकाम कामगारांविषयी
- पेटी कॉट्रॅक्टर्सविषयी
- गळणारं छप्पर
- ॲग्रीमेंटवर सही
- सिस्टिम बिल्डिंग
- बांधकाम आणि सरकार
- बांधकाम, कर्ज, सरकारी कर आणि आपण
- कन्स्ट्रक्शन मॅनेजमेंट कन्सल्टंटविषयी
- बांधकामातले तांत्रिक शब्द आणि चेकलिस्ट

पुस्तक-2

## लग्न पाहावं करून (उपलब्ध नाही)

पुस्तक-3

## व्यवस्थापनशास्त्र तुमच्यासाठी (दुसरी आवृत्ती)

- मॉनिटरिंग मॅनेजमेंट - एक आवश्यक व्यवस्थापनशास्त्र
- मॉनिटरिंग मॅनेजमेंटची मूलतत्त्वं
- मॉनिटरिंग मॅनेजमेंटमधल्या महत्त्वाच्या गोष्टी आणि फायलिंग
- मॉनिटरिंग मॅनेजमेंट आणि कामगार
- क्वालिटी मॅनेजमेंट आणि सुपरवायझर
- स्पीड मॅनेजमेंट - एक जादूसारखं तंत्र
- कॉस्ट मॅनेजमेंट
- मॉनिटरिंग मॅनेजमेंट आणि इतर तज्ज्ञ
- मॉनिटरिंग मॅनेजमेंट आणि मालक
- डिझास्टर मॅनेजमेंट - आपत्ती निवारणशास्त्र
- मॉनिटरिंग मॅनेजमेंट - मोहीम फत्ते करण्याचं शास्त्र
- मॉनिटरिंग मॅनेजमेंट - बहुउपयोगीशास्त्र
- तुम्ही कोणीही असा - ते वापरता येईल



## लेखक अनिल भागवत यांचे ऋणी आहेत.

- डॉ. उल्हास लुकतुके - 1997 साली जीवनसाथ सुरू करताना स्पष्ट विचारांची जीवनभर साथ हा उद्देश स्पष्ट होता, पण त्याची सुरुवात करण्यासाठी यांची खूप मदत झाली.
- जीवनसाथ - मुंबई शाखा माझ्या आईसाठी सुरू केली. मुंबईतल्या लोकांना या अभ्यासाची प्रचंड गरज होती, अजूनही आहे. तिच्या घरीच कार्यक्रम व्हायचे.
- मुंबई जीवनसाथचा भक्कम आधार होता सुशील आणि विनीता हाटे. त्यांची निष्ठा, संयोजनकौशल्य आणि आमची वैयक्तिक मैत्री मला खूप महत्त्वाची वाटते.
- पुण्यातलं जीवनसाथ अभ्यास मंडळ पहिल्या दिवसापासून जोरातच चाललं. बरीच वर्षं ते शनिवार पेठेतल्या आमच्या घरी होतं. आता आमच्याच कर्वेनगरच्या घरी अभ्यास मंडळ चालतं. गेली दोन वर्षं मी हा पुस्तकसंच लिहीत असताना मला अनेकांनी मदत केली. त्यातल्या काहींनी या पुस्तकांसाठी काही विषयांसाठी मजकूर लिहिला, काहींनी टायपिंगची, डिक्टेशन घेऊन लिहिण्याची मदत केली. मजकुरावरच्या त्यांच्या प्रतिक्रियादेखील महत्त्वाच्या होत्या. त्यांची नावं मी आडनावाच्या आद्याक्षरांच्या क्रमानी देतोय. ती आद्याक्षरं इंग्लिश अल्फाबेटाप्रमाणे रचली आहेत.

  बोकील डॉ. आशा, बोरोटीकर तुषार, भोइटे आमोद, दंडवते मानसी, डिंबळे रामभाऊ, देगवेकर दिलीप, देशपांडे केशव, देवराज शिल्पा, गोवित्रीकर सुनीति, जाधव विजय, कानेटकर श्रद्धा, कुळकर्णी पौर्णिमा,

क्षेमकल्याणी ममता, लिमये हर्षद, लिमये गौरी गोळे, मेढेकर शैवल, मोहाडीकर डॉ. लीना, मुद्गल दीपा, मुद्गल स्मिता, मुळे अंजली, म्हैसकर मकरंद, नागपूरकर माधव, पाटणकर राजेश, पाटील मोहिनी, पाटील स्मिता, पाटील विक्रांत, राऊळ श्यामल, रावराणे गीता, साठे आशा, शुक्ल डॉ. भूषण, संचेती अपूर्वा, संचेती आदिती, वळसंगकर अनिल, तेलंग डॉ. नीलू.

- जीवनसाथ अभ्यास मंडळाचे सगळे सभासद. जीवनसाथ समुपदेशन केंद्राचे सगळे समुपदेशनार्थी.

- शोभा तर या पुस्तकसंचाच्या थोड्या भागाची सह-लेखिकाच आहे. मी आमच्या वैवाहिक आयुष्यात तिच्यावर केलेल्या अन्यायाचा मी अनेक ठिकाणी उल्लेख केलाच आहे. शिवाय या पुस्तक-प्रक्रियेच्या दोन वर्षांच्या काळातही तिच्या मदतीशिवाय, टीकेशिवाय, सूचनांशिवाय आणि प्रोत्साहनाशिवाय मी इथपर्यंत पोचलोच नसतो.

  शोनील आणि आभामुळे तर जीवनसाथ संस्था सुरू झाली. अनास्तेसिया, श्रेयस आणि आमची नातवंडं ओजस, तुहिन आणि डॉमिनिक यांना पुढे त्यांच्या आयुष्यात माझ्या या कार्यशाळांचा आणि त्याबद्दलच्या लिखाणाचा उपयोग व्हावा हा माझा ऊर्जास्रोत होता.

- हे पुस्तक या अवस्थेपर्यंत आणण्यात श्री. हेमंत जोशी आणि सौ. संगीता सरदेसाई यांचा मोठा वाटा आहे.

- मी पुस्तकसंचात म्हटलं आहे तेच पुन्हा सांगतो. वाचकांच्या प्रतिक्रिया नाव, फोटो पत्त्यासह पुढच्या आवृत्तीत छापणार आहे. कौतुक, टीका दोन्हीचं स्वागत असेल. अशा प्रत्येकाचं माझ्यावर ऋण असणार आहे.

**– अनिल भागवत**
वैवाहिक आणि कौटुंबिक समुपदेशक

'आयुष्यात येणाऱ्या प्रत्येक प्रश्नाचं खरं मर्म एकच — चांगल्या-वाईट अनेक घटना तुमच्या वाट्याला आयुष्यभर येणार. त्यांची हाताळणी कशी करायची हे दुसरी कुठचीही शक्ती किंवा व्यक्ती ठरवणार नसते. ते तुम्ही स्वतः ठरवायचं असतं. त्यासाठी त्या घटनेच्या सर्व अंगांचा अभ्यास स्वतःला करावा लागतो. त्या अभ्यासासाठी जीवनभर स्पष्ट विचारांची साथ लागते. म्हणजेच जीवनसाथ.'

## या पुस्तकाविषयी

आयुष्यातल्या सगळ्या घटनांशी तत्त्वज्ञानाचा संबंध असतो. इतर अनेकांना तो दिसत नाही. तो इतरांना पटवून द्यावा लागतो. एरवी लोकांना पैशाची चणचण भासली तर साध्या राहणीचं महत्त्व कळतं. तब्येतीचे प्रश्न आले, जंतूंमुळे कसला तरी साथीचा रोग पसरला तरच स्वच्छतेचं महत्त्व कळतं.

पाठदुखी, मानदुखी सुरू झाली तरच व्यायामाबद्दल विचार सुचतो. घरच्या कोणाची तरी दोन-चार डॉक्टरांकडे फरपट झाली की वैद्यकीय क्षेत्र आणि सामान्य माणूस यांचा संबंध समजतो. शारीरिक मेहनतीचं काम स्वतः करावं लागलं तर ऊर्जेची गणितं या विषयात रस निर्माण होतो. नैसर्गिक मोसमांची पार उलथापालथ होऊन जनजीवन उद्‌ध्वस्त झालं कीच फक्त पर्यावरण या विषयाची जाणीव होते. वीजटंचाई, पाणीटंचाई आली की पाणी हा अभ्यासाचा विषय आहे हे जाणवतं.

अनेक प्रश्नांमुळे वेळ, पैसे, श्रम यांची समीकरणं जुळेनाशी झाली की शहरीकरण ही किती मोठी समस्या आहे हे कळतं. आपण राहतो त्या शहरातल्या काही नगरसेवकांनी गैरसोय, अरेरावी, लुटालूट सुरू केली की, यातले अपवादही ठळकपणे दिसायला लागतात. सरकार, लोकशाही, निवडणूक, बहुमत, राजकारण या विषयांशी स्वतःचा संबंध समजायला लागतो. मुलं परदेशी स्थायिक झाली की राष्ट्र, विश्वबंधुत्व अशा विषयांचा स्वतःचा संबंध स्पष्ट व्हायला लागतो. कोणीतरी स्वतःवर अन्याय केला की मग कायदा हा विषय आपला वाटायला लागतो.

हे सगळे विषय कॉमन मॅनच्या दृष्टीने उलगडून दाखवणारं हे पुस्तक आहे.